॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अथ चतुर्थोऽध्यायः

## अवतरणिका

श्रीभगवंतांनी दुसऱ्या अध्यायाच्या एकोणचाळीसाव्या श्लोकामध्ये अर्जुनाला म्हटले आहे की, ज्ञानयोगामध्ये आपल्या विवेकानुसार विचारपूर्वक आचरण केल्यास ज्या समबुद्धीची प्राप्ती होते त्यालाच तू कर्मयोगाच्या विषयामध्ये ऐक. अर्थात् कर्मयोगामध्ये निष्कामभावनेने परहितार्थ कर्तव्यकर्म केल्याने ही समबुद्धी कशी प्राप्त होते हे ऐक. "**एषा तेऽभिहिता साङ्ख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु।**". मग कर्मयोगाचे वर्णन करताना प्रसङ्गानुसार अर्जुनाने प्रश्न केल्यावरून स्थितप्रज्ञाचे लक्षण सांगून अध्यायाचा विषय समाप्त केला.

तीसऱ्या अध्यायाच्या आरंभी अर्जुनाने प्रश्न केला की, आपल्या मताने जर बुद्धीची श्रेष्ठता मान्य आहे तर मग आपण मला घोर कर्मामध्ये (युद्धामध्ये) का प्रवृत्त करीत आहात? याच्या उत्तरात भगवंतांनी चौथ्या श्लोकापासून एकोणतीसाव्या श्लोकापर्यंत अनेक प्रकारांनी कर्तव्यकर्म करण्याच्या आवश्यकतेचे प्रतिपादन करून सिद्ध केले की, कर्तव्यकर्म करण्यानेच समबुद्धी प्राप्त होते. मग तीसाव्या श्लोकात भगवन्निष्ठेनुसार कर्तव्यकर्म करण्याची विशेष विधी सांगितली की, विवेकाने संपूर्ण कर्म मला अर्पण करून तसेच निष्काम, निर्मम, निःसंताप होऊन शास्त्रविहित कर्म केले पाहिजे. कर्तव्यकर्म करण्याच्या या विधीला "आपले मत" सांगून भगवंतांनी एकतीसाव्या बत्तीसाव्या श्लोकामध्ये अन्वय-व्यतिरेक पद्धतीने आपल्या ह्या मताची पुष्टी केली. तसेच पस्तीसाव्या श्लोकात या विधीच्या पालनाविषयी विशेष भर देऊन म्हटले की, आपल्या कर्तव्याचे पालन करीत असताना मरण आले तरी श्रेयस्कर आहे. "**स्वधर्मे निधनं श्रेयः**" यावर अर्जुनाने छत्तीसाव्या श्लोकात प्रश्न केला की, मनुष्याची इच्छा नसतानासुद्धा कोणाच्या प्रेरणेने माणूस पाप (अकर्तव्य) करतो? याच्या उत्तरात भगवंतांनी "काम" अर्थात् कामनेलाच संपूर्ण पाप, अनर्थांचे कारण सांगून शेवटी कामरूपी शत्रूला मारण्याची आज्ञा दिली.

जरी तीसऱ्या अध्यायाच्या सदतीसाव्या श्लोकापासून भगवान् एकसारखे उपदेश देत आहेत तरीपण त्रेचाळीसाव्या श्लोकामध्ये अर्जुनाच्या प्रश्नाचे उत्तर देणे समाप्त झाल्यावर महर्षी वेदव्यासजी तीसऱ्या अध्यायाची समाप्ती करतात आणि नवीन (चौथा) अध्याय सुरू करतात. यावरुन असे वाटते की, अर्जुनाच्या प्रश्नाचे उत्तर समाप्त झाल्यानंतर भगवंत थोड्या वेळासाठी थांबतात, मग दुसऱ्या अध्यायाच्या सत्तेचाळीसाव्या-अठ्ठेचाळीसाव्या श्लोकापासून ज्या कर्मयोगाचा विषय चालू होता त्यालाच चौथ्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकात "**इदम्**" पदाने पुनः आरंभ करतात म्हणून चौथा अध्याय तीसऱ्या अध्यायाचाच परिशिष्ट मानला जातो.

कर्मयोगामध्ये दोन गोष्टी मुख्य आहेत (१) कर्तव्यकर्माचे आचरण. (२) कर्तव्यकर्माविषयी विशेष ज्ञान असणे. अर्जुन कर्माचा स्वरूपाने त्याग करू इच्छितात. म्हणून तीसऱ्या अध्यायाच्या आरंभी भगवंताना म्हणतात की, आपण मला घोर कर्मामध्ये का प्रवृत्त करीत आहात? म्हणून तीसऱ्या अध्यायामध्ये तर भगवंताने अनेक प्रकारांनी कर्तव्यकर्माच्या आचरणाच्या आवश्यकतेवर विशेष भर दिला आहे आणि बरोबरच कर्मयोगाला समजून घेण्यासाठी तात्त्विक गोष्टीसुद्धा सांगितल्या आहेत. परंतु या चौथ्या अध्यायात कर्मयोगाच्या तात्त्विक गोष्टींना समजून घेण्यावर भगवंत विशेष जोर देत असून कर्तव्यकर्माचे पालन करणे आवश्यक असल्याचे म्हणतात. तात्पर्य तीसऱ्या आणि चौथ्या दोन्हीही अध्यायामध्ये उपर्युक्त दोन्ही गोष्टी सांगितल्या आहेत. परंतु तीसऱ्या अध्यायामध्ये कर्तव्यकर्माच्या आचरणाविषयी मुख्य गोष्ट आहे आणि चौथ्या अध्यायामध्ये कर्तव्यकर्माच्या विषयामध्ये विशेष ज्ञान असण्याची मुख्य गोष्ट आहे. "**तत्ते कर्म प्रवक्ष्यामि**

*यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्।'' (४।१६)*

*जो कर्मयोग अनादी असूनसुद्धा या पृथ्वीवर त्याला जाणणारे विशेष सूज्ञलोक नसल्याने पुष्कळ काळापासून लोपला होता. त्याच कर्मयोगाचे वर्णन पुन: सुरुवात करताना भगवान् पहिल्या तीन श्लोकामध्ये कर्मयोगाची परंपरा दाखवून त्याची अनादीता सिद्ध करतात.*

*श्रीभगवानुवाच*

# इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम्।
# विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत्॥ १ ॥

श्रीभगवान् म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अहम्** | = मी | **विवस्वते** | = सूर्याला | **प्राह** | = सांगितला (आणि) |
| **इमम्** | = हा | **प्रोक्तवान्** | = सांगितला होता (मग) | **मनुः** | = मनूने (आपला पुत्र) |
| **अव्ययम्** | = अविनाशी | **विवस्वान्** | = सूर्याने (आपला पुत्र) | **इक्ष्वाकवे** | = राजा इक्ष्वाकूला |
| **योगम्** | = योग (कर्मयोग) | | (वैवस्वत) मनुला | **अब्रवीत्** | = सांगितला. |

***व्याख्या*— इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम्**— भगवंतांनी ज्या सूर्य, मनु आणि इक्ष्वाकु राजांचा उल्लेख केला आहे. ते सर्व गृहस्थाश्रमी होते आणि त्यांनी गृहस्थाश्रमामध्ये राहूनच कर्मयोगद्वारा परम सिद्धीची प्राप्ती केली होती. म्हणून येथील ''**इमम्, अव्ययम्, योगम्,**'' पदांचे तात्पर्य पूर्व प्रकरणानुसार तसेच राज्य परंपरेनुसार ''कर्मयोग'' घेणेच उचित वाटते.

जरी पुराणामध्ये आणि उपनिषदामध्येसुद्धा कर्मयोगाचे वर्णन येते. तरीपण ते वर्णन गीतेमध्ये ज्या प्रकाराने समजाविले आहे त्याप्रमाणे सांगोपांग आणि विस्तृत येत नाही. गीतेमध्ये भगवंतांनी अनेक युक्तींनी कर्मयोगाचे सरळ आणि सांगोपांग विवेचन केले आहे. कर्मयोगाचे इतके विशद वर्णन पुराण आणि उपनिषदामध्ये पाहण्यात येत नाही.

भगवंत नित्य आहेत आणि त्यांचा अंश जीवात्मासुद्धा नित्य आहे. तसेच भगवंताशी जीवात्म्याचा संबंधसुद्धा नित्य आहे. म्हणून भगवत्प्राप्तीचे सर्व मार्ग (योगमार्ग, ज्ञानमार्ग, भक्तिमार्ग इत्यादी) सुद्धा नित्य आहेत. *याठिकाणी ''**अव्ययम्**'' पदाने भगवान् कर्मयोगाच्या नित्यतेचे प्रतिपादन करीत आहेत.

परमात्म्याशी जीवाचा स्वत: सिद्ध संबंध (नित्ययोग) आहे. जसे पतिव्रता स्त्रीला पतीची होण्यासाठी काहीही करावे लागत नाही. कारण ती पतीची असतेच. तसेच साधकाला परमात्म्याचे होण्यासाठी काहीही करावे लागत नाही. तो तर परमात्म्याचा असतोच. परंतु अनित्य क्रिया, पदार्थ, घटना इत्यादींशी जेव्हा तो आपला संबंध समजतो तेव्हा त्याला ''नित्ययोग'' अर्थात् परमात्म्याशी आपल्या नित्य संबंधाचा अनुभव येत नाही. म्हणून त्या अनित्याशी मानलेल्या संबंधाला समाप्त करण्यासाठी कर्मयोगी शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादी मिळालेल्या संपूर्ण वस्तूंना संसाराच्याच मानून संसाराच्या सेवेमध्ये उपयोगात आणतो. तो असे मानतो की, जसे धुळीचा लहानातला लहान कण-सुद्धा विशाल पृथ्वीचा एक अंश आहे. तसेच हे शरीरसुद्धा विशाल ब्रह्मांडाचा एक अंश आहे. असे मानल्याने ''कर्म'' तर संसारासाठी होतील परंतु ''योग'' (नित्ययोग) आपल्यासाठी होईल. अर्थात् नित्ययोगाचा अनुभव येईल.

भगवान् ''**विवस्वते प्रोक्तवान्**'' पदाने साधकांचे जणू हे लक्ष वेधीत आहेत की, जसे सूर्यनारायण निरंतर भ्रमण करीत असतात. अर्थात् कर्म करीतच राहतात आणि सर्वांना प्रकाशित करीत असूनसुद्धा स्वत: निर्लिप्त राहतात. तसेच साधकांनीही प्राप्त परिस्थितीनुसार आपल्या कर्तव्यकर्मांचे पालन स्वत: करीत राहिले पाहिजे (३।१९) आणि दुसऱ्यांना देखील कर्मयोगाविषयी मार्गदर्शन करून लोकसंग्रह करीत राहिले पाहिजे. परंतु स्वत: त्यांच्यापासून निर्लिप्त (निष्काम, निर्मम आणि अनासक्त) असले पाहिजे.

* गीतेच्या आठव्या अध्यायामध्ये भगवंतांनी शुक्ल आणि कृष्ण दोन्ही गतींना नित्य सांगितले आहे—''शुक्लकृष्णे गती ह्येते जगत: शाश्वते मते।'' (८।२६)

सृष्टीमध्ये सूर्यनारायण सर्वांचे आदि आहेत. सृष्टीची रचना करतेवेळीसुद्धा सूर्यनारायण जसे पूर्वकल्पामध्ये होते तसेच प्रगट झाले—"**सूर्याचन्द्रमसौ धाता यथापूर्वमकल्पयत्।**". त्या (सर्वांच्या आदि असलेल्या) सूर्यनारायणांना भगवंतांनी अविनाशी कर्मयोगाचा उपदेश केला. यावरुन सिद्ध होते की, भगवान् सर्वांचे आदिगुरू आहेत आणि त्याबरोबरच कर्मयोगसुद्धा अनादी आहे. भगवान् अर्जुनाला जणू हे म्हणत आहेत की, मी तुला जी कर्मयोगाविषयी गोष्ट सांगत आहे ही काही आत्ताची नवीन गोष्ट नाही. जो योग सृष्टीच्या आदिपासून अर्थात् नित्य आहे त्याच योगाविषयी तुला मी सांगत आहे.

**प्रश्न**—भगवंतांनी सृष्टीच्या आरंभी सूर्यनारायणाला कर्मयोगाचा उपदेश का केला?

**उत्तर**—(१) सृष्टीच्या आरंभी भगवंतांनी सूर्यालाच कर्मयोगाचा वास्तविक अधिकारी समजून त्यांना सर्वप्रथम या योगाचा उपदेश दिला.

(२) सृष्टीमध्ये जो सर्वप्रथम उत्पन्न होतो त्यालाच उपदेश दिला जातो. जसे ब्रह्मदेवांनी सृष्टीच्या आदिमध्ये प्रजेला उपदेश दिला (३।१०). उपदेश देण्याचे तात्पर्य कर्तव्याचे ज्ञान करवून देणे. सृष्टीमध्ये सर्वप्रथम सूर्यनारायणाची उत्पत्ती झाली. त्यानंतर सूर्यापासून संपूर्ण लोक उत्पन्न झाले. सर्वांना उत्पन्न करणाऱ्या* सूर्याला सर्वप्रथम कर्मयोगाचा उपदेश देण्याचा अभिप्राय, त्यांच्यापासून उत्पन्न झालेल्या संपूर्ण सृष्टीला परंपरेने कर्मयोग सुलभ करून देणे हा होता.

(३) सूर्य संपूर्ण जगताचे नेत्र आहेत. त्यांच्याकडूनच सर्वांना ज्ञान प्राप्त होते. तसेच ते उदित झाल्यावर बहुतांशी संपूर्ण प्राणी जागृत होतात आणि आपापल्या कर्मांमध्ये प्रवृत्त होतात. सूर्यापासूनच मनुष्याला कर्तव्यपरायणतेचे ज्ञान होते. सूर्याला संपूर्ण जगताचा आत्मासुद्धा म्हटले गेले आहे "**सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च**". † म्हणून सूर्याला जो उपदेश प्राप्त होईल तो संपूर्ण प्राण्यांनासुद्धा आपोआप प्राप्त होईल. म्हणून भगवांतांनी सर्वप्रथम सूर्यालाच उपदेश दिला.

वास्तविक पाहता नारायणाच्या रूपामध्ये उपदेश देणे आणि सूर्याच्या रूपामध्ये उपदेश ग्रहण करणे विश्वनाट्यामधील सूत्रधार भगवंताची एक लीलाच समजली पाहिजे. जी संसाराच्या हितासाठी फार आवश्यक होती. जसे अर्जुन महान ज्ञानी नर-ऋषीचे अवतार होते. परंतु लोकसंग्रहासाठी त्यांनासुद्धा उपदेश घेण्याची आवश्यकता झाली, अगदी त्याचप्रमाणे भगवंतांनी स्वत: ज्ञानस्वरूप सूर्याला उपदेश दिला. ज्याचा परिणाम म्हणून संसारावर फार मोठा उपकार झाला, होत आहे आणी पुढे होत राहील.

**विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत्**—कर्मयोग गृहस्थी लोकांसाठी विशेष विद्या आहे. ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास—या चारी आश्रमांमध्ये गृहस्थाश्रमच मुख्य आहे. कारण गृहस्थाश्रमापासूनच दुसऱ्या आश्रमाची निर्मिती होते आणि त्यांचा जीवननिर्वाह होतो. मनुष्य गृहस्थाश्रमाध्ये राहूनच आपल्या कर्तव्यकर्माचे पालन करून सुगमतेने परमात्मप्राप्ती करू शकतो. त्याला परमात्मप्राप्ती-साठी आश्रम बदलण्याची आवश्यकता नाही. भगवंतांनी सूर्य, मनु, इक्ष्वाकु इत्यादी राजांची नावे घेऊन हे सांगितले की, कल्पाच्या आरंभी गृहस्थाश्रमीनीच कर्मयोगाची विद्या जाणली आणि गृहस्थाश्रमामध्ये राहूनच त्यांनी कामनांचा नाश करून परमात्मतत्त्वाची प्राप्ती केली. स्वत: भगवान् श्रीकृष्ण आणि अर्जुनसुद्धा गृहस्थाश्रमीच होते. म्हणून भगवंत अर्जुनाला निमित्त करून जणू संपूर्ण गृहस्थाश्रमींना सावधान (उपदेश) करतात की, तुम्ही आपल्या गृहस्थी विद्या "कर्मयोगा" चे पालन करून घरी राहूनच परमात्मप्राप्ती करू शकता. तुम्हाला स्थलांतर करण्याची जरूरी नाही.

---

* शास्त्रामध्ये सूर्याला "सविता" म्हटले गेले आहे, ज्याचा अर्थ उत्पन्न करणारा असा आहे. पाश्चात्य विज्ञानसुद्धा सूर्याला संपूर्ण सृष्टीचे कारण मानते.

† महाभारतात सूर्याला म्हटले आहे की,

त्वं भानो जगतश्चक्षुस्त्वमात्मा सर्वदेहिनाम्। त्वं योनि: सर्वभूतानां त्वमाचार: क्रियावताम्॥
त्वं गति: सर्वसांख्यानां योगिनां त्वं परायणम्। अनावृतार्गलद्वारं त्वं गतिस्त्वं मुमुक्षुताम्॥
त्वया संधार्यते लोकस्त्वया लोक: प्रकाश्यते। त्वया पवित्रीक्रियते निर्व्याजं पाल्यते त्वया॥

(वनपर्व ३।३६-३८)

सूर्यदेव, आपण जगताचे नेत्र तसेच समस्त प्राण्यांचे आत्मा आहात. आपणच सर्व जीवांचे उत्पत्तिस्थान आणि कर्मानुष्ठानामध्ये लागलेल्या पुरुषांचे सदाचाराचे (प्रेरक) आहात.

संपूर्ण सांख्ययोग्यांचे प्राप्तव्य स्थानसुद्धा आपणच आहात. आपणच सर्व कर्मयोगीयांचे आश्रय आहात. आपणच मोक्षाचे उन्मुक्त द्वार आहात आणि आपणच मुमुक्षूला गती देणारे आहात.

आपणच संपूर्ण जगताला धारण करत आहात. आपल्याकडूनच हा लोक प्रकाशित होतो. आपणच याला पवित्र करता आणि आपल्याकडून नि:स्वार्थभावनेने याचे पालन केले जाते.

गृहस्थाश्रमी असूनसुद्धा अर्जुन प्राप्त कर्तव्यकर्मा (युद्ध) चा त्याग करून भिक्षेवर निर्वाह करणे श्रेष्ठ मानतात. (२।५) अर्थात् आपल्या कल्याणासाठी गृहस्थाश्रमापेक्षा संन्यासाश्रम श्रेष्ठ समजतात. म्हणून उपर्युक्त पदातून भगवान् जणू हे सांगतात की, तूही राजघराण्यातील श्रेष्ठ गृहस्थी आहेस, कर्मयोग तुझ्या आश्रमासाठी खास विद्या आहे. म्हणून त्याचेच पालन करणे तुझ्यासाठी कल्याणकारक आहे. संन्यास आश्रमाद्वारा जे परमात्मतत्त्व प्राप्त केले जाते तेच तत्त्व कर्मयोगी गृहस्थाश्रमामध्ये राहूनच स्वाधीनतेने प्राप्त करू शकतो. म्हणून कर्मयोग गृहस्थींची तर मुख्यविद्या आहे. परंतु संन्यास इत्यादी इतर आश्रमाचे साधकही याचे पालन करून परमात्मतत्त्व प्राप्त करू शकतात. प्राप्त परिस्थितीचा सदुपयोग हाच कर्मयोग आहे. म्हणून कर्मयोगाचे पालन कोणत्याही वर्ण, आश्रम, संप्रदाय, देश काल इत्यादीमध्ये केले जाऊ शकते.

एखाद्या विद्येमध्ये श्रेष्ठ आणि प्रभावशाली पुरुषाची नावे घेतल्यास त्या विद्येचा महिमा प्रगट होतो ज्यामुळे दुसरे लोकसुद्धा तसे करण्यासाठी उत्साहित होतात. ज्या लोकांच्या अंत:करणात सांसारिक पदार्थांचे महत्त्व आहे त्यांच्यावर ऐश्वर्यवान राजांचा अधिक प्रभाव पडतो. म्हणून भगवान् सृष्टीच्या आरंभी अस्तित्वात असणाऱ्या सूर्य आणि मनु इत्यादी प्रभावशाली राजांची नावे घेऊन कर्मयोग आचरण करण्याविषयी प्रेरणा करत आहेत.

## विशेष गोष्ट

क्रिया आणि पदार्थांमध्ये आसक्ती असल्याने अर्थात् त्यांच्याशी आपला संबंध मानल्याने कर्मयोग होत नाही. गृहस्थाश्रमामध्ये राहूनसुद्धा सांसारिक भोगाविषयी अरुची (उपरती अथवा कामनेचा अभाव) होत असते. कोणताही भोग भोगला तरी त्याची शेवटी त्या भोगाविषयी अरुची उत्पन्न होते—हा नियम आहे. आरंभी भोगाविषयी जितकी रुची (कामना) राहते भोग भोगतेवेळी ती तितकी राहत नाही. तर क्रमाक्रमाने कमी होत जाऊन समाप्त होते. जसे मिठाई खाताना आरंभी त्याच्याविषयी जी रुची असते. ती मिठाई खात असताना कमी होत जाते आणि शेवटी त्या-विषयी अरुची होते. परंतु मनुष्य ही चूक करतो की, तो त्या अरुचीला महत्त्व देऊन तिला स्थिर करीत नाही, तर तो त्या अरुचीलाच तृप्ती (फल) समजतो. परंतु वास्तविक पाहता अरुचीमध्ये थकावट अर्थात् भोगण्याच्या शक्तीचा अभावच होतो.

ज्या रुची अथवा कामनेचा कोणत्याही वेळी अभाव होतो, ती रुची अथवा कामना वास्तविक पाहता ''स्व'' ची नसते. ज्याची केव्हाही अरुची होते त्याच्याशी आमचा वास्तविक संबंध नसतो. ज्याच्याशी आमचा वास्तविक संबंध आहे, त्या सत्स्वरूपी परमात्मतत्त्वाकडे अग्रेसर होण्यात केव्हाही अरुची होत नाही उलट रुची वाढतच जाते. येथपर्यंत की, परमात्मतत्त्वाची प्राप्ती झाल्यावरसुद्धा ''प्रेमा'' च्या रूपामध्ये ती रुची वाढतच राहते. ''स्व'' सुद्धा सत्-स्वरूप आहे, म्हणून आपल्या अभावाची रुची कोणालाही नसते.

कर्म, करण, (शरीर, इंद्रिये, मन इत्यादी) आणि उपकरण (पदार्थ अर्थात् कर्म करण्यासाठी उपयोगी असलेली सामुग्री) हे तिन्हीही उत्पन्न आणि नष्ट होणारे आहेत, मग यापासून मिळणारे फल नित्य कसे राहील ? ते तर नाशवान्च असणार! अविनाशीच्या प्राप्तीने जी तृप्ती होते, ती नाशवान् फलाच्या प्राप्तीने कशी होऊ शकते ? म्हणून साधकांनी कर्म, करण आणि उपकरण—तिन्ही पासून संबंध-विच्छेद करावा. यांच्यापासून संबंध-विच्छेद तेव्हाच होईल जेव्हा साधक आपल्यासाठी काही इच्छिणार नाही, आपल्यासाठी काही करणार नाही आणि आपले काही समजणार नाही, उलट आपले म्हणविले जाणारे कर्म, करण आणि उपकरण—या तिन्हीपासून संबंध-विच्छेद करण्यासाठी यांना संसाराचेच समजून संसाराच्याच सेवेत वापरील.

कर्म करीत असतानासुद्धा कर्मयोग्याची कर्माविषयी कामना, ममता आणि आसक्ती राहत नाही. तर त्याविषयी प्रीती आणि तत्परता असते. कामना, ममता तसेच आसक्ती अपवित्रता निर्माण करणारी असतात आणि प्रीती तसेच तत्परता कर्मांना पवित्र करीत असतात. कामना, ममता तसेच आसक्तीने कोणतेही कर्म केल्यास आपली अधोगती आणि पदार्थांचा नाश होतो. तसेच त्या कर्माची वारंवार आठवण येते. अर्थात् त्या कर्माशी संबंध जडलेलाच राहतो. परंतु प्रीती तसेच तत्परतेने कर्म केल्यास आपले उत्थान आणि पदार्थांचा सदुपयोग होतो, नाश नव्हे. तसेच त्या कर्माचे पुन: स्मरणही येत नाही अर्थात् त्या कर्माशी संबंध-विच्छेद होतो. अशा प्रकारे कर्माशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद झाल्यास नित्यप्राप्त स्वरूप अथवा परमात्मतत्त्वाचा अनुभव होतो.

कोणताही मनुष्य का असेना, तो सुगमतेने समजू शकतो की, जे काही माझ्याजवळ आहे ते माझे नाही उलट कोणाकडून तरी मिळाले आहे. जसे शरीर माता-पित्यापासून मिळाले आहे, विद्या, योग्यता गुरुजनांकडून मिळाली आहे इत्यादी. तात्पर्य एकमेकाच्या साहाय्यानेच सर्वांचे जीवन

चालते. श्रीमंतात श्रीमंत असलेल्या व्यक्तीचे जीवनसुद्धा दुसऱ्याच्या साहाय्यतेशिवाय चालू शकत नाही. आम्ही जर कोणाकडून घेतले असेल तर कोणाला देणे, कोणाची साहाय्यता करणे, सेवा करणे आमचेसुद्धा परम कर्तव्य होते. याचेच नाव कर्मयोग आहे. याचे पालन सर्व मानव करू शकतात आणि याच्या पालनात कधी नाममात्रसुद्धा असमर्थता तथा पराधीनता नसते.

कर्तव्य त्याला म्हणतात ज्याला सुखाने करता येते जे अवश्य केले पाहिजे अर्थात् जे करण्यायोग्य आहे आणि जे केल्याने उद्देशाची सिद्धी अवश्य होते. जे करू शकत नाही ते करण्याची जबाबदारी कोणावरही नाही आणि जे करता कामा नये, ते करावयाचेच नाही. जे करू नये ते न केल्याने दोन अवस्था आपोआप प्राप्त होतात. निर्विकल्प अवस्था अर्थात् काही न करणे अथवा जे केले पाहिजे ते करणे.

कर्तव्य नेहमी निष्कामभावनेने तसेच परहिताच्या दृष्टीने केले जाते. सकामभावनेने केले गेलेले कर्म बंधनकारक होते म्हणून ते करायलाच नको आहे. निष्काम-भावनेने केले जाणारे कर्म फलाच्या कामनेरहित असते, उद्देशरहित नसते. उद्देशरहित क्रिया तर वेड्याची असते. फल आणि उद्देश—दोन्हीमध्ये अन्तर असते. फल उत्पन्न आणि नष्ट होणारे आहे परंतु उद्देश नित्य असतो. उद्देश नित्य प्राप्त परमात्म्याच्या अनुभवाचा असतो, ज्याच्यासाठी मनुष्यजन्म मिळाला आहे. आपले कर्तव्य पालन न केल्याने त्या परमात्म्याचा अनुभव येत नाही. सकामभाव, प्रमाद, आळस इत्यादी असल्यास आपल्या कर्तव्याचे पालन करणे कठीण वाटते.

वास्तविक पाहता कर्तव्यकर्म पालन करण्यामध्ये परिश्रम नसतात. कर्तव्यकर्म सहज, स्वाभाविक असतात. कारण हा स्वधर्म आहे. परिश्रम तेव्हा होतात जेव्हा अहंता, ममता, आसक्ती, कामना याने युक्त होऊन अर्थात् ''आपल्यासाठी'' कर्म होतात. म्हणून भगवंतांनी राजस कर्माला परिश्रमयुक्त सांगितले आहे (१८।२४).

जसे भगवंताकडून प्राणिमात्राचे हित होत असते. तसेच भगवंताची शक्तीसुद्धा प्राणिमात्राच्या हिताविषयी निरंतर व्यस्त असते. ज्याप्रमाणे आकाशवाणी केंद्राकडून प्रसारित होणारा विशेष शक्तियुक्त ध्वनी सर्व ठिकाणी पसरतो. परंतु रेडियोमधून ज्या नंबरवर त्या आवाजाचे केंद्रिकरण (सजातीयता) केलेले असते. त्याच नंबरवर तो ध्वनी आकर्षिला जातो, त्याचप्रमाणे जेव्हा कर्मयोगी स्वार्थभावाचा त्याग करून केवळ संपूर्ण संसाराच्या हिताच्या भावनेनेच संपूर्ण कर्म करतो. तेव्हा भगवंताच्या सर्वव्यापी व हितकारक शक्तीशी त्याची एकता होते आणि त्याच्या कर्मामध्ये विलक्षणता येते. भगवंताच्या शक्तीशी एकता झाल्याने त्याचे ठिकाणी भगवंताची शक्तीच काम करते आणि त्या शक्तीकडूनच लोकांचे हित होत असते. म्हणून कर्तव्यकर्म करण्यामध्ये कोणतीही बाधा येत नाही आणि परिश्रमाचा अनुभवही होत नाही.

कर्मयोगामध्ये दुसऱ्याचा आश्रयसुद्धा घेण्याची आवश्यकता नाही. जी परिस्थिती प्राप्त झाली असेल त्यातच कर्मयोगाचे आचरण करावयाचे आहे. कर्मयोगानुसार प्रसंगी कोणाला आवश्यकता पडल्यास साहाय्यता करणे ''सेवा'' आहे. जसे एखाद्याची गाडी बिघडली आहे आणि तो तिला धक्का मारण्याचा प्रयत्न करतो आहे म्हणून आम्हीही या त्याच्या कामात साहाय्यता करणे ''सेवा'' आहे. जो जाणून-बुजून कार्याचा शोध करून सेवा करतो तो कर्म करतो, सेवा नव्हे, कारण असे केल्याने त्याचा उद्देश पारमार्थिक न राहता लौकिक होतो. सेवा ती आहे जी परिस्थितीनुरूप केली जावी. कर्मयोगी परिस्थिती बदलत नाही आणि परिस्थिती शोधीत नाही. तो तर प्राप्त परिस्थितीचा सदुपयोग करतो. प्राप्त परिस्थितीचा सदुपयोग हाच कर्मयोग आहे.

**एवं परम्पराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः।**
**स कालेनेह महता योगो नष्टः परन्तप॥ २॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **परन्तप** | = हे परंतप! | **राजर्षयः** | = राजर्षींनी | **सः** | = तो |
| **एवम्** | = अशा प्रकारे | **विदुः** | = जाणले (परंतु) | **योगः** | = योग |
| **परम्परा प्राप्तम्** | = परंपरेने प्राप्त झालेल्या | **महता** | = फार | **इह** | = मनुष्यलोकात |
| **इमम्** | = या कर्मयोगाला | **कालेन** | = काळ लोटल्यामुळे | **नष्टः** | = लोपल्यासारखा झाला. |

*व्याख्या*— **एवं परम्पराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः**— सूर्य, मनु, इक्ष्वाकु इत्यादी राजांनी कर्मयोगाला योग्य प्रकारे जाणून त्याचे स्वतः सुद्धा आचरण केले आणि प्रजेकडूनही तसेच आचरण करवून घेतले. अशा प्रकारे राजर्षींमध्ये या कर्मयोगाची परंपरा चालत राहिली. ही राजांची (क्षत्रियांची) विशेष (स्वतःची) विद्या आहे. म्हणून प्रत्येक राजाने ही

विद्या जाणली पाहिजे. त्याचप्रमाणे परिवार, समाज, गाव इत्यादींच्या ज्या मुख्य व्यक्ती आहेत त्यांनी ही विद्या जाणली पाहिजे.

प्राचीनकाळी कर्मयोगाला जाणणारे राजेलोक राज्याच्या भोगामध्ये आसक्त न होता काळजीपूर्वक राज्याचे संचालन करीत होते. प्रजेच्या हिताविषयी त्यांची स्वाभाविक प्रवृत्ती राहत होती. सूर्यवंशी राजांच्या संबंधात महाकवी कालिदास म्हणतात—

**प्रजानामेव भूत्यर्थं स ताभ्यो बलिमग्रहीत्।**
**सहस्रगुणमुत्स्रष्टुमादत्ते हि रसं रविः॥**

(रघुवंश १।१८)

''ते राजेलोक आपल्या प्रजेच्या हितासाठी प्रजेकडून त्याचप्रमाणे कर घेत होते की, ज्याप्रमाणे हजारपटीने वर्षा करण्यासाठी सूर्य पृथ्वीवरील पाणी घेतो.''

तात्पर्य ते राजेलोक प्रजेपासून कर इत्यादींच्या रूपाने घेतल्या गेलेल्या धनाला प्रजेच्याच हितासाठी उपयोगात आणीत होते. आपल्या स्वार्थासाठी थोडेसुद्धा खर्च करीत नव्हते. आपल्या उदरनिर्वाहासाठी वेगळा शेती इत्यादी उद्योग करवीत होते. कर्मयोगाचे पालन केल्यामुळे त्या राजांना विलक्षण ज्ञान आणि भक्ती आपोआप प्राप्त होती. हेच कारण होते की, प्राचीनकाळी मोठमोठे ऋषीसुद्धा ज्ञान प्राप्तीसाठी त्या राजेलोकांजवळ जात होते. श्रीवेदव्यासजींचे पुत्र श्रीशुकदेवजीसुद्धा ज्ञान प्राप्तीसाठी राजर्षी जनकाजवळ गेले होते. छान्दोग्योपनिषदाच्या पाचव्या अध्यायामध्येसुद्धा आले आहे की, ब्रह्मविद्या शिकण्यासाठी सहा ऋषी एकाचवेळी अश्वपति महाराजांजवळ गेले होते.*

तीसऱ्या अध्यायाच्या वीसाव्या श्लोकामध्ये जनक इत्यादी राजांना आणि येथे सूर्य, मनु, इक्ष्वाकु इत्यादी राजांना कर्मयोगी दाखवून भगवान् अर्जुनाचे जणू इकडे लक्ष वेधित आहेत की, गृहस्थाश्रमी आणि क्षत्रिय असल्याने तूसुद्धा आपल्या पूर्वजा (वंशपरंपरे) नुसार कर्मयोगाचे पालन अवश्य करावयास हवे. (४।१५). याशिवाय आपल्या वंशाची रीत (कर्मयोगाची विद्या) आपल्यात उतरणे सुगमही आहे म्हणून आलीच पाहिजे.

**स कालेनेह महता योगो नष्टः**—परमात्मा नित्य आहेत आणि त्यांच्या प्राप्तीचे साधन—कर्मयोग, ज्ञानयोग, भक्तियोग इत्यादीसुद्धा परमात्म्याकडूनच निश्चित केलेले असल्याने नित्य आहेत. म्हणून यांचा कधी अभाव होत नाही—''**नाभावो विद्यते सतः।**'' (२।१६) हे आचरणात आलेले दिसत नसताना सुद्धा नित्य राहतात. म्हणूनच येथे आलेले ''**नष्टः**'' पदाचा अर्थ लुप्त, अप्रगट होणेच आहे; अभाव असणे नव्हे.

पहिल्या श्लोकामध्ये कर्मयोगाला ''**अव्ययम्**'' अर्थात् अविनाशी म्हटले गेले आहे. म्हणून येथे ''**नष्टः**'' पदाचा अर्थ जर कर्मयोगाचा अभाव मानला तर दोन्हीकडून विरोध निर्माण होतो की, जर कर्मयोग अविनाशी आहे तर त्याचा अभाव कसा होईल? आणि जर त्याचा अभाव झाला तर तो अविनाशी कसा होइल? याशिवाय पुढील (तीसऱ्या) श्लोकामध्ये भगवान् कर्मयोगाला पुनः प्रगट करण्याविषयी बोलतात. जर त्याचा अभाव झाला असता तर पुनः प्रगट झाला नसता. भगवंताच्या वचनात विरोध येऊ शकत नाही. म्हणून या ठिकाणी ''**इह नष्टः**'' पदाचे तात्पर्य हे आहे की, या अविनाशी कर्मयोगाच्या तत्त्वाचे वर्णन करणाऱ्या ग्रंथांचा आणि याच्या तत्त्वाला जाणणाऱ्या तसेच त्याला आचरणात आणणाऱ्या श्रेष्ठ पुरुषांचा या लोकामध्ये जणुकाही अभाव झाला आहे.

जेथून जी गोष्ट सांगितली जाते तेथून ती परंपरेने जेवढी दूर जाते तेवढेच त्याच्यात सहज अंतर पडत जाते—हा नियम आहे. भगवान् म्हणतात की, कल्पाच्या आरंभी मी हा कर्मयोग सूर्याला सांगितला होता. मग परंपरेने ह्याला राजर्षींनी जाणले. म्हणून याच्यात अंतर पडत गेले आणि फार काळ लोटल्याने आता तो योग या मनुष्यलोकी लोपल्यासारखा झाला आहे. हेच कारण आहे की, वर्तमानकाळात या कर्मयोगाची गोष्ट ऐकण्यात तसेच पाहण्यात फारच कमी येते.

कर्मयोगाचे आचरण लोपल्यासारखे झाले असले तरी त्याचा सिद्धांत (आपल्यासाठी काही न करणे) नित्य राहतो. कारण या सिद्धांताचे अनुकरण केल्याशिवाय कोणत्याही योगाचे (ज्ञानयोग, भक्तियोग इत्यादीचे) निरंतर साधन होऊ शकत नाही. कर्म तर सर्व मनुष्यांना करावेच लागतातः मात्र ज्ञानयोगी विवेकद्वारा कर्मांना नाशवान समजून कर्माशी संबंध-विच्छेद करत असतो आणि भक्तियोगी कर्मांना

* त्या प्रसंगात महाराज अश्वपतिचे हे वचन ध्यानात ठेवण्याजोगे आहे.

न मे स्तेनो जनपदे न कदर्यो न मद्यपः। नानाहिताग्निर्नाविद्वान्न स्वैरी स्वैरिणी कुतः॥

(छांदोग्य० ५।११।५)

माझ्या राज्यात कोणीही चोर नाही, कोणी कृपण नाही, कोणी दारुड्या नाही, कोणी अग्निहोत्र न करणारा नाही, कोणी अविद्वान नाही, कोणी परस्त्रीगामी नाही, मग कुलटा स्त्री (वेश्या) तर असेलच कशी?

भगवंताला अर्पण करून कर्माशी संबंध-विच्छेद करत असतो. म्हणून ज्ञानयोगी आणि भक्तियोग्याला (जरी त्यांनी कर्मयोगाचे अनुष्ठान समजा केले नाही तरी) कर्मयोगाचा सिद्धांत तर आचरणात आणावाच लागेल तात्पर्य वर्तमानकाळी कर्मयोग लोपल्यासारखा झाला असूनही सिद्धांताच्या रूपामध्ये विद्यमानच आहे.

वास्तविक पाहिले तर कर्मयोगात "कर्म" लोपले नाहीत. तर (कर्माचा प्रवाह आपल्यासाठी झाल्याने) "योग" च लोपला आहे. तात्पर्य जसे संसारातील पदार्थ कर्म करण्याने मिळत असतात, तसेच परमात्मासुद्धा कर्म केल्याने मिळतील—ही गोष्ट साधकाच्या अंत:करणामध्ये इतकी पक्की बसली आहे की, "परमात्मा नित्य प्राप्त आहे"—या वास्तविकतेकडे त्यांचे लक्षच जात नाही. "कर्म" नेहमी संसारासाठी होतात आणि "योग" नेहमी आपल्यासाठी असतो. योगासाठी कर्म करावे लागत नाही; तर स्वत: सिद्ध* आहे. म्हणून "योग" कर्म करण्याने होईल—असे समजणे हेच "योगाचे" लुप्त होणे होय.

मनुष्यशरीर कर्मयोगाचे पालन करण्यासाठी अर्थात् दुसऱ्यांची नि:स्वार्थ सेवा करण्यासाठीच मिळाले आहे. परंतु आज मनुष्य रात्रंदिवस आपल्या सुखसुविधा, सन्मान इत्यादींच्या प्राप्तीमध्येच गुंतला आहे. स्वार्थ अधिक वाढल्यामुळे दुसऱ्यांची सेवा करण्याकडे त्याचे लक्षच जात नाही. अशा प्रकारे ज्याच्यासाठी मनुष्यशरीर मिळाले आहे त्याला विसरणेच कर्मयोगाचे लोपणे आहे.

मनुष्य, सेवाद्वारा पशु-पक्ष्यापासून मनुष्य, देवता, पितर, ऋषी, संत-महात्मा आणि भगवंतालासुद्धा आपल्या वशमध्ये करू शकतो. परंतु सेवाभावाला विसरून मनुष्य स्वत: भोगांना वश झाला, ज्याचा परिणाम म्हणून त्याला नरकामध्ये तसेच चौऱ्यांशी लाख योनीमध्ये भ्रमण करावे लागत आहे. हेच कर्मयोगाचे लोपणे आहे.

**स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः।**
**भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम्॥ ३ ॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **मे** | = (तू) माझा | **सः, एव** | = तोच | **ते** | = तुला |
| **भक्तः** | = भक्त | **अयम्** | = हा | **प्रोक्तः** | = सांगितला आहे, |
| **च** | = आणि | **पुरातनः** | = पुरातन | **हि** | = कारण |
| **सखा** | = (प्रिय) सखा | **योगः** | = योग | **एतत्** | = हे |
| **असि** | = आहेस, | **अद्य** | = आज | **उत्तमम्** | = फार मोठे उत्तम |
| **इति** | = म्हणून | **मया** | = मी | **रहस्यम्** | = रहस्य आहे. |

***व्याख्या*— भक्तोऽसि मे सखा चेति**—अर्जुन भगवंताला आपले प्रिय मित्र पूर्वीपासूनच समजत होते. (११। ४१-४२) परंतु भक्त आता (२।७ मध्ये) झाले आहेत. अर्थात् अर्जुनाची सख्यभक्ती तर पूर्वीपासूनच होती. परंतु दास्यभक्ती आता नवी आहे. आज्ञा अथवा उपदेश दास (सेवक) अथवा शिष्यालाच दिला जातो, मित्राला नव्हे. अर्जुन जेव्हा भगवंताला शरण झाले. तेव्हा भगवंताचा उपदेश आरंभ झाला.

जी गोष्ट मित्रालाही सांगितली जात नाही ती गोष्टसुद्धा शरणागत शिष्यापुढे प्रगट केली जाते. अर्जुन भगवंताना म्हणत आहेत की, "मी आपला शिष्य आहे म्हणून शरण आलेल्या मला उपदेश करा" म्हणून भगवान् अर्जुनासमोर आपल्या स्वत: ला प्रगट करतात, रहस्य उघडे करतात.

अर्जुनाचा भगवंताविषयी फारच उच्च भाव होता म्हणूनच तर त्यांनी वैभव आणि शस्त्रास्त्रांनी सुसज्जित असलेल्या "नारायणी" सेनेचा त्याग करून नि:शस्त्र भगवंताला आपल्या "सारथी" च्या रूपामध्ये स्वीकार केले†.

* लोकहितार्थ आपल्या कर्तव्या (स्वधर्म) चे पालन केल्याने "योग" सिद्ध होतो. म्हणून हे "करणे" सुद्धा वास्तविक न करण्यासाठी अर्थात् "करणे" समाप्त करण्यासाठीच आहे—"आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते" (६।३) "करण्याचा वेग" नष्ट करण्यासाठीच केवळ सेवाभावनेने कर्तव्यकर्म केले पाहिजे. सकामभावनेने अर्थात् आपल्यासाठी कर्म केल्याने "करण्याचा वेग" वाढतो आणि दुसऱ्यासाठी कर्म केल्याने "करण्याचा वेग" समाप्त होतो. तात्पर्य हे आहे की, दुसऱ्यासाठीच कर्म केल्याने "करणे" समाप्त होते आणि आपल्यासाठी केल्याने "करणे" शिल्लक राहते. "करणे" समाप्त झाल्यावर स्वत: सिद्ध योगाचा अनुभव होतो.

† एवमुक्तस्तु कृष्णेन कुन्तीपुत्रो धनञ्जयः। अयुध्यमानं संग्रामे वरयामास केशवम्॥ (महाभारत उद्योग० ७। २१)

श्रीकृष्णांनी असे म्हटल्यावर कुन्तीपुत्र धनंजयाने युद्धक्षेत्रात (शस्त्रास्त्राने सुसज्ज अशी १ अक्षौहिणी नारायणी सेना सोडून) युद्ध न करणाऱ्या नि:शस्त्र त्या भगवान् श्रीकृष्णालाच (आपले सहाय्यक) निवडले.

सर्वसाधारण लोक भगवंतांनी दिलेल्या वस्तूला तर आपली समजतात. (जी आपली नाहीच) परंतु भगवंताला आपले समजत नाहीत (जे वास्तविक आपले आहेत). ते लोक वैभवशाली भगवंताला न पाहता त्यांच्या वैभवालाच पाहतात. वैभवालाच खरे समजल्याने त्यांची बुद्धी इतकी भ्रष्ट होते की, ते भगवंताचा अभावच समजत असतात अर्थात् भगवंताकडे त्यांची दृष्टी जातच नाही. काही लोक वैभवाच्या प्राप्तीसाठी भगवंताचे भजन करतात. भगवंताची इच्छा केल्याने तर भगवंताचे वैभव त्यांच्या बरोबरच येते. परंतु वैभवाची इच्छा केल्याने भगवान् येत नाहीत. वैभव तर भक्ताच्या चरणावर लोळत असते. परंतु निष्ठावंत भक्त वैभवाच्या प्राप्तीसाठी भगवंताचे भजन करीत नाहीत. ते वैभव इच्छित नाहीत, तर भगवंताचीच इच्छा करतात. वैभवाला इच्छिणारे मनुष्य वैभवाचे भक्त (दास) असतात आणि भगवंताना इच्छिणारे मनुष्य भगवंताचे भक्त होतात. अर्जुनाने वैभवा (नारायणी सेना) चा त्याग करून केवळ भगवंतालाच स्वीकारले. त्यामूळे युद्धक्षेत्राचे ठिकाणी भीष्माचार्य, द्रोणाचार्य, युधिष्ठिर (धर्मराज) इत्यादी महापुरुष असतानासुद्धा गीतेचा महान दिव्य उपदेश केवळ अर्जुनलाच प्राप्त झाला आणि शेवटी राज्यसुद्धा अर्जुनालाच मिळाले.

**स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः**—या पदांचे तात्पर्य हे नाही की, मी कर्मयोगाचे पूर्णतया निरूपण केले आहे. तर जे काही सांगितले आहे ते पूर्ण आहे. पुढे भगवंताच्या जन्माविषयी अर्जुनाने विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर देऊन भगवंतांनी पुनः त्याच कर्मयोगाचे वर्णन आरंभ केले आहे.

भगवान् म्हणतात की, सृष्टीच्या आरंभी मी सूर्याला जो कर्मयोग सांगितला होता, तोच आज मी तुला सांगितला आहे. फार काळ लोटल्याने तो योग अप्रगट झाला होता आणि मीही अप्रगट होतो. आता मीही अवतार घेऊन प्रगट झालो आहे आणि योगालाही पुनः प्रगट केले आहे. म्हणून अनादिकालापासून जो कर्मयोग माणसांना कर्मबंधनापासून मुक्त करीत येत आहे. तो आजही त्यांना कर्मबंधनातून मुक्त करीन.

**रहस्यं ह्येतदुत्तमम्**—ज्याप्रमाणे अठराव्या अध्यायाच्या सहासष्टाव्या श्लोकामध्ये भगवंतांनी अर्जुनासमोर "सर्वगुह्यतम" अशी गोष्ट प्रगट केली की, "तू मला शरण ये, मी तुला संपूर्ण पापापासून मुक्त करीन" त्याचप्रमाणे याठिकाणी "उत्तम रहस्य" प्रगट करीत आहेत की, "मीच सृष्टीच्या आरंभी सूर्याला उपदेश केला होता आणि तोच मी आज तुला उपदेश करीत आहे."

भगवान् जणू अर्जुनाला हे म्हणत आहेत की, तुझा सारथी होऊन तुझ्या आज्ञेचे पालन करणारा होऊनसुद्धा मी तुला आज तोच उपदेश करीत आहे, जो उपदेश मी सृष्टीच्या आरंभी सूर्याला केला होता. मी साक्षात् तोच आहे आणि आता अवतार घेऊन गुप्तरीतीने प्रगट झालो आहे. ही फार रहस्याची गोष्ट आहे. हे रहस्य आज मी तुझ्यासमोर प्रगट करीत आहे कारण तू माझा प्रिय मित्र आणि भक्त आहेस.

साधारण मनुष्याची तर गोष्ट सोडा साधकाची दृष्टी-सुद्धा उपदेशाकडे अधिक आणि उपदेष्टाकडे कमी जाते. या प्रसंगाला वाचल्या-ऐकल्यावर उपदिष्ट "योगा" वर तर दृष्टी जाते, परंतु उपदेष्टा भगवान् श्रीकृष्णच आदीनारायण आहेत—याकडे बहुतांशी दृष्टी जात नाही. जी गोष्ट साधारण रीतीने आकलन होत नाही, तीच गोष्ट रहस्यमय असते. भगवान् या ठिकाणी "**रहस्यम्**" पदाने आपला परिचय देत आहेत. ज्याचे तात्पर्य असे आहे की साधकाची दृष्टी नेहमी भगवंताकडे असावयास पाहिजे.

स्वतः ला "आदि उपदेष्टा" सांगून भगवान् जणू स्वतःला मानवमात्राचे "गुरू" प्रगट करीत आहेत. नाटकात आपली भूमिका वठवीत असताना मनुष्य आपले खरे स्वरूप प्रगट करीत नाही. परंतु आपल्या अत्यंत निकटच्या व्यक्ती-जवळ स्वतःचे खरे स्वरूपसुद्धा प्रगट करतो. तसे याठिकाणी मानवदेहामध्ये अवतार धारण करून देखील भगवान् अर्जुनासमोर आपले ईश्वरीय स्वरूप प्रगट करीत आहेत. अर्थात् जी गोष्ट गोपनीय ठेवावयास पाहिजे, ती गोष्ट प्रगट करीत आहेत, हेच उत्तम रहस्य आहे.

कर्मयोगालासुद्धा उत्तम रहस्य समजले जाऊ शकते. ज्या कर्माने जीव बांधला जातो (**कर्मणा बध्यते जन्तुः**) त्याच कर्माने त्याची मुक्ती होते—हे उत्तम रहस्य आहे. पदार्थांना आपले समजून आपल्यासाठी कर्म करण्याने बंधन होते आणि पदार्थांना आपले न समजता (दुसऱ्याचे समजून) केवळ दुसऱ्यांच्या हितासाठी निःस्वार्थभावपूर्वक सेवा करण्याने मुक्ती होते. अनुकूलता-प्रतिकूलता, धनवत्ता-निर्धनता, स्वस्थता-रुग्णता इत्यादी कशीही परिस्थिती असली तरी, प्रत्येक परिस्थितीत या कर्मयोगाचे पालन स्वतंत्रतेने होऊ शकते. कर्मयोगात रहस्यमय अशा तीन गोष्टी मुख्य आहेत.

(१) माझे काहीही नाही कारण माझे स्वरूप सत् (अविनाशी) आहे आणि जे काही मिळाले आहे, ते सर्व असत् (नाशवान्) आहे तर मग असत् माझे कसे होऊ शकते? अनित्याचा नित्याशी संबंध कसा होऊ शकतो?

(२) माझ्यासाठी काहीही नको. कारण स्वरूपामध्ये

कधी अपूर्ती अथवा उणीव नसतेच. मग कोणत्या वस्तूची कामना करावी? अनुत्पन्न अविनाशी तत्त्वासाठी उत्पन्न होणारी नाशवान् वस्तू कशी कामी येऊ शकते?

(३) आपल्यासाठी काहीही करावयाचे नाही. यामध्ये प्रथम कारण हे आहे की, "स्व" चेतन परमात्म्याचा अंश आहे आणि "कर्म" जड आहे. स्व नित्य निरंतर राहतो परंतु कर्माचा तसेच त्याच्या फलाचा आदि आणि अंत होत असतो. म्हणून आपल्यासाठी कर्म केल्याने आदि आणि अंत असणाऱ्या कर्म आणि फलाशी आपला संबंध जडतो. कर्म आणि फलाचा तर अंत होतो. परंतु त्याचा संबंध अंत:करणात राहतो, जो जन्म-मरण याला कारण होत असतो "**कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु।**" (१३।२१)

दुसरे कारण हे आहे की, "करणे" चे दायित्व (जबाबदारी) त्याच्यावर जाते जो करू शकतो अर्थात् ज्याचे ठिकाणी करण्याची योग्यता आहे आणि जो काही मिळवू इच्छितो. निष्क्रिय, निर्विकार, अपरिवर्तनशील आणि पूर्ण असल्याकारणाने चेतनस्वरूप शरीराच्या संबंधाशिवाय काहीही करू शकत नाही. म्हणून हे विधान मानावे लागेल की, स्वरूपाला आपल्यासाठी काहीही करावयाचे नाही.

तीसरे कारण हे आहे की, स्वरूप सत् आहे आणि पूर्ण आहे म्हणून त्याच्या ठिकाणी कधी उणीव येतच नाही, येण्याची शक्यताही नाही—"**नाभावो विद्यते सतः**" (२।१६) कमी येत नसल्याकारणाने त्याचे ठिकाणी काही मिळविण्याची इच्छाही नसते. यामुळे आपोआप सिद्ध होते की, स्वरूपावर "करणे" चे दायित्व नाही. अर्थात् त्याला आपल्यासाठी काहीही करावयाचे नाही.

कर्मयोगामध्ये "कर्म" तर संसारासाठी होतात आणि "योग" आपाल्यासाठी होतो. परंतु आपल्यासाठी कर्म केल्याने "योगा" चा अनुभव येत नाही. "योगा" चा अनुभव तेव्हाच येईल जेव्हा कर्माचा प्रवाह संपूर्णपणे संसाराकडेच जाईल. कारण शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, पदार्थ, धन, संपत्ती इत्यादी जे काही आपल्याजवळ आहे ते सर्वचे सर्व संसाराशी अभिन्न आहे, संसाराचेच आहे आणि ते संसाराच्या सेवेमध्येच लावावयाचे आहे. म्हणून पदार्थ आणि क्रियारूपी संसाराशी संबंध-विच्छेद करण्यासाठीच दुसऱ्यासाठी कर्म करणे आहे. हाच कर्मयोग आहे. कर्मयोग सिद्ध झाल्यास करण्याची आसक्ती, मिळविण्याची लालसा, जगण्याची इच्छा आणि मरण्याचे भय—हे सर्व नष्ट होतात.

जसे सूर्यप्रकाशात लोक अनेक कर्म करतात पण सूर्याचा त्या कर्माशी आपला काहीही संबंध राहत नाही, तसेच "स्व" (चेतना) च्या प्रकाशाने संपूर्ण कर्म होतात, परंतु "स्व" चा त्यांच्याशी काहीही संबंध राहत नाही कारण "स्व" चेतन तसेच अपरिवर्तनशील आहे आणि कर्म जड तसेच परिवर्तनशील आहे. परंतु जेव्हा "स्व" अज्ञानाने त्या पदार्थांशी आणि कर्माशी थोडासा देखील संबंध आपला मानतो. अर्थात् त्याला आपले आणि आपल्यासाठी मानतो तेव्हा ते कर्म अवश्यच त्याला बंधनात टाकतात.

नियतकर्माचा कोणत्याही अवस्थेत त्याग न करणे तसेच नियत समयी कार्यासाठी तत्पर राहणे ही सूर्याची स्वत:ची विलक्षणता आहे. कर्मयोगीसुद्धा सूर्याप्रमाणे आपल्या नियतकर्मांना नियत-समयी करण्यासाठी नेहमी तत्पर राहतो.

कर्मयोगाचे योग्य रीतीने पालन केले जात असेल आणि कर्मयोग्यामध्ये ज्ञानाचे संस्कार असतील तर त्याला ज्ञानाची प्राप्ती आणि जर भक्तीचे संस्कार असतील तर त्याला भक्ती आपोआप प्राप्त होते. कर्मयोगाचे पालन केल्याने आपलेच नव्हे, तर सर्व संसाराचेसुद्धा परमहित होत असते. दुसरे लोक पाहोत अथवा न पाहोत, समजोत अथवा न समजोत, मानोत अथवा न मानोत, आपल्या कर्तव्याचे योग्य रीतीने पालन केल्यास दुसऱ्या लोकांना कर्तव्य-पालनाची प्रेरणा आपोआप मिळते आणि अशा प्रकारे सर्वांची सेवाही होते.

## मार्मिक गोष्ट

गीतेमध्ये भगवंतांनी उपदेशाच्या आरंभी दुसऱ्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकापासून तीसाव्या श्लोकापर्यंत मनुष्यमात्राच्या अनुभवाचे (विवेक) वर्णन केले आहे. हा मनुष्यमात्राचाच अनुभव नाही तर सर्व जीवांचा अनुभव आहे. कारण की, "मी आहे" अशा आपल्या सत्तेचा अनुभव (असणेपणाचा) स्थावर-जंगम सर्व प्राण्यांना आहे. वृक्ष, पर्वत इत्यादींनासुद्धा याचा अनुभव आहे. परंतु ते याला व्यक्त करू शकत नाहीत. पशु-पक्ष्यात तर प्रत्यक्ष पाहण्यातसुद्धा येतो. जसे पशु-पक्षी आपसात भांडतात तर आपली सत्ता स्वीकारूनच भांडत असतात. जर त्यांना आपली वेगळी सत्ता असल्याचा अनुभव नसता तर ते कशाला भांडले असते? मनुष्याला तर याचा प्रत्यक्ष अनुभव आहेच. परंतु तो आपल्या अनुभवाकडे दृष्टी टाकीत नाही आणि त्याचा आदरही करीत नाही. या अनुभवालाच विवेक

अथवा निजज्ञान म्हणतात. हा विवेक सर्वांमध्ये सहज आहे. आणि भगवत्प्रदत्त आहे.

इंद्रिये, मन आणि बुद्धी प्रकृतीचे अंश आहेत म्हणून यांच्यापासून होणारे ज्ञान प्रकृतिजन्य असते. शास्त्र वाचून-ऐकून या इंद्रिये, मन, बुद्धीद्वारा जे पारमार्थिक ज्ञान होत असते. ते ज्ञान देखील एक प्रकारचे प्रकृतिजन्यच आहे. परमात्मतत्त्व या प्रकृतिजन्य ज्ञानापेक्षा अत्यंत विलक्षण आहे. म्हणून परमात्मतत्त्वाला निजज्ञाना (स्व ने होणारे ज्ञान) नेच जाणले जाऊ शकते. निजज्ञान अर्थात् विवेकाला महत्त्व दिल्याने, ''मी कोण आहे ? माझे काय आहे ? जड आणि चेतन काय आहे ? प्रकृती आणि परमात्मा काय आहे ?'' हे सर्व जाणण्याची शक्ती येते. हाच विवेक कर्मयोगातही कामाला येतो—ही मार्मिक गोष्ट आहे.

कर्मयोगात विवेकाच्या दोन गोष्टी मुख्य आहेत. (१) आपल्या असणेपणात (मी आहे) कोणताही संदेह नसतो आणि (२) आता ज्या वस्तू मिळाल्या आहेत त्यावर आपला काहीही अधिकार नाही. कारण त्या पूर्वी आपल्या नव्हत्या, आणि नंतरही आपल्या राहणार नाहीत. मी (स्व) निरंतर राहत असतो आणि ह्या मिळालेल्या वस्तू शरीर, इंद्रीये, मन, बुद्धी इत्यादी निरंतर बदलत राहतात आणि यांचा निरंतर वियोग होत असतो. जसे कर्माचा आरंभ आणि समाप्ती होत असते तसेच त्यांच्या फलाचासुद्धा संयोग आणि वियोग होत असतो. म्हणून कर्म आणि पदार्थांचा संबंध संसाराशी आहे ''स्व'' शी नाही. अशाप्रकारे विवेक जागृत होताच कामनेचा नाश होतो. कामनेचा नाश झाल्यास स्वत:सिद्ध निष्कामता प्रगट होते. अर्थात् कर्मयोग पूर्णत: सिद्ध होतो.

कामनेने विवेक झाकला जातो. (३।३८-३९). स्वार्थबुद्धी, भोगबुद्धी, संग्रहबुद्धीचा आश्रय असल्याने मनुष्य आपल्या कर्तव्याचा योग्य प्रकारे निर्णय करू शकत नाही.तो गुंत्याला गुंत्यानेच अर्थात् शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादीच्या द्वारा सोडवू इच्छितो आणि म्हणूनच तो वर्तमान परिस्थितीला बदलण्याचा प्रयत्न करतो. परंतु परिस्थिती बदलणे आपल्या हातातील गोष्ट नाही. म्हणून गुंता सुटण्याऐवजी तो गुंता अधिकच वाढत जातो. विवेक जागृत झाल्यावर जेव्हा स्वार्थबुद्धी, भोगबुद्धी, संग्रहबुद्धी राहत नाही तेव्हा आपले कर्तव्य स्पष्ट दिसू लागते आणि सर्व प्रकारच्या समस्या आपोआप सुटू लागतात.

बाहेरील परिस्थिती कर्मानुसारच असते. अर्थात् ते कर्माचेच फल आहे. धनवत्ता, निर्धनता, निंदा-स्तुती, आदर-निरादर, यश-अपयश, लाभ-हानी, जन्म-मरण, स्वस्थता-रुग्णता, इत्यादी सर्व परिस्थिती कर्माच्याच अधीन आहेत.* शुभ आणि अशुभ कर्मांच्या फलस्वरूपात अनुकूल आणि प्रतिकूल परिस्थिती समोर येत राहते. परंतु त्या परिस्थितीशी संबंध जोडून—त्याला आपली समजून सुखी-दुखी होणे मूर्खता आहे. तात्पर्य अनुकूल आणि प्रतिकूल परिस्थिती प्राप्त होणे तर कर्माचे फल आहे आणि त्यापासून सुखी-दुखी होणे आपले अज्ञान आहे. अर्थात् मूर्खतेचे फल आहे. कर्माचे फल समाप्त करणे तर आपल्या हातातली गोष्ट नाही. परंतु मूर्खता समाप्त करणे सर्वस्वी आपल्या हाती आहे. ज्याला समाप्त करू शकतो त्या मूर्खतेला (अज्ञानाला) तर समाप्त करीत नाही आणि ज्या परिस्थितीला बदलू शकत नाही त्या परिस्थितीला बदलण्याचा प्रयत्न करतो. ही फार मोठी चूक आहे. म्हणून आपल्या विवेकाला महत्त्व देऊन अज्ञान नष्ट केले पाहिजे आणि अनुकूल आणि प्रतिकूल परिस्थितीचा सदुपयोग करून त्यापासून उन्नत झाले पाहिजे, अर्थात् असंग झाले पाहिजे. जो कोणत्याही परिस्थितीशी संबंध न जोडता त्याचा सदुपयोग करतो. अर्थात् अनुकूल परिस्थितीत दुसऱ्याची सेवा करतो तसेच प्रतिकूल परिस्थितीमध्ये दु:खी होत नाही अर्थात् सुखाची इच्छा करीत नाही, तो संसारबंधनातून सुगमतेने मुक्त होतो.

ज्याची इच्छा मनुष्य करीत नाही ती प्रतिकूल परिस्थिती पूर्वी केलेल्या अशुभ (पाप) कर्माचे फल असते. म्हणून पाप कर्म तर करायलाच नको. एखाद्याला दु:ख होईल असे काम तर स्वप्नातही करू नये. परंतु वर्तमानकाळात (नवीन) पाप कर्म न करता देखील जेव्हा पूर्वीच्या पापकर्माच्या फलरूपाने प्रतिकूल परिस्थिती प्राप्त होते तेव्हा अंत: करणामध्ये चिंता, शोक, भय इत्यादी उत्पन्न होतात. याचे कारण असे आहे की, आम्ही चिंता, शोक, भय इत्यादी बरोबर घनिष्ट संबंध प्रस्थापित केले आहेत. जसे विक्री केलेली गाय आपल्या जुन्या ठिकाणाच्या परिचयामुळे वारंवार आपल्या घरी येते. परंतु तिला पुन: पुन: नवीन स्थानावर पोहचविल्यास मग ती जुन्या ठिकाण्यावर येण्याचे सोडून देते. तसेच आज आणि आत्ताच असा दृढ विचार करावा की, येणाऱ्या आणि जाणाऱ्या परिस्थितीशी संबंध जोडून चिंता, शोक करणे चूक आहे, ही चूक आम्ही आता करणार नाही तर मग हे चिंता, शोक येणे सोडून देतील.

विवेकाची पूर्ण जागृती झाली नसताही कर्मयोग्याच्या ठिकाणी एक निश्चयात्मिका बुद्धी राहत असते की, जे आपले नाही त्याच्याशी संबंध-विच्छेद करावयाचा आहे आणि सांसारिक सुखांना न भोगता केवळ सेवा करावयाची आहे.

* सुनहु भरत भावी प्रबल बिलखि कहेउ मुनिनाथ। हानि लाभु जीवनु मरनु जसु अपजसु बिधि हाथ॥ (मानस २।२७१)

या निश्चयात्मिकाबुद्धीमुळे त्याच्या अंत:करणात सांसारिक सुखांचे महत्त्व राहत नाही. मग "भोगामध्ये सुख आहे" अशा भ्रमामध्ये त्याला कोणीही टाकू शकत नाही. म्हणून या एका निश्चयावर अढळ राहिल्यास त्याचे कल्याण होते. सत्संग-स्वाधाय केल्याने अशा निश्चयात्मक- बुद्धीला शक्ती मिळते. म्हणून प्रत्येक साधकाने कमीत कमी असा कल्याणकारी निश्चय अवश्य केला पहिजे. असा निश्चय करण्यात सर्व स्वाधीन आहेत. कोणीही पराधीन नाही. यासाठी कोणाचीही किंचितसुद्धा साहाय्यता घेण्याची आवश्यकता नाही कारण ह्यासाठी "स्व" बलवान आहे.

***संबंध—*** *मीच सृष्टीच्या आरंभी सूर्याला उपदेश केला होता आणि तोच मी आज तुला उपदेश करीत आहे. हे ऐकून अर्जुनाच्या मनात ही जिज्ञासा जागृत होते की, जे आता माझ्यासमोर बसलेले आहेत, या भगवान् श्रीकृष्णांनी सृष्टीच्या आरंभी सूर्याला उपदेश कसा दिला होता? म्हणून ही गोष्ट स्पष्ट समजून घेण्यासाठी अर्जुन पुढील श्लोकात भगवंताला प्रश्न करीत आहेत.*

*अर्जुन उवाच*

**अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः।**
**कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति॥४॥**

अर्जुन म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भवतः** | = आपला | **परम्** | = अत्यंत पुरातन आहे (म्हणून) | **एतत्** | = हा योग |
| **जन्म** | = जन्म (तर) | | | **प्रोक्तवान्** | = सांगितला होता— |
| **अपरम्** | = आत्ताचा आहे (आणि) | **त्वम्** | = आपण (च) | **इति** | = ही गोष्ट (मी) |
| **विवस्वतः** | = सूर्याचा | **आदौ** | = सृष्टीच्या आरंभी (सूर्याला) | **कथम्** | = कशी |
| **जन्म** | = जन्म | | | **विजानीयाम्** | = समजून घेऊ? |

***व्याख्या—*** **अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः—** आपला जन्म तर आत्ताच काही वर्षा पूर्वी श्रीवसुदेवजींच्या घरी झाला आहे. परंतु सूर्याचा जन्म सृष्टीच्या आरंभी झाला होता. म्हणून आपण सूर्याला कर्मयोग कसा सांगितला होता?

अर्जुनाच्या या प्रश्नात तर्क अथवा आक्षेप नाही. तर जिज्ञासा आहे. ते भगवंताच्या जन्मासंबंधी रहस्याला सुगमतेने समजण्याच्या दृष्टीनेच प्रश्न करीत आहेत. कारण आपल्या जन्मासंबंधीच्या रहस्याला प्रगट करण्यासाठी भगवान्च सर्वसमर्थ आहेत.

**कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति—**मी आपणाला सृष्टीच्या आरंभी उपदेश करणारा कसे समजू? अर्जुनाच्या प्रश्नाचे तात्पर्य हे आहे की, सूर्याला उपदेश केल्यानंतर सूर्यवंशाच्या (मनु, इक्ष्वाकु इत्यादी) अनेक पिढ्या होऊन गेल्या आहेत आणि आपला अवतार आत्ताचा आहे. म्हणून आपण सृष्टीच्या आरंभी सूर्याला उपदेश कसा केला होता? ही गोष्ट मी चांगल्या रीतीने जाणून घेऊ इच्छितो. सूर्य तर आता देखील विद्यमान आहेत. म्हणून त्यांना आताही उपदेश केला जाऊ शकतो. परंतु आपण सूर्याला उपदेश दिल्यानंतर सूर्यवंशाच्या परंपरेचेही वर्णन केले आहे. यावरुन असे सिद्ध होते की, आपण सूर्याला उपदेश आत्ता केलेला नाही. म्हणून आपण सूर्याला कल्पाच्या आरंभी कसा उपदेश केला होता?

***संबंध—*** *अर्जुनाच्या प्रश्नाच्या उत्तरात आपले अवतार-रहस्य प्रगट करण्यासाठी भगवान् प्रथम आपल्या सर्वज्ञतेचे दिग्दर्शन करीत आहेत.*

*श्रीभगवानुवाच*

**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन।**
**तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परन्तप॥५॥**

श्रीभगवान् म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **परन्तप** | = हे परन्तप | **मे** | = माझे | **तव** | = तुझे |
| **अर्जुन** | = अर्जुन! | **च** | = आणि | **बहूनि** | = पुष्कळ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **जन्मानि** | = जन्म | **सर्वाणि** | = सर्वांना | **त्वम्** | = तू |
| **व्यतीतानि** | = होऊन गेले आहेत. | **अहम्** | = मी | **वेत्थ** | = जाणत |
| **तानि** | = त्या | **वेद** | = जाणतो (परंतु) | **न** | = नाहीस. |

***व्याख्या*—** [तीसऱ्या श्लोकामध्ये भगवंतांनी अर्जुनाला आपला भक्त आणि प्रिय सखा म्हटले होते. म्हणून मागील श्लोकात अर्जुन आपल्या अंत:करणतील गोष्ट नि:संकोच होऊन विचारत आहेत. अर्जुनाचे ठिकाणी भगवंताच्या जन्म-रहस्याला जाणून घेण्याची प्रबल जिज्ञासा उत्पन्न झालेली आहे. म्हणून भगवान् त्यांच्यासमोर मित्रत्वाच्या नात्याने आपल्या जन्माचे रहस्य प्रगट करीत आहेत. हा नियम आहे की, श्रोत्याची प्रबल जिज्ञासा झाल्यास वक्ता आपले गुह्य लपवू शकत नाही. म्हणून संत महात्मा देखील आपल्याबद्दल विशेष श्रद्धा ठेवणाऱ्यासमोर आपले रहस्य प्रगट करू शकतात*

**गुढउ तत्त्व न साधु दुरावहिं।**
**आरत अधिकारी जहँ पावहिं॥**

(मानस १।११०।१)

**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन**—यथा-समय माझे आणि तुझे पुष्कळ जन्म होऊन गेले आहेत. परंतु माझा जन्म वेगळ्या प्रकारचा (ज्याचे वर्णन पुढे सहाव्या श्लोकात करीन) आहे आणि तुझा (जीवाचा) जन्म वेगळ्या प्रकारचा आहे. (ज्याचे वर्णन आठव्या अध्यायाच्या एकोणीसाव्या आणि तेराव्या अध्यायाच्या एकवीसाव्या तसेच सव्वीसाव्या श्लोकात करीन) तात्पर्य माझे आणि तुझे पुष्कळसे जन्म झाले असले तरीही ते वेगवेगळ्या प्रकारचे आहेत.

दुसऱ्या अध्यायाच्या बाराव्या श्लोकात भगवंतांनी अर्जुनाला म्हटले होते की, मी (भगवान्) आणि तू तसेच हे राजेलोक (जीव) पूर्वी नव्हते आणि पुढे राहणार नाहीत—असे नाही. तात्पर्य भगवान् आणि त्यांचा अंश जीवात्मा—दोन्हीही अनादी आणि नित्य आहेत.

**तान्यहं वेद सर्वाणि**—संसारात असे ''जातिस्मर'' जीवसुद्धा असतात. ज्यांना आपल्या पूर्वजन्माचे ज्ञान असते. असे महापुरुष ''युञ्जान् योगी'' म्हणविले जातात. ते साधना करून सिद्ध झालेले असतात. साधनेमध्ये अभ्यास करीत असताना त्यांची वृत्ती इतकी तेज होते की, ते ज्या ठिकाणी आपली वृत्ती लावतात. त्याठिकाणचे त्यांना ज्ञान होते. असे योगी काही सीमेपर्यंतच पुरातन जन्म आठवू शकतात, संपूर्ण जन्मांना नव्हे. या उलट भगवान् ''युक्तयोगी'' म्हणविले जातात. जे साधना केल्याशिवाय स्वत: सिद्ध नित्ययोगी आहेत. जन्मांना जाणण्यासाठी त्यांना वृत्ती लावावी लागत नाही. त्यांचे ठिकाणी आपोआपच स्वत:च्या आणि इतर जीवांच्या पूर्वजन्माचे ज्ञान नित्य असते. त्यांच्या ज्ञानात भूत, भविष्य आणि वर्तमान ह्याचा भेद नसतो. तर त्यांच्या अखंड ज्ञानामध्ये सर्व काही नित्य वर्तमानच असते. (७।२६) कारण भगवान् संपूर्ण देश, काल, वस्तू, व्यक्ती, परिस्थिती इत्यादीमध्ये पूर्णरूपाने विद्यमान असूनसुद्धा यापासून संपूर्णपणे अलिप्त असतात.

[''मी त्या सर्वांना जाणतो''—भगवंताच्या या वचनाने साधकांना एक विशेष आनंद व्हावयास पाहिजे की, आम्ही भगवंताच्या जाणण्यामध्ये आहोत, भगवान् आम्हाला निरंतर पाहत आहेत. आम्ही कसेही का असेना परंतु भगवंताच्या ज्ञानात आहोत]

**न त्वं वेत्थ परन्तप**—जन्मांना न जाणण्यात मूळ कारण आहे—अंत:करणात नाशवान पदार्थांचे महत्त्व, आकर्षण असणे. याच कारणामुळे मनुष्याचे ज्ञान विकसित होत नाही. अर्जुनाच्या अंत:करणात नाशवान् पदार्थांचे, व्यक्तींचे महत्त्व होते; म्हणूनच ते कुटुंबियांच्या मरण्याच्या भीतीने युद्ध करू इच्छित नव्हते. पहिल्या अध्यायाच्या तेहतीसाव्या श्लोकात अर्जुनाने म्हटले होते की, ज्यांच्यासाठी आम्हाला राज्य, भोग आणि सुखाची इच्छा आहे. तेच हे कुटुंबीय प्राणाची आणि धनाची आशा सोडून युद्धासाठी उभे आहेत—यावरुन सिद्ध होत आहे की, अर्जुन राज्य, भोग आणि सुख इच्छित होते. म्हणून नाशवान् पदार्थांची कामना असल्याकारणाने ते आपल्या पूर्वजन्मांना जाणत नव्हते.

ममता आणि आसक्तीने स्वत:च्या सुखभोग आणि आरामासाठी धनादी पदार्थांचा संग्रह करणे ह्यास ''परिग्रह''

---

* संत-महात्मेसुद्धा स्वत: अप्रगट राहतात आणि सर्वासमोर प्रगट होत नाहीत. परंतु निम्नलिखित तीन प्रसंगी ते आपण आपल्याला प्रगट करतात.

(१) जेव्हा एखादा अत्यंत श्रद्धाळू समोर आल्यास आणि त्याच्या ठिकाणी त्यांना (संत महात्म्यांना) जाणून घेण्याची उत्कट अभिलाषा असेल तेव्हा.

(२) जेव्हा आपल्यासमोर एखाद्या प्रिय व्यक्तीचे प्राणोत्क्रमण होत आहे.

(३) जेव्हा संत-महात्म्याचे आपले म्हणविले जाणारे शरीर प्राणत्याग करीत आहे.

दुसऱ्या आणि तीसऱ्या प्रसंगी संत-महात्मा त्या व्यक्तीच्यासमोरसुद्धा आपले आपणाला प्रगट करतात ज्यांच्या ठिकाणी तितकी अधिक श्रद्धा नाही. परंतु तो त्या संत महात्म्याचा आदर करतो आणि त्यांना जाणून घेऊ इच्छितो.

म्हणतात. परिग्रहाचा संपूर्णपणे त्याग करणे अर्थात् आपल्या सुख, आराम, इत्यादीसाठी कोणत्याही वस्तूचा संग्रह न करणे ह्यास "अपरिग्रह" म्हणतात. अपरिग्रहाची दृढता झाल्यास पूर्वजन्माचे ज्ञान होते. "**अपरिग्रहस्थैर्ये जन्मकथन्तासंबोधः।**"

(पातञ्जलयोगदर्शन २।३९)

संसार (क्रिया आणि पदार्थ) सदैव परिवर्तनशील आणि असत् आहे. म्हणून त्याचा अभाव (कमी) होणे निश्चित आहे. अभावरूप संसाराशी संबंध जोडल्यामुळे मनुष्याला आपल्यातही अभाव दिसू लागतो. अभाव दिसल्यामुळे त्याचे ठिकाणी ही कामना उत्पन्न होते की, अभावाची तर पूर्तता व्हावी आणि आणखी नवनवीन मिळत जावे. अशा कामनांच्या पूर्तीसाठीच तो रात्रंदिवस प्रयत्नशील राहतो, परंतु कामनेची पूर्ती कधीही होणारीच नाही. कामने-मुळे मनुष्य भानरहित होतो. म्हणून अशा मनुष्याला अनेक जन्मांचे ज्ञान तर दूरच राहो, वर्तमान कर्तव्याचेसुद्धा ज्ञान (काय करीत आहे आणि काय केले पाहिजे) राहत नाही.

***संबंध***—*पूर्व श्लोकात भगवंतांनी सांगितले की, माझे आणि तुझे पुष्कळ जन्म झालेले आहेत. आता पुढील श्लोकात भगवान् आपल्या जन्माची (अवतार) विलक्षणता सांगत आहेत.*

**अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन्।**
**प्रकृतिं स्वामधिष्ठाय सम्भवाम्यात्ममायया॥ ६॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अजः** | = (मी) अजन्मा (आणि) | **भूतानाम्** | = संपूर्ण प्राण्यांचा | **प्रकृतिम्** | = प्रकृतीला |
| **अव्ययात्मा** | = अविनाशी-स्वरूपाचा | **ईश्वर** | = ईश्वर | **अधिष्ठाय** | = अधीन करून |
| **सन् अपि** | = असूनही (तसेच) | **सन्** | = असूनही | **आत्ममायया** | = आपल्या योगमायेने |
| | | **अपि** | = आपल्या | **सम्भवामि** | = प्रकट होतो. |
| | | **स्वाम्** | | | |

***व्याख्या***— [हा सहावा श्लोक आहे आणि यामध्ये सहा गोष्टींचे वर्णन आले आहे. अज, अव्यय, ईश्वर ह्या तीन गोष्टी भगवंताच्या आहेत * प्रकृती आणि योगमाया—या दोन गोष्टी भगवंताच्या शक्तीच्या आहेत आणि एक गोष्ट भगवंताच्या प्रगट होण्याची आहे]

**अजोऽपि सन्नव्ययात्मा**—या पदांनी भगवान् हे सांगत आहेत की, साधारण मनुष्यासारखे माझे जन्म-मरण नाही. मनुष्य जन्म घेतात आणि मरण पावतात. परंतु मी "**अजन्मा**" असूनही प्रगट होतो आणि "**अविनाशी**" असूनही अंतर्धान होतो. प्रगट होणे आणि अंतर्धान होणे—दोन्हीही माझ्या अलौकिक लीला आहेत.

संपूर्ण प्राणी जन्माच्या पूर्वी अप्रगट (अव्यक्त) होते. आणि मृत्यूनंतरही अप्रगट (अव्यक्त) होणारे आहेत. केवळ मध्यंतरीच प्रगट (व्यक्त) आहेत. (२।२८) परंतु भगवान् सूर्याप्रमाणे सदा सर्वकाळ प्रगट राहतात. तात्पर्य जसे सूर्य उदय होण्यापूर्वीही जसेच्या तसे राहतात आणि अस्तानंतरही जसेच्या तसे राहतात. अर्थात् सूर्य तर सदा सर्वकाळ राहतात. परंतु निरनिराळया ठिकाणी पृथ्वीवरील लोकांना स्थानविशेषामुळे त्यांचा उदय आणि अस्त होणे दिसत असते. तसेच भगवंताचे प्रगट होणे आणि अंतर्धान होणे लोकांच्या दृष्टीतून आहे.

* गीतेमध्ये भगवंतांनी आपल्या अज, अव्यय आणि ईश्वर या तीन रूपांना जाणणे आणि न जाणण्याविषयी म्हटले आहे जसे—
(१) "अज" स्वरूपाला जाणण्याविषयी—
यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम्। असम्मूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते॥ (१०।३)
न जाणण्याविषयी—
मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् (७।२५)
(२) "अव्यय" स्वरूपाला जाणण्याविषयी—
भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् (९।१३)
न जाणण्याविषयी—
परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम् (७।२४)
(३) "ईश्वर" स्वरूपाला जाणण्याविषयी—
भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम्। सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति। (५।२९)
न जाणण्याविषयी—
अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम्। परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम्॥ (९।११)

वास्तविक भगवान् नेहमीच प्रगट असतात.

दुसरे जीव कर्माने परतंत्र होऊन जन्म घेतात, भगवंताचा जन्म तसा नसतो. कर्माच्या परतंत्रतेने जन्म झाल्यास दोन गोष्टी होतात—आयू आणि सुखदु:खाचा भोग भगवंताचे ठिकाणी हे दोन्हीही नसतात.

दुसरे लोक जन्मतात तेव्हा प्रथम शरीर बालक असते. नंतर मोठे होऊन तरुण होते, पुढे वृद्ध होऊन समाप्त होते. परंतु भगवंतामध्ये हे परिवर्तन होत नाही. ते अवतार घेऊन बाललीला करतात आणि किशोर अवस्थे (पंधरा वर्षाची अवस्था) पर्यंत वाढण्याची लीला करतात. किशोर अवस्थेला पोहचल्यानंतर ते नेहमी किशोरच राहतात. शेकडो वर्ष लोटले तरी भगवान् तसेच सुंदर-स्वरूप राहतात. म्हणूनच भगवंताची जी चित्र तयार केली जातात. त्यात त्यांना दाढी-मिशा नसतात. (आता कोणी तसे चित्र काढील तर वेगळी गोष्ट आहे) अशा प्रकारे दुसऱ्या जीवाप्रमाणे भगवंताचा जन्म, परिवर्तन आणि मृत्यू होत नाही.

**भूतानामीश्वरोऽपि सन्**—संपूर्ण प्राण्यांचे एकमात्र ईश्वर (महान शासक) असूनही भगवान् अवताराचे वेळी अत्यंत लहान बालक होतात. परंतु बालक झाले तरी त्यांच्या ईश्वरभावा (शासकत्वा) मध्ये कोणतीही उणीव येत नाही. जसे भगवान् श्रीकृष्णांनी सहाव्या दिवशी पूतना राक्षसीला यमसदनाला पाठविले. पूतनेचे शरीर अडीच योजनाचे आणि महान् भयंकर होते. जर त्यांचे ठिकाणी ईश्वरभाव नसता तर सहाव्या दिवशी पूतनेला कसे मारले असते? भगवंतांनी तीन महिन्याच्या वयात शकटासुराला, एकवर्षाच्या अवस्थेत तृणावर्त आणि पाच वर्षाच्या अवस्थेत अघासुर यांना ठार केले. अशा प्रकारे भगवंतांनी बाल्यावस्थेतच अनेक राक्षसांना समाप्त केले. सात वर्षाच्या वयातच त्यांनी गोवर्धन पर्वताला करांगुलीवर उचलले.

संपूर्ण प्राण्यांचे ईश्वर असूनही भगवान् अवताराचे वेळी लहानात लहान बालक बनतात आणि लहानात लहान कामसुद्धा करतात. वास्तविक पाहता हीच भगवंताची भगवत्ता आहे. भगवान् अर्जुनाचे घोडे हाकतात आणि त्यांच्या आज्ञेचे पालन करतात. असे असले तरी भगवंताचा अर्जुनावर आणि दुसऱ्या जीवावर ईश्वरभाव जसाच्या तसाच असतो. सारथी झाले तरीही गीतेचा महान उपदेश अर्जुनाला करतात. भगवान् श्रीराम पिता दशरथांची आज्ञा मोडत नाहीत आणि चौदा वर्षासाठी वनवास पत्करतात. तरीही भगवंताचा दशरथावर आणि दुसऱ्या जीवावर ईश्वरभाव जसाच्या तसा राहतो.

**प्रकृतिं स्वामधिष्ठाय**—जी सत्त्व, रज आणि तम—या तीन गुणाहून वेगळी आहे ती भगवंताची शुद्ध प्रकृती आहे. ही शुद्ध प्रकृती भगवंताचे स्वकीय सच्चिदानन्दघनस्वरूप आहे. हिलाच संधिनीशक्ती, संवितशक्ती आणि आल्हादिनी शक्ती म्हणतात.* हिलाच चिन्मयशक्ती, कृपाशक्ती इत्यादी नावाने म्हटले जाते. श्री राधाजी† श्रीसीताजी इत्यादीसुद्धा ह्याच आहेत. भगवंताला प्राप्त करून देणारी "भक्ती" आणि "ब्रह्मविद्या" सुद्धा ह्याच आहेत.

प्रकृती भगवंताची शक्ती आहे. जसे अग्नीच्या ठिकाणी दोन शक्ती असतात—प्रकाशिका आणि दाहिका. प्रकाशिका शक्ती अंधकाराला दूर करून प्रकाश करते तसेच भीती नाहीशी करते. दाहिका शक्ती जाळते, तसेच वस्तूला शिजविते, तसेच थंडीही दूर करते. ह्या दोन्ही शक्ती अग्नी-पासून भिन्नही नाहीत आणि अभिन्नही नाहीत. भिन्न यामुळे नाही की, ती अग्नीरूपच आहे अर्थात् तिला अग्नीहून वेगळे केले जाऊ शकत नाही आणि अभिन्न यामुळे नाही की, अग्नी असतानासुद्धा मंत्र, औषध इत्यादीने अग्नीची दाहिका शक्ती कुंठित केली जाऊ शकते. तसेच भगवंतामध्ये जी शक्ती राहते, तिला भगवंताहून भिन्न आणि अभिन्न-दोन्हीही म्हणू शकत नाही.

जसे काड्याच्या पेटीत (माचिस) अग्नीची सत्ता तर सदा असते. परंतु त्याची प्रकाशिका आणि दाहिका शक्ती अप्रकट असते. तसेच भगवान् संपूर्ण देश, काळ, वस्तू, व्यक्ती इत्यादीमध्ये सदा राहतात. परंतु त्यांची शक्ती अप्रकट असते. त्या शक्तीला अधिष्ठित करून अर्थात् आपल्या वश करून त्याच्याद्वारा भगवान् प्रगट होतात. जसे जोपर्यंत अग्नी आपली प्रकाशिका आणि दाहिका शक्तीसह प्रगट होत नाही. तोपर्यंत नेहमी राहत असूनसुद्धा अग्नी दिसत नाही. तसेच जोपर्यंत भगवान् आपल्या शक्तीसह प्रगट होत नाहीत, तोपर्यंत भगवान् सदा असले तरीही दिसत नाहीत .

राधाजी, सीताजी, रुक्मिणीजी इत्यादी सर्व भगवंताच्या स्वत:च्या दिव्य शक्ती आहेत. भगवान् सामान्यरूपाने सर्व

---

* संधिनीशक्ती "सत्"-स्वरूपा, संवित्शक्ती "चित्"-स्वरूपा आणि आल्हादिनीशक्ती "आनन्द"-स्वरूपा आहे.

† अवताराच्या वेळी भगवान् आपल्या शुद्ध प्रकृतीरूपी शक्तीसहित अवतरित होतात आणि अवतार काळात या शक्तीपासून काम घेतात. श्रीराधाजी भगवंताची शक्ती आहे आणि त्यांच्या अनुगामिनी अनेक सखी आहेत. ज्या सर्व भक्तीरूपी आहेत आणि भक्ती प्रदान करणाऱ्या आहेत. भक्तीरहित मनुष्य यांना ओळखू शकत नाही. यांना भगवान् आणि श्रीराधाजीच्या कृपेनेच जाणणे शक्य आहे.

ठिकाणी राहत असले तरी कोणतेही काम करीत नाहीत. जेव्हा करतात तेव्हा आपल्या दिव्य शक्तीद्वाराच करतात. त्या दिव्य शक्तीद्वारा भगवान् विचित्र-विचित्र लीला करतात. त्यांच्या लीला इतक्या विचित्र आणि अलौकिक असतात की, त्यांचे श्रवण करून, गायन करून आणि स्मरण करूनसुद्धा जीव पवित्र होऊन आपला उद्धार करून घेतो.

निर्गुण उपासनेमध्ये तीच शक्ती "ब्रह्मविद्या" होते आणि सगुण उपासनेमध्ये तीच शक्ती "भक्ती" होते. जीव भगवंताचाच अंश आहे. जेव्हा तो दुसऱ्यांच्या ठिकाणी मानलेली ममता नष्ट करून एकमात्र भगवंताबद्दलच्या स्वतः- सिद्ध वास्तविक आत्मीयतेला जागृत करतो. तेव्हा भगवंताची शक्ती त्याचे ठिकाणी भक्तीरूपाने प्रगट होते. ती शक्ती इतकी विलक्षण आहे की, निराकार भगवंतालाही साकाररूपाने प्रगट करते. भगवंतालाही आकर्षित करते. ती भक्तीसुद्धा भगवानच देतात.

भगवंताच्या भक्तिरूपी शक्तीची दोन रूपे आहेत- विरह आणि मिलन. भगवान् विरहही पाठवितात आणि मिलनही पाठवितात*. जेव्हा भगवान् विरह पाठवितात तेव्हा भक्त भगवंताशिवाय व्याकूळ होतो. व्याकूळतेच्या अग्नीमध्ये संसाराची आसक्ती जळून जाते आणि भगवान् प्रगट होतात. ज्ञानमार्गामध्ये भगवंताची शक्ती प्रथम उत्कट जिज्ञासेच्या रूपात येते (ज्यामुळे तत्त्वाला जाणल्या- शिवाय साधकाला राहवत नाही) आणि मग ब्रह्मविद्या- रूपाने जीवाच्या अज्ञानाचा नाश करून त्याच्या वास्तविक स्वरूपाला प्रकाशित करते. परंतु ह्यापेक्षा भगवंताची ती दिव्यशक्ती जिला भगवान् विरहरूपाने पाठवितात ती विशेष विलक्षण आहे. भगवान् कोठे आहेत? काय करू? कोठे जाऊ? अशा प्रकारे भक्त व्याकूळ होतो. तर ही व्याकूळता सर्व पापांचा नाश करून भगवंताला साकार रूपाने प्रगट करते. व्याकूळतेने जेवढे लवकर काम होते तेवढे काम विवेक-विचाराने केले गेलेल्या साधनाने होत नाही.

## विशेष गोष्ट

भगवान् आपल्या प्रकृतीद्वारा अवतार घेतात आणि अनेक प्रकारच्या अलौकिक लीला करतात. जसे अग्नी स्वतः काहीही करत नाही, अग्नीची प्रकाशिका शक्ती प्रकाश करते, दाहिका शक्ती जाळते. तसेच भगवान् स्वतः काहीही करीत नाहीत. त्यांची दिव्य शक्तीच सर्व काम करते. शास्त्रामध्ये असे येते की, सीताजी म्हणतात "रावणाला मारणे इत्यादी सर्वकाम मी केले आहे. रामचंद्रांनी काहीही केले नाही"

जसे मनुष्य आणि त्याची शक्ती (ताकद) असते तसेच भगवान् आणि त्यांची शक्ती आहे. त्या शक्तीला भगवंतापासून वेगळीही म्हणू शकत नाही आणि एकरूपही म्हणू शकत नाही. मनुष्यामध्ये जी शक्ती असते तिला तो आपल्यापासून वेगळे करून दाखवू शकत नाही. म्हणून ती त्याच्यापासून वेगळी नाही. मनुष्य तसाच राहतो परंतु त्याची शक्ती कमी जास्त होते. म्हणून मनुष्याशी एकरूपही नाही. जर तिची मनुष्याशी एकरूपता असती तर ती त्याच्या स्वरूपाबरोबर तशीच राहिली असती. कमी जास्त झाली नसती. म्हणून भगवान् आणि त्यांच्या शक्तीला भिन्न अथवा अभिन्न काहीही म्हणू शकत नाही. दार्शनिकांनी भिन्नही म्हटले नाही आणि अभिन्नही म्हटले नाही. ती शक्ती अनिर्वचनीय आहे. भगवान् श्रीकृष्णाचे उपासक त्या शक्तीला श्री (राधाजी) जीच्या नावाने संबोधतात.

जसे पुरुष आणि स्त्री दोन असतात. तसे श्रीकृष्ण आणि श्रीराधाजी दोन नाहीत. ज्ञानात तर द्वैताचे अद्वैत असते अर्थात् दोन असूनही एक होते आणि भक्तीमध्ये अद्वैताचे द्वैत होते अर्थात् एक असूनही दोन होतात. जीव आणि ब्रह्म एक झाले तर "ज्ञान" होते आणि एकच ब्रह्म दोन रूपात आले तर "भक्ती" होते. एकच अद्वैततत्त्व प्रेमाची लीला करण्यासाठी, प्रेमाचे आस्वादन करण्यासाठी, संपूर्ण जीवांना प्रेमाचा आनंद देण्यासाठी श्रीकृष्ण आणि श्रीजी या दोन रूपा- मध्ये प्रगट होते.† दोन रूपे असूनही त्यापैकी कोण मोठा आहे आणि कोण लहान, कोण प्रेमी आणि कोण प्रेमास्पद? याचा पत्ताच लागत नाही. दोघेही एक दुसऱ्यापेक्षा वरचढ, विलक्षण दिसतात. दोघे एक दुसऱ्याकडे आकृष्ट होतात. श्रीजींना पाहून भगवान् प्रसन्न होतात आणि भगवंताना पाहून श्रीजी! दोघांच्या परस्पर प्रेम-लीलेने रसाची वृद्धी होते. यालाच रास म्हणतात.

भगवंताच्या शक्ती अनंत आहेत अपार आहेत. त्यांच्या दिव्य शक्तीमध्ये ऐश्वर्यशक्तीही आहे आणि माधुर्यशक्तीही! ऐश्वर्यशक्तीने भगवान् असे विचित्र आणि महान् कार्य करतात

* संतवाणीत आले आहे "दरिया हरि किरपा करी, बिरहा दिया पठाय।" अर्थात् भगवंतांनी कृपा करून माझ्यासाठी "विरह" पाठवून दिला आहे.

† येयं राधा यश्च कृष्णो रसाब्धिर्देहश्चैकः क्रीडनार्थं द्विधाभूत्। (श्रीराधातापनियोपनिषद)
"जे हे राधा आणि जे हे कृष्ण रसाचे सागर आहेत ते एकच आहेत. परंतु लीलेसाठी दोन रूपे झाली आहेत."

की, जे दुसरे कोणी करूच शकत नाही. ऐश्वर्यशक्तीमुळे त्यांच्या ठिकाणी जी महत्ता, विलक्षणता, अलौकिकता दिसते ती त्यांच्याशिवाय कोण्या दुसऱ्याच्या ठिकाणी पाहण्यात-ऐकण्यात येत नाही. माधुर्यशक्तीमध्ये भगवान् आपल्या ऐश्वर्याला विसरून जातात. भगवंतालाही मोहित करणाऱ्या माधुर्यशक्तीमध्ये एक मधुरता, गोडी असते ज्यामुळे भगवान् फारच मधुर आणि प्रिय वाटतात. जेव्हा भगवान् गोपाळांबरोबर खेळतात तेव्हा माधुर्यशक्ती प्रगट असते. जर त्यावेळी ऐश्वर्यशक्ती प्रगट झाली असती तर सर्व खेळ बिघडून गेला असता, गोपाळ भ्याले असते आणि भगवंताबरोबर खेळ खेळले नसते. तसेच भगवान् कुठे मित्ररूपाने, कुठे पुत्ररूपाने आणि कुठे पतीरूपाने प्रगट होतात त्यावेळी त्यांची ऐश्वर्यशक्ती लपलेली असते आणि माधुर्यशक्ती प्रगट राहते. तात्पर्य, भक्तांच्या भावानुसार भगवान् त्यांना आनंद देण्यासाठीच आपल्या ऐश्वर्यशक्तीला झाकून माधुर्यशक्ती प्रगट करतात.

ज्यावेळी माधुर्यशक्ती प्रगट राहते त्यावेळी ऐश्वर्यशक्ती प्रगट होत नाही आणि ज्यावेळी ऐश्वर्यशक्ती प्रगट राहते त्यावेळी माधुर्यशक्ती प्रगट होत नाही. माधुर्यभावात एखादी शंका उत्पन्न झाल्यासच ऐश्वर्यशक्ती प्रगट होते. जसे माधुर्यशक्ती प्रगट असताना भगवान् श्रीकृष्ण वासरांचा शोध लावतात. परंतु ''वासरे कुठे गेली'' ही शंका उत्पन्न होताच ऐश्वर्यशक्ती प्रगट होते आणि भगवान् तात्काळ जाणून घेतात की, वासरे ब्रह्मदेव घेऊन गेले आहेत.

भगवंतामध्ये एक सौंदर्यशक्तीही असते ज्यामुळे प्रत्येक जीव त्यांचे ठिकाणी आकृष्ट होतो. भगवान् श्रीकृष्णाच्या सौंदर्याला पाहून मथुरेच्या स्त्रीया परस्परास म्हणतात—

**गोप्यस्तपः किमचरन् यदमुष्य रूपं**
**लावण्यसारमसमोर्ध्वमनन्यसिद्धम् ।**
**दृग्भिः पिबन्त्यनुसवाभिनवं दुराप-**
**मेकान्तधाम यशसः श्रिय ऐश्वरस्य॥**

(श्रीमद्भा० १०।४४।१४)

''या भगवान् श्रीकृष्णाचे रूप संपूर्ण सौंदर्याचे सार आहे, संपूर्ण सृष्टीमध्ये कोणाचेही रूप यांच्या रूपासारखे नाही. यांचे रूप वेशभुषा अथवा केशभूषा कोणी सजवून सुंदर केली नाही तर स्वयंसिद्ध आहे. या रूपाला कितीही पाहिले तरी तृप्ती होत नाही. कारण हे नित्य नवीन राहते. संपूर्ण यश, सौंदर्य आणि ऐश्वर्य या रूपाच्या आश्रित असते. या रूपाचे दर्शन फार दुर्लभ आहे. त्या गोपींनी कोणते तप केले कुणास ठाउक? ज्या आपल्या नेत्रांच्या द्रोण्याने सतत या रूपमाधुरीचे पान करीत असतात.''

शुकदेवजी म्हणतात—

**निरीक्ष्य तावुत्तमपूरुषौ जना**
**मञ्चस्थिता नागरराष्ट्रका नृप।**
**प्रहर्षवेगोत्कलितेक्षणाननाः**
**पपुर्न तृप्ता नयनैस्तदाननम्॥**
**पिबन्त इव चक्षुर्भ्यां लिहन्त इव जिह्वया।**
**जिघ्रन्त इव नासाभ्यां श्लिष्यन्त इव बाहुभिः॥**

(श्रीमद्भा० १०।४३।२०-२१)

''परीक्षित, मञ्चावर जितके लोक बसले होते ते मथुरेचे नागरिक आणि राष्ट्राचा जन-समुदाय, पुरुषोत्तम भगवान् श्रीकृष्ण आणि बलरामजींना पाहून इतके प्रसन्न झाले की, त्यांचे नेत्र आणि मुखकमल हर्षोल्हासित झाले, उत्कंठेने भरून गेले. ते आपल्या नेत्रांनी भगवंताच्या मुखमाधुरीचे पान करीत असताना तृप्तच होत नव्हते, जणू ते भगवान् श्रीकृष्णांना व बलरामजींना नेत्रांनी पित आहेत, जिभेने चाटीत आहेत, नासिकेने वास घेत आहेत आणि बाहूंनी कवटाळून छातीशी घट्ट धरीत आहेत''.

भगवान् श्रीरामांच्या सौंदर्याला पाहून विदेही राजा जनकसुद्धा विदेही अर्थात् देहभान रहित होतात.

**मूरति मधुर मनोहर देखी। भयऊ बिदेहु बिदेहु बिसेषी॥**

(मानस १।२१५।४ )

आणि म्हणतात—

**सहज बिरागरूप मनु मोरा। थकित होत जिमि चंद चकोरा॥**

(मानस १।२१६।२)

वनात राहणारे कोल-भीलसुद्धा भगवंताच्या विग्रहाला पाहून मुग्ध होतात—

**करहिं जोहारू भेंट धरि आगे। प्रभुहि बिलोकहिं अति अनुरागे॥**
**चित्र लिखे जनु जहँ तहँ ठाढे। पुलक सरीर नयन जल बाढे॥**

(मानस २।१३५।३)

प्रेमींची तर गोष्ट सोडा, वैरभाव ठेवणारे राक्षस खर-दूषणसुद्धा भगवंताच्या सुंदर विग्रहाला पाहून आश्चर्य चकित होतात आणि म्हणतात—

**नाग असुर सुर नर मुनि जेते। देखे जिते हते हम केते॥**
**हम भरि जन्म सुनहु सब भाई। देखी नहिं असि सुंदर ताई॥**

(मानस ३।१९।२)

तात्पर्य भगवंताच्या दिव्य सौंदर्याकडे प्रेमी, विरक्त, ज्ञानी, मूर्ख, वैरी, असुर आणि राक्षसापर्यंत सर्वांचे मन आकृष्ट होते.

**सम्भवाम्यात्ममायया**—जे मनुष्य भगवंताशी विन्मुख राहतात त्यांच्यासमोर भगवान् आपल्या योगमायेत लपून राहतात आणि साधारण मनुष्यासारखेच दिसतात. मनुष्य

जसजसा भगवंताच्या सम्मुख होत जातो तसतसे भगवान् त्याच्यासमोर प्रगट होत जातात. याच योगमायेचा आश्रय घेऊन भगवान् विचित्र-विचित्र लीला करतात.*

भगवद्विमुख मूढ पुरुषासमोर दोन पडदे राहतात— एक तर आपल्या मूढतेचा आणि दुसरा भगवंताच्या योगमायेचा (७। २५)! आपल्या अज्ञानामुळे भगवंताचा प्रभाव साक्षात समोर प्रगट झाला तरीही त्याला तो समजू शकत नाही. जसे द्रौपदीचे वस्त्र-हरण करण्यासाठी दुःशासन आपले पूर्ण सामर्थ्य खर्ची घालतो, त्याचे बाहू थकतात परंतु साडीचा अन्त लागत नाही.

**द्रुपदा सुता निरबल भइ ता दिन, तजि आये निज धाम।**
**दुस्सासन की भुजा थकित भई, बसन-रूप भए स्याम॥**

अशाप्रकारे भगवंतांनी सभेसमोर आपले ऐश्वर्य साक्षात् प्रगट केले. परंतु आपल्या अज्ञानामुळे दुःशासन, दुर्योधन, कर्ण इत्यादीवर या गोष्टीचा काहीही परिणाम झाला नाही की, द्रौपदीने भगवंताला हाक मारल्याबरोबर किती विलक्षणता प्रगट झाली. एका स्त्रीचे वस्त्र-हरणसुद्धा करू शकले नाहीत तर मग आणखी काय करू शकतात? याकडे त्यांचे लक्ष गेलेच नाही. भगवंताचा प्रभाव समोर दिसत असतानासुद्धा त्याला ते जाणून घेऊ शकले नाहीत.

जर जीवाने आपली मूढता (अज्ञान) नाहीशी केली तर त्याला आपल्या स्वरूपाचा अथवा परमात्मतत्त्वाचा बोध तर होतो परंतु भगवंताचे दर्शन होत नाही.† भगवंताचे दर्शन जेव्हा भगवान् आपल्या योगमायेचा पडदा काढून घेतात, तेव्हाच होते. आपले अज्ञान नष्ट करणे तर जीवाच्या हातातली गोष्ट आहे. परंतु योगमायेला दूर करणे त्याच्या आवाक्यात नाही. तो संपूर्णपणे भगवंताला शरण झाल्यास भगवान् आपल्या शक्तीने त्याचे अज्ञान नष्ट करू शकतात आणि दर्शनसुद्धा देऊ शकतात.

भगवान् जेवढ्या लीला करतात त्या सर्व, योगमायेचा आश्रय घेऊनच करतात. याच कारणाने (भक्त) त्यांच्या लीलांना पाहू शकतो, त्याचा अनुभव करू शकतो. जर भगवंताने योग-मायेचा आश्रय घेतला नाही तर त्यांच्या लीलांना कोणीही पाहू शकणार नाही, त्याचे आस्वादन कोणी करू शकणार नाही.

## अवतारसंबंधी विशेष संकेत

अवतारचा अर्थ आहे—खाली उतरणे. सर्व ठिकाणी परिपूर्ण राहणारे सच्चिदानंदस्वरूपी परमात्मा आपल्या अनन्य भक्तांची इच्छा पूर्ण करण्यासाठी अत्यधिक कृपेने एखाद्या विशिष्ट ठिकाणी अवतार घेतात आणि लहान होतात. इतर लोकांचा प्रभाव अथवा महत्त्व तर मोठे झाल्याने होतो पण भगवंताचा प्रभाव अथवा महत्त्व त्यांनी लहान रूप धारण केल्याने होतो. कारण अपार, असीम, अनन्त असतानाही भगवान् लहान होतात. ही त्यांची विलक्षणताच आहे. जसे भगवान् अनन्त ब्रह्मांडांना धारण करतात परंतु एका पर्वताला धारण केल्याने भगवान् ''गिरधारी'' नावांने प्रसिद्ध झाले. अनन्त ब्रह्मांड ज्यांच्या रोमारोमामध्ये स्थित आहेत.‡ अशा परमेश्वरांनी एका पर्वताला उचलले ही काही त्यांच्यासाठी मोठी गोष्ट नाही तर, लहान गोष्ट आहे. परंतु लहान गोष्टीतच भगवंताची मोठी गोष्ट होते. अशा प्रकारे अवतार घेण्यामध्येच भगवंताची विशेषता आहे.

साधारण मनुष्य ज्या स्थितीत असतो त्याच स्थितीवर येऊन भगवान् तशीच लीला करतात. बिल्कुल भोळे भाळे सामान्य बालकाप्रमाणे होऊन लीला करतात. गोपबालका-बरोबर खेळत असताना ते त्यांच्याकडून हारले जात होते. जो ग्वालबाल जिंकायचा तो ''स्वार'' बनायचा, भगवान् घोडा बनायचे. ही त्यांची विशेष महत्ता आहे.

भगवंताच्या प्रभावाला जाणणारे ज्ञानी महात्मा लोक तर त्यांच्या स्वरूपात मस्त राहतात. परंतु भक्तांना त्यांची साधारण अज्ञ बालकाप्रमाणे भोळी भाळी लीला फारच विचित्र आणि मधुर वाटत असते. त्या ठिकाणी ज्ञान्यांचे ज्ञान चालत नाही. ज्ञान्यांचे शिरोमणी ब्रह्मदेव सुद्धा भगवंताची लीला पाहून चक्रावून गेले. मोठमोठे ऋषी-मुनी, योगी-तपस्वी, संत-महात्मेसुद्धा त्यांच्या लीलेच्या रहस्याला जाणू शकत नाहीत आणि या विषयात मौन धारण करतात. भगवंतच कृपाकरून ज्या आवडत्या आणि अंतरंग भक्तांना जाणवू इच्छितात तेच त्यांच्या लीलांच्या तत्त्वांना जाणतात **''सोई जानई जेहि देहु जनाई।''** (मानस २।१२७।२) गायी चारीत असताना गोपबालकांबरोबर खेळाचे वेळीही भगवान् मोठमोठे प्रभावशाली कार्य करतात. मोठमोठ्या बलवान राक्षसांनासुद्धा चुटकीसरशी

---

* योगमायेचा आश्रय घेऊनच भगवान् रासलीला करतात—
भगवानपि ता रात्रीः शरदोत्फुल्लमल्लिकाः। वीक्ष्य रन्तुं मनश्चक्रे योगमायामुपाश्रितः॥ (श्रीमद्भा० १०।२९।१)

†आपल्या स्वरूपाचा बोध झाल्यावर भगवंताचे दर्शन होइल असा काही नियम नाही. परंतु भगवंताचे दर्शन झाल्यावर आपल्या स्वरूपाचा बोध होतोच म्हणून भगवान् म्हणतात—
मम दरसन फल परम अनूपा। जीव पाव निज सहज सरूपा॥ (मानस ३।३६।५)

‡ रोम रोम प्रति लागे कोटि कोटि ब्रह्मंड (मानस १।२०१)

ठार करतात. लहान बालक होऊनसुद्धा त्यांचा प्रभाव जसाच्या-तसाच राहतो.

जसे एखादा मोठा विद्वान एखाद्या बालकाला वर्णमाला शिकवीत असेल तर तो त्या बालकाचा हात धरून त्याच्याकडून क, ख, ग लिहून घेतो आणि मुखाने ही तसेच उच्चारण करतो, परंतु याचा अर्थ असा नाही की, तो विद्वान स्वत: वर्णमाला शिकत असतो. तो तर बालकाच्या स्थितीमध्ये येऊन त्याला शिकवितो ज्यामुळे तो सुगमतेने शिकू शकेल. तसेच अनन्त ब्रह्मांड नायक भगवान् आम्हा लोकांच्या परिवारामध्ये येऊन, आमच्या समोर येतात आणि आमच्यासारखेच होऊन आम्हाला शिक्षण देतात. त्यांच्या फार मोठ्या अलौकिक विचित्र विचित्र लीला होतात. ज्यांचे श्रवण, पठन आणि गायन करण्यानेसुद्धा लोकांचा उद्धार होतो.

**परिशिष्ट भाव**—भगवान् प्रकृतीच्या साह्यानेच क्रिया (लीला) करतात. म्हणूनच सीताजी म्हणाते की, सर्व कार्य मी केले आहे, भगवान् रामांनी काहीही केले नाही (अध्यात्म रामायण बाल० पहिल्या अध्यायाच्या बत्तीसाव्यापासून त्रेचाळीसाव्या श्लोकापर्यंत). परंतु भगवान् मनुष्यासारखे प्रकृतीच्या अधीन नसतात—'**प्रकृतिं स्वामधिष्ठाय**'। कारण भगवंतासाठी प्रकृती 'पर' नाही, तर त्यांच्याशी अभिन्न आहे (गीता—सातव्या अध्यायाचा चौथा-पाचवा श्लोक). भगवंताला प्रकृतीत स्थित असलेल्या मनुष्यासमोर यावयाचे असते. म्हणून ते प्रकृतीला स्वीकार करून प्रकट होतात. तेव्हा मनुष्य त्यांना पाहू शकतो.

***संबंध**—आता भगवान् पुढील श्लोकात आपला अवतार धारण करण्याचा समय सांगतात.*

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम्॥ ७॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भारत** | = हे भरतवंशी अर्जुन! | **अधर्मस्य** | = अधर्माची | **अहम्** | = मी |
| **यदा, यदा** | = जेव्हा-जेव्हा | **अभ्युत्थानम्** | = वृद्धी | **आत्मानम्** | = आपण-आपल्याला |
| **धर्मस्य** | = धर्माची | **भवति** | = होते | **सृजामि** | = (साकाररूपाने) |
| **ग्लानि** | = हानि (आणि) | **तदा हि** | = तेव्हा-तेव्हाच | | प्रकट करतो. |

*व्याख्या*— **यदा यदा हि धर्मस्य........अभ्युत्थानमधर्मस्य**—भगवत्प्रेमी, धर्मात्मा, सदाचारी, निरपराध आणि निर्बल मनुष्यावर नास्तिक, पापी, दुराचारी आणि बलवान मनुष्यांचा अत्याचार वाढणे तसेच लोकांमध्ये सद्गुण-सदाचारांची आत्यंतिक उणीव आणि दुर्गुण-दुराचारांची आत्यंतिक वाढ होणे धर्माच्या हानीचे आणि अधर्माच्या वृद्धीचे स्वरूप आहे.

**यदा यदा**—पदाचे तात्पर्य जेव्हा जेव्हा आवश्यकता भासते तेव्हा तेव्हा भगवान् अवतार घेतात. एका युगातही जितक्या वेळी आवश्यकता आणि योग्य वेळ निर्माण होईल तितक्या वेळी भगवान् अवतार घेऊ शकतात. उदाहरणार्थ-समुद्र-मंथनाचे वेळी भगवंतांनी अजितरूप धारण करून समुद्र-मंथन केले. कच्छपा (कासव) च्या रूपाने मन्दराचल पर्वताला धारण केले. तसेच सहस्त्रबाहूरूपाने मन्दराचल पर्वताला वरच्या बाजूने दाबून धरले. नंतर देवतांना अमृत वाटण्यासाठी मोहिनीरूप धारण केले. अशा प्रकारे भगवंतांनी एकाच वेळी अनेक रूपे धारण केली होती.

अधर्माची वृद्धी आणि धर्माचा ह्रास होण्याला, नाशवान् पदार्थांचे आकर्षण मुख्य कारण आहे. जसे माता आणि पित्या-पासून शरीर निर्माण होते तसेच प्रकृती आणि परमात्म्या-पासून सृष्टी निर्माण होते. यामध्ये प्रकृती आणि प्रकृतीचे कार्य संसार तर क्षणाक्षणाला बदलत राहतो, कधीही एखादा क्षण सुद्धा एकरूप राहत नाही आणि परमात्मा तसेच त्यांचा अंश जीवात्मा—दोन्हीही संपूर्ण देश, काल इत्यादीत नित्य निरंतर राहतात. यामध्ये कधीही थोडेसुद्धा परिवर्तन होत नाही. जेव्हा जीव अनित्य, उत्पत्ति-विनाशशील प्राकृत पदार्थांपासून सुख घेण्याची इच्छा करू लागतो आणि त्यांच्या प्राप्तीमध्ये सुख समजू लागतो , तेव्हा त्याचे पतन होत जाते. लोकांची सांसारिक भोग आणि संग्रहामध्ये जसजशी आसक्ती वाढत जाते, तसतसा समाजात अधर्म वाढतो आणि जसजसा अधर्म वाढतो तसतसे समाजामध्ये पापाचरण, कलह, विद्रोह इत्यादी दोष वाढतात.

सत्ययुग, त्रेतायुग, द्वापारयुग आणि कलियुग—या चारी युगांकडे दृष्टी टाकल्यास यामध्येसुद्धा क्रमाक्रमाने धर्माचा ह्रास होत असतो. सत्ययुगात धर्माचे चारी चरण राहतात, त्रेतायुगात धर्माचे तीन चरण राहतात, द्वापारयुगात धर्माचे दोन चरण राहतात आणि कलियुगात धर्माचा केवळ एकच चरण शिल्लक राहत असतो. जेव्हा युगाच्या मर्यादेपेक्षाही अधिक धर्माचा ह्रास होतो तेव्हा भगवान् धर्माची पुन: स्थापना करण्यासाठी अवतार घेतात.

**तदात्मानं सृजाम्यहम्**—जेव्हा जेव्हा धर्माची हानी आणि अधर्माची वृद्धी होत असते तेव्हा तेव्हा भगवान् अवतार ग्रहण करतात. म्हणून भगवंताच्या अवतार घेण्याचे प्रयोजन, धर्माची स्थापना करणे आणि अधर्माचा नाश करणे, हे आहे.

धर्माची हानी आणि अधर्माची वृद्धी झाल्यास लोकांची प्रवृत्ती अधर्मामध्ये होते. अधर्मामध्ये प्रवृत्ती झाल्याने स्वाभाविक पतन होते. भगवान् प्राणीमात्राचे परम सुहृद् आहेत. म्हणून लोकांचे होणारे पतन थांबविण्यासाठी ते स्वतः अवतार धारण करतात.

कर्मामध्ये सकामभाव उत्पन्न होणे हीच धर्माची हानी आहे आणि आपापल्या कर्तव्यापासून च्युत होऊन निषिद्ध आचरण करणे हीच अधर्माची वृद्धी होय. ''काम'' अर्थात् कामनेनेच सर्वचे सर्व अधर्म, पाप, अन्याय इत्यादी होत असतात. (३।३७) म्हणून या कामाचा नाश करण्यासाठी तसेच निष्कामभावनेचा प्रसार करण्यासाठी भगवान् अवतार धारण करतात.

याठिकाणी ही शंका होऊ शकते की, वर्तमान-काळात धर्माचा ह्रास आणि अधर्माची वृद्धी फार होत आहे तर मग भगवान् का अवतार घेत नाहीत? याचे समाधान असे आहे की, युगाचा विचार केला असता अजून तशी वेळ आली नाही की, ज्यामुळे भगवंतांनी अवतार घ्यावा. त्रेतायुगात राक्षसांनी ऋषी-मुनी लोकांना मारून त्यांच्या हाडांचे ढीगचे ढीग लावले होते. हे तर त्रेता युगापेक्षाही कनिष्ठ प्रतीचे युग आहे. परंतु अजून धर्मात्मा पुरुष जगत आहेत. त्यांचा कोणी नाश करीत नाही. दुसरी गोष्ट अशी आहे की, जेव्हा धर्माचा ह्रास आणि अधर्माची वृद्धी होते तेव्हा भगवंताच्या आज्ञेने संत महात्मा या पृथ्वीवर जन्माला येतात अथवा पृथ्वीवरच विशेष साधक पुरुष प्रगट होतात आणि धर्माची स्थापना करतात. कधी कधी परमात्म्याला प्राप्त झालेले कारक पुरुष देखील जगाचा उद्धार करण्यासाठी पृथ्वीपर पुनः जन्म घेत असतात. साधक आणि संत महात्मे ज्या देशामध्ये राहतात त्या देशात अधर्माची फार वृद्धी होत नाही आणि धर्माची स्थापना होत राहते.

जेव्हा साधकांना आणि संत महात्म्यांना देखील लोक मानत नाहीत उलट त्यांचा विनाश करण्यास प्रवृत्त होतात आणि जेव्हा धर्माचा प्रचार करणारे लोक फारच कमी राहतात. तसेच ज्या युगामध्ये जसा धर्म रहावयास पाहिजे त्यापेक्षा देखील फारच अधिक प्रमाणात धर्माचा ह्रास होतो तेव्हा भगवान् स्वतः अवतार घेतात.

***संबंध**—पूर्व श्लोकात आपल्या अवतार धारण करण्याच्या वेळेचे वर्णन करून आता भगवान् आपल्या अवताराचे प्रयोजन सांगतात.*

# परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्।
# धर्मसंस्थापनार्थाय सम्भवामि युगे युगे॥८॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **साधूनाम्** | = साधूंचे (भक्तांचे) | **विनाशाय** | = विनाश करण्यासाठी | | स्थापना करण्यासाठी (मी) |
| **परित्राणाय** | = रक्षण करण्यासाठी, | **च** | = आणि | **युगे, युगे** | = युगा-युगात |
| **दुष्कृताम्** | = पाप कर्म करणाऱ्यांचा | **धर्म-संस्थापनार्थाय** | = धर्माची चांगल्या प्रकारे | **सम्भवामि** | = प्रगट होत असतो. |

*व्याख्या*— **परित्राणाय साधूनाम्**—साधू मनुष्यांकडूनच अधर्माचा नाश आणि धर्माचा प्रचार होत असतो, म्हणून त्यांचे रक्षण करण्यासाठी भगवान् अवतार घेतात.

दुसऱ्यांचे हित करणे हाच ज्यांचा स्वभाव आहे आणि जे भगवंताच्या नाम, रूप, गुण, प्रभाव, लीला इत्यादींचे श्रद्धा, प्रेमपूर्वक स्मरण, कीर्तन इत्यादी करीत असतात आणि लोकांमध्येही ह्याचाच प्रचार करतात. अशा भगवंताला आश्रित असलेल्या भक्तांसाठी या ठिकाणी ''**साधूनाम्**'' पद आले आहे.

ज्याचा एकमात्र उद्देश परमात्मप्राप्तीचा आहे तो साधू आहे *आणि ज्याचा उद्देश नाशवान संसार आहे तो असाधू आहे.

असत् आणि परिवर्तनशील वस्तूच्या ठिकाणी सद्‌भाव केल्याने आणि त्यांना महत्त्व दिल्याने कामना उत्पन्न होतात. जसजशा कामना नष्ट होतात तसतशी साधुता बाणते आणि जसजशा कामना वाढतात तसतशी साधुता लोपते. कारण असाधुतेचा मूळ हेतू कामनाच आहे. साधुतेने आपला उद्धार

* साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः (९।३०)

आणि लोकांवर आपोआप उपकार होतो.

साधू पुरुषाचा भाव आणि क्रिया ह्यामध्ये पशू, पक्षी, वृक्ष,पर्वत, मनुष्य, देवता, पितर, ऋषी, मुनी इत्यादी सर्वांचे हित सामावलेले असते.

**हेतु रहित जग जुग उपकारी। तुम्ह तुम्हार सेवक असुरारी॥**
(मानस ७।४७।३)

जर लोकांनी त्याच्या मनातील भाव जाणला तर ते त्याच्या चरणांचे दास होतील. या उलट जर लोकांनी दुष्ट पुरुषांच्या मनातील भाव जाणून घेतला तर दिवसातून कितीतरी वेळा त्याला बडवून काढतील.

या ठिकाणी शंका होऊ शकते की, जर भगवान् साधू पुरुषांचे रक्षण करत असतात तर मग संसारामध्ये साधू पुरुष दु:ख भोगताना का दिसतात? याचे समाधान असे आहे की, साधू पुरुषांच्या रक्षणाचे तात्पर्य त्यांच्या भावांचे रक्षण करणे आहे, शरीर धन-संपत्ती, मान-सन्मान इत्यादीचे रक्षण करणे नव्हे कारण ते त्या सांसारिक पदार्थांना महत्त्व देत नाहीत. भगवंत देखील या वस्तूंना महत्त्व देत नाहीत. कारण सांसारिक पदार्थांना महत्त्व देण्यानेच असाधुता निर्माण होते.

भक्तांचे ठिकाणी सांसारिक पदार्थांचे महत्त्व, उद्देश नसतोच, म्हणूनच तर ते भक्त होतात. भक्तलोक प्रतिकूलतेत (दु:खदायी परिस्थिती) विशेष प्रसन्न असतात. कारण प्रतिकूलतेमुळे जितका आध्यात्मिक लाभ होतो तितका कोणत्याही दुसऱ्या साधनाने होत नाही. वास्तविक भक्ती ही प्रतिकूलतेतच वाढत असते. सांसारिक आसक्तीनेच पतन होत असते आणि प्रतिकूलतेने आसक्ती नष्ट होते. म्हणून भगवंताचे भक्तांना प्रतिकूलता प्रदान करणेसुद्धा वास्तविक भक्तांचे रक्षण करणे आहे.

**विनाशाय च दुष्कृताम्**—दुष्ट मनुष्य अधर्माचा प्रचार आणि धर्माचा नाश करत असतात, म्हणून त्यांचा विनाश करण्यासाठी भगवान् अवतार घेतात.

जे मनुष्य कामनेच्या अत्यधिक वृद्धीमुळे खोटेपणा, कपट, छल, बेईमानी, इत्यादी दुर्गुण-दुराचाराचे ठिकाणी व्यस्त असतात, जे निरपराध सद्गुण, सदाचारी, साधूवर अत्याचार करत असतात,जे दुसऱ्याचे अहित करण्यामध्येच प्रवृत्त असतात, जे प्रवृत्ती आणि निवृत्तीला जाणत नाहीत, भगवंत आणि वेद-शास्त्रांचा विरोध करणेच ज्याचा स्वभाव बनलेला असतो, अशा असुरी संपत्तीमध्ये बुडालेल्या वाईट आचरण करणाऱ्या माणसांसाठी याठिकाणी "**दुष्कृताम्**" पद आले आहे. भगवान् अवतार घेऊन अशाच दुष्ट मनुष्यांचा विनाश करतात.

**शंका**—भगवान् तर सर्व प्राण्यांचे ठिकाणी सम असतात आणि त्यांचा कोणी वैरी नसतो. (**"समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्यः"** ९।२९) तर मग ते दुष्टांचा विनाश का करतात?

**समाधान**—संपूर्ण प्राण्यांचे परम सुहृद असल्याने भगवंताचा कोणीही वैरी नसतो. परंतु जो मनुष्य भक्तांचा अपराध करतो तो भगवंताचा वैरी बनतो.

**सुनु सुरेस रघुनाथ सुभाऊ। निज अपराध रिसाहिं न काऊ॥**
**जो अपराधु भगत कर करई। राम रोष पावक सो जरई॥**
(मानस २।२१८।२-३)

भगवंताचे एक नाव "**भक्तभक्तिमान्**" (श्रीमद्भा० १०।८६।५९) आहे म्हणून भक्तांना कष्ट देणाऱ्या दुष्टांचा विनाश भगवान् स्वत: करतात. पापाचा विनाश भक्त करतात आणि पाप्याचा विनाश भगवान् करतात.

साधु संताचे रक्षण करण्यामध्ये भगवंताची जितकी कृपा आहे, तितकीच कृपा दुष्टांचा विनाश करण्यामध्येही आहे* त्यांचा विनाश करून भगवान् त्यांना शुद्ध, पवित्र करतात.

संत-महात्मा धर्माची स्थापना करतात. परंतु दुष्टांच्या विनाशाचे कार्य ते करत नाहीत. दुष्टांचा विनाश करण्याचे कार्य भगवंताने आपल्या हातामध्ये ठेवले आहे. जसे साधारण मलम पट्टी करण्याचे काम तर कंपाउंडर करतो परंतु मोठे आपरेशन करण्याचे काम शल्य चिकित्सक स्वत: करत असतो, दुसरा नव्हे.

माता आणि पिता शल्य चिकित्सक दोघेही समानरूपाने बालकाचे हित इच्छितात. बालक जर शिकत नसेल, आडदांडपणा करीत असेल तर त्याला आईही समजावते आणि वडीलही समजावतात. बालक जर आडदांडपणा सोडत नसेल तर वडील त्याला मारतातही. परंतु जेव्हा बालक घाबरतो तेव्हा आई वडिलापासून त्याला सोडविते, मारू देत नाही. जरी माता पतिव्रता आहे, पतीचे अनुकरण करणे तिचा धर्म आहे तरीपण याचा असा अर्थ नाही की, पती जर बालकाला मारत असतील तर तिनेही त्यांच्याबरोबर मारू लागावे. जर तिने असे केले तर बालक बिचारा कुठे जाईल?

* (१) "अरिहुक अनभल कीन्ह न रामा" (मानस २।१८३।३)
(२) ये ये हताश्चक्रधरेण राजंस्त्रैलोक्यनाथेन जनार्दनेन।
ते ते गता विष्णुपुरीं प्रयाताः क्रोधोऽपि देवस्य वरेण तुल्यः॥ (पांडव गीता)
हे राजा, त्रैलोक्याधिपती चक्रधारी भगवान् जनार्दनाद्वारा जे लोक मारले गेले ते सर्व विष्णुलोकाला गेले. या देवाचा क्रोधसुद्धा वराप्रमाणेच कल्याणप्रद आहे.

बालकाचे रक्षण करण्यात तिचा पातिव्रत्य धर्म नष्ट होत नाही. कारण वास्तविक पाहिले तर वडीलही बालकाला मारू इच्छित नसतात तर त्याला दुर्गुण-दुराचारापासून दूर ठेवू इच्छितात. त्याचप्रमाणे भगवान् पित्यासमान आहेत आणि त्यांचे भक्त मातेसमान आहेत. भगवान् आणि संत महात्मा मनुष्यांना समजावितात. इतक्यावरही मनुष्याने आपला दुष्टपणा सोडला नाही तर त्यांचा विनाश करण्यासाठी भगवंताना अवतार घेऊन स्वत: यावे लागते. जर त्यांनी आपला दुष्टपणा सोडला तर त्यांना मारण्याची आवश्यकताच राहत नाही.

निर्गुणब्रह्म प्रकृती, माया, अज्ञान इत्यादींचा विरोधी नाही तर त्यांना सत्ता स्फूर्ती देणारा तसेच त्यांचा पोषक आहे. तात्पर्य प्रकृती, माया इत्यादीमध्ये जे काही सामर्थ्य आहे ते सर्व त्या निर्गुण ब्रह्माचेच आहे. त्याचप्रमाणे सगुण भगवान् देखील कोण्या जीवाबरोबर द्वेष, वैर अथवा विरोध ठेवीत नाहीत तर समान रीतीने सर्वांना सामर्थ्य देतात, त्यांचे पोषण करतात. एवढेच नव्हे तर भगवंतांनी निर्माण केलेली पृथ्वी-सुद्धा राहण्यासाठी सर्वांना सारखे स्थान देते. ती हा पक्षपात करीत नाही की, महात्म्याला तर विशेष स्थान द्यावे आणि दुष्टाला स्थान देऊ नये. तसेच अन्न सर्वांची भूक सारखी नाहीशी करते, पाणी सर्वांची तहान समानरूपाने नाहीशी करते, वायू सर्वांना प्राणवायू एकसारखा देत असतो, सूर्य सर्वांना एकसारखा प्रकाश देतात इत्यादी. जर पृथ्वी, अन्न, जल इत्यादी, दुष्टांना स्थान, अन्न, जल इत्यादी देणे बंद करतील तर दुष्ट जगूच शकणार नाहीत. अशा प्रकारे जर-भगवंताच्या विधानानुसार चालणारे पृथ्वी, अन्न, जल, वायू, सूर्य इत्यादींचे ठिकाणीसुद्धा इतकी उदारता, समता आहे, तर या विधानाचे विधायक (भगवान्) यांचे ठिकाणी केवढी विलक्षण उदारता, समता असेल! ते तर उदारतेचे भंडारच आहेत. जर विधायक (भगवान्) आणि त्यांच्या विधानाकडे थोडासाही दृष्टिपात केला तर मनुष्य गद्‌गद होईल आणि भगवंताच्या चरणी त्याला प्रेम निर्माण होईल.

भगवंताचा दुष्ट पुरुषांशी विरोध नाही तर त्यांच्या दुष्कर्मांशी विरोध असतो. कारण ते दुष्कर्म संसाराचे तसेच त्या दुष्टांचेसुद्धा अहित करणारे असतात. भगवान् सर्वांचे सुहृद आहेत. म्हणून ते संसाराचे तसेच त्या दुष्टांचेसुद्धा हित करण्यासाठीच दुष्टांचा विनाश करतात. त्यांच्याकडून जे दुष्ट मारले जातात त्यांना भगवान् आपल्या धामात पाठवितात.ही त्यांची केवढी विलक्षण उदारता आहे.

याठिकाणी असा प्रश्न होऊ शकतो की, जर आम्ही पाप-कर्मच करीत राहिलो तर आम्हालाही मारण्यासाठी भगवान् येतील काय? जर अशी गोष्ट असेल तर भगवंताच्या हाताने मरण आल्यास आमचे कल्याण होईलच. मग ज्यामध्ये संयम करावा लागतो. अशा श्रमसाध्य सद्‌गुण-सदाचाराचे पालन कशाला करायचे? याचे उत्तर असे आहे की, वास्तविक भगवान् त्याच पापी लोकांना मारण्यासाठी येतात. जे भगवंताशिवाय दुसऱ्या कोणाच्याने मरू शकत नाहीत. दुसरी गोष्ट शुभकर्मामध्ये जेवढे आचरण होईल तेवढे तर पुण्य होईलच. परंतु अशुभकर्माचे आचरण करीत असताना जर मध्येच मरण आले अथवा दुसऱ्या कोणी ठार केले तर कठीण होईल. भगवंताच्या हातून मृत्यू होऊन मुक्त होण्याची इच्छा पूर्ण कशी होईल? म्हणून अशुभकर्म करता कामा नये.

**धर्मसंस्थापनार्थाय**—निष्कामभावनेचा उपदेश, आदेश आणि प्रचारसुद्धा धर्माची स्थापना आहे. कारण निष्काम-भावनेच्या उणीवेने आणि असत् वस्तूंना सत्ता देऊन त्यांना महत्त्व दिल्यानेच अधर्म वाढतो, ज्यामुळे माणसे दुष्ट स्वभावाची बनतात. म्हणून भगवान् अवतार घेऊन आचरणद्वारा निष्कामभावनेचा प्रचार करतात. निष्कामभावनेच्या प्रचाराने धर्माची स्थापना आपोआप होते.

धर्माचा आश्रय भगवान् आहेत* (१४।२७) म्हणून शाश्वत धर्माची स्थापना करण्यासाठी भगवान् अवतार घेतात. संस्थापना करण्याचा अर्थ सम्यक् स्थापना करणे आहे. तात्पर्य धर्माचा कधीही नाश होत नाही. केवळ ह्रास होतो. धर्माचा ह्रास झाल्यास पुन: भगवान् त्याची चांगल्या रीतीने स्थापना करतात (४।१-३)

**सम्भवामि युगे युगे**—आवश्यकता पडल्यास भगवान् प्रत्येक युगामध्ये अवतार घेतात. एका युगातही जेवढ्या वेळेस जरूर पडेल तेवढ्या वेळा भगवान् अवतार घेतात. "कारक पुरुष"† आणि संत महात्म्यांच्या रूपामध्येही भगवंताचा अवतार होत असतो. भगवान् आणि कारक पुरुषांचा अवतार तर "नैमित्तिक" आहे, परंतु संत महात्म्यांचा अवतार "नित्य" मानलेला आहे.

येथे शंका येते की, भगवान् तर सर्वसमर्थ आहेत मग संतांचे रक्षण करणे, दुष्टांचा विनाश करणे आणि धर्माची

---

* (१) "श्रुति सेतु पालक राम तुम्ह" (मानस २।१२६)
(२) "धर्मस्य प्रभुरच्युत:" (महाभारत अनु० १४९।१३७)

† जे महापुरुष भगवंताला प्राप्त झाले आहेत आणि भगवद्धामात राहतात ते "कारक पुरुष" म्हटले जातात.

स्थापना करणे हे काम काय ते अवतार घेतल्याशिवाय करू शकत नाहीत ? याचे समाधान असे आहे की, भगवान् अवतार घेतल्याशिवाय हे काम करू शकत नाहीत, असे नाही. जरी भगवान् अवतार घेतल्याशिवाय सहजच हे सर्व काही करू शकतात आणि करतातही, तरी पण जीवावर विशेष कृपा करून त्यांचे काही वेगळेच कल्याण करण्यासाठी भगवान् स्वतः अवतीर्ण होतात. * अवतारकाळात भगवंताचे दर्शन, स्पर्श, वार्तालाप इत्यादीने, भविष्य काळात त्यांच्या दिव्य लीलांचे श्रवण, चिंतन आणि ध्यानाने तसेच त्यांच्या उपदेशानुसार आचरण करण्याने लोकांचा सहजच उद्धार होतो. अशा प्रकारे लोकांचा सदा उद्धार होतच रहावा. अशी एक रीत भगवान् अवतार घेऊनच चालवितात.

भगवंताचे कित्येक भक्त असे असतात की, जे भगवंता-बरोबर खेळु इच्छितात, त्यांच्याबरोबर राहू इच्छितात. त्यांची इच्छा पूर्ण करण्यासाठीही भगवान् अवतार घेतात, त्यांच्यासमोर येऊन त्यांच्यासारखे होऊन खेळतात.

ज्या युगामध्ये जेवढे कार्य आवश्यक असते भगवान् त्यानुसार अवतार घेऊन ते कार्य पूर्ण करतात. म्हणून भगवंताच्या अवतारामध्ये तर भेद असतो. परंतु स्वतः भगवंतामध्ये कोणताही भेद नसतो. भगवान् सर्वच अवतारामध्ये पूर्ण असतात आणि पूर्णच राहतात.

भगवंतासाठी कोणतेही कर्तव्य नाही आणि त्यांना काही मिळवायचेही शिल्लक नाही. (३।२२) तरीपण वेळोवेळी अवतार घेऊन केवळ संसाराचे हित करण्यासाठी सर्व कर्म करतात. म्हणून माणसांनी सुद्धा केवळ दुसऱ्यांच्या हितासाठीच कर्तव्यकर्म करावयास हवे.

चौथ्या श्लोकात आलेल्या अर्जुनाच्या प्रश्नाच्या उत्तरात भगवंतांनी मनुष्यांच्या जन्मात आणि आपल्या जन्मात (अवतारात) तीन मोठे फरक दाखविले आहेत—

(१) जाणून घेण्यामधील फरक—मनुष्यांचे आणि भगवंताचे पुष्कळ जन्म होऊन गेलेले आहेत. त्या सर्व जन्मांना मनुष्य जाणू शकत नाही परंतु भगवंत जाणतात (४।५)

(२) जन्मामधील फरक—मनुष्य प्रकृतीला परवश होऊन, आपण केलेल्या पाप-पुण्याचे फल भोगण्यासाठी आणि फलभोगपूर्वक परमात्म्याची प्राप्ती करून घेण्यासाठी जन्म घेतो. परंतु भगवंत आपल्या प्रकृतीला अधीन करून स्वतंत्रपणे आपल्या योगमायेने स्वतः प्रगट होतात (४।६)

(३) कार्यामधील फरक—सर्वसाधारणपणे मनुष्य आपल्या कामनापूर्तीसाठी कार्य करतो. जे वास्तविक पाहिले तर मनुष्यजन्माचे ध्येय नाही. परंतु भगवान् केवळ प्राणीमात्रांच्या कल्याणासाठी कार्य करतात (४।७-८)

*संबंध—चौथ्या श्लोकात आलेल्या अर्जुनाच्या प्रश्नाच्या उत्तरात भगवंतांनी आपल्या जन्माच्या दिव्यतेचे वर्णन आरंभ केले होते. आता आपल्याकडून निष्काम-कर्माचे (कर्मयोग) तत्त्व सांगण्याच्या उद्देशाने आपल्या जन्माच्या दिव्यतेबरोबर आपल्या कर्माच्या दिव्यतेला जाणून घेण्याचे माहात्म्य देखील वर्णन करतात.*

**जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः।**
**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन॥ ९॥**

**अर्जुन** = हे अर्जुन!
**मे** = माझे
**जन्म** = जन्म
**च** = आणि
**कर्म** = कर्म
**दिव्यम्** = दिव्य आहेत.
**एवम्** = अशा प्रकारे (माझ्या जन्म आणि कर्माला)
**यः** = जो मनुष्य
**तत्त्वतः** = तत्त्वाने
**वेत्ति** = जाणतो अर्थात् दृढतेने मानतो,
**सः** = तो
**देहम्** = शरीराचा
**त्यक्त्वा** = त्याग केल्यानंतर (मृत्यूनंतर)
**पुनः, जन्म** = पुनर्जन्माला
**न, एति** = प्राप्त होत नाही, (तर)
**माम्** = मला
**एति** = प्राप्त होतो.

***व्याख्या*— जन्म कर्म च मे दिव्यम्**—भगवान् जन्म मृत्यूपासून संपूर्णपणे अतीत—अजन्मा आणि अविनाशी आहेत. त्यांचा मनुष्यरूपामध्ये अवतार साधारण मनुष्याप्रमाणे नसतो. ते कृपापूर्वक संपूर्ण जीवांचे कल्याण करण्यासाठी स्वतंत्रतेने मनुष्यादीच्या रूपामध्ये जन्म-धारण करण्याची लीला करतात. त्यांचा जन्म कर्माच्या परवश नसतो. ते स्वतः-

* अनुग्रहाय भूतानां मानुषं देहमास्थितः। भजते तादृशीः क्रीडा याः श्रुत्वा तत्परो भवेत्॥ (श्रीमद्भागवत १०।३३।३७)

"भगवान् जीवावर विशेष कृपा करण्यासाठी आपल्याला मनुष्यरूपात प्रगट करतात आणि अशा लीला करतात ज्यांना ऐकून जीव भगवत्परायण होऊन जातील"

च्या इच्छेनेच शरीर धारण करतात.*

भगवंताचा साकार विग्रह जीवांच्या शरीराप्रमाणे हाडा-मांसाचा नसतो. जीवांचे शरीर तर पाप-पुण्यमय, अनित्य, रोगग्रस्त, लौकिक, विकारी, पंचभौतिक आणि रजवीर्यापासून उत्पन्न होणारे असते. परंतु भगवंताचा विग्रह पाप-पुण्याहून रहित, नित्य, अनामय, अलौकिक, विकाररहित, परमदिव्य आणि प्रगट होणारा असतो. इतर जीवांपेक्षा देवतांची शरीरेसुद्धा दिव्य असतात. परंतु भगवंताचे शरीर त्यांच्यापेक्षाही अत्यंत विलक्षण असते, ज्याचे देवतालोक-सुद्धा नेहमी दर्शन करू इच्छितात. (११।५२)

भगवान् जेव्हा श्रीराम तसेच श्रीकृष्ण यांच्या रूपात या पृथ्वीवर आले, तेव्हा ते माता कौसल्या आणि देवकीच्या गर्भातून उत्पन्न झाले नाहीत. प्रथम त्यांनी आपल्या शंख-चक्र-गदा-पद्मधारी स्वरूपाचे मातांना दर्शन देऊन नंतर ते मातेच्या प्रार्थनेनुसार बालरूपामध्ये लीला करू लागले. भगवान् श्रीरामासाठी गोस्वामी तुलसीदासजी म्हणतात—

**भए प्रगट कृपाला दीनदयाला कौसल्या हितकारी।**
**हरषित महतारी मुनि मन हारी अद्भुत रूप बिचारी॥**
**लोचन अभिरामा तनु घनस्यामा निज आयुध भुज चारी।**
**भूषन बनमाला नयन बिसाला सोभासिंधु खरारी॥**
**. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . ॥**
**माता पुनि बोली सो मति डोली तजहु तात यह रूपा।**
**कीजै सिसुलीला अति प्रियसीला यह सुख परम अनूपा॥**
**सुनि बचन सुजाना रोदन ठाना होइ बालक सुरभूपा॥**

श्रीभगवान् कृष्णासाठी आले आहे—

**उपसंहर विश्वात्मन्नदो रूपमलौकिकम्।**
**शङ्खचक्रगदापद्मश्रिया जुष्टं चतुर्भुजम्॥**
(श्रीमद्भा० १०।३।३०)

माता देवकीने म्हटले—"विश्वात्मन् शंख, चक्र, गदा आणि पद्म यांच्या शोभेने युक्त हे चार भुजा असलेले आपले अलौकिक दिव्य रूप आता लपवा" तेव्हा भगवंताने माता-पित्याच्यासमोर बघता बघता आपल्या मायेचा अंगीकार करून तात्काळ एका साधारण बालकाचे रूप धारण केले.

**पित्रोः सम्पश्यतोः सद्यो बभूव प्राकृतः शिशुः॥**
(श्रीमद्भा० १०।३।४६)

जेव्हा भगवान् श्रीराम आपल्या धामाला जात होते तेव्हा ते अंतर्धान झाले. जीवांच्या शरीराप्रमाणे त्यांचे शरीर येथे राहिले नाही. तर ते या शरीरानेच आपल्या धामाला गेले.

**पितामहवचः श्रुत्वा विनिश्चित्य महामतिः।**
**विवेश वैष्णवं तेजः सशरीरः सहानुजः॥**
(वाल्मिकीरामायण उत्तर ११०।१२)

"महामती भगवान् श्रीरामांनी पितामह ब्रह्मदेवाचे वचन ऐकून आणि त्याप्रमाणे निश्चय करून तिन्ही भावंडासह आपल्या त्याच शरीराने वैष्णव तेजात प्रवेश केला"

भगवान् श्रीकृष्णासाठीही अशीच गोष्ट आली आहे—

**लोकाभिरामां स्वतनुं धारणाध्यानमङ्गलम्।**
**योगधारणयाऽऽग्नेय्यादग्ध्वा धामाविशत् स्वकम्॥**
(श्रीमद्भा० ११।३१।६)

"धारणा आणि ध्यानासाठी अतिशय मंगलरूप अशा आपल्या लोकाभिराम मोहक मूर्तीला (शरीराला) योग-धारणाजनित अग्नीद्वारे भस्म न करता भगवंताने आपल्या परमधामामध्ये सशरीर प्रवेश केला".

भगवंताच्या विग्रहा (दिव्य शरीर) च्या विषयामध्ये महामुनी वाल्मिकीजी भगवान् श्रीरामांना म्हणतात—

**चिदानंदमय देह तुम्हारी। बिगत बिकार जान अधिकारी॥**
**नर तनु धरेहु संत सुर काजा। कहहु करहु जस प्राकृत राजा॥**
(मानस २।१२७।३)

एकदा सनकादी ऋषी वैकुंठ धामामध्ये जात होते. त्या ठिकाणी भगवंताच्या द्वारपालांनी त्यांना आतमध्ये प्रवेश करण्यास मनाई केली. तेव्हा सनकादी मुनींनी त्यांना शाप दिला. आपल्या द्वारपालांकडून सनकादिकांचा अपमान झालेला समजल्याने भगवान् स्वतः त्याठिकाणी उपस्थित झाले. त्यावेळी भगवंताचे दर्शन केल्यानंतर त्यांची अवस्था मोठी विलक्षण झाली. त्यांनी भगवंताच्या चरणावर प्रणाम केला—

**तस्यारविन्दनयनस्य पदारविन्द-**
**किञ्जल्कमिश्रतुलसीमकरन्दवायुः ॥**
**अंतर्गतः स्वविवरेण चकार तेषां**
**संक्षोभमक्षरजुषामपि चित्ततन्वोः॥**
(श्रीमद्भा० ३।१५।४३)

---

*(१) "निज इच्छाँ प्रभु अवतरइ" (मानस ४।२६)
(२) बिप्र धेनु सुर संत हित लीन्ह मनुज अवतार। निज इच्छा निर्मित तनु माया गुन गो पार॥ (मानस १।१९२)
(३) "उद्धवजी भगवंताला म्हणतात—
त्वं ब्रह्म परमं व्योम पुरुषः प्रकृतेः परः। अवतीर्णोऽसि भगवन् स्वेच्छोपात्तपृथग्वपुः॥
(श्रीमद्भा० ११।११।२८)

''प्रणाम केल्यानंतर त्या कमलनेत्र भगवंताच्या चरण कमलपरागाला लागलेल्या तुळशी मंजिरीच्या वायूने त्यांच्या नासिकारंध्रामध्ये प्रवेश करून, त्या अक्षर परमात्म्याच्या ठिकाणी नित्य स्थित राहणाऱ्या त्या ज्ञानी महात्म्याचे देखील मन आणि शरीर प्रफुल्लित केले''.

शब्दादी विषयामध्ये गंध काही इतकी विलक्षण वस्तू नाही की, ज्यामुळे मन आकृष्ट होईल. पण भगवंताच्या चरणकमलाच्या गंधाने नित्य-निरंतर परमात्मस्वरूपामध्ये मग्न राहणाऱ्या सनकादिकांच्या चित्तामध्येसुद्धा खळबळ उडाली. कारण तो पृथ्वीच्या ठिकाणी असलेला विकाररूपी गंध नव्हता. तर दिव्य गंध होता. तसेच भगवंताच्या विग्रहाची प्रत्येक वस्तू (वस्त्र-आभूषण, आयुध इत्यादी) दिव्य, चिन्मय आणि अत्यंत विलक्षण आहे.

भगवंताच्या लीला ऐकणे, वाचणे, पाठ करणे इत्यादीने लोकांचे अंत:करण निर्मळ, पवित्र होते आणि त्यांचे अज्ञान दूर होते. ही भगवंताच्या कर्माची दिव्यता आहे. ज्ञानस्वरूप भगवान् शंकर, ब्रह्मदेव, सनकादिक ऋषी, देवर्षी नारद इत्यादीसुद्धा त्यांच्या लीला गाऊन आणि ऐकून मग्न होतात. भगवंताच्या अवताराची जी लीलास्थले आहेत, त्या स्थानामध्ये आस्तिक भावनेने, श्रद्धाप्रेमाने निवास केल्याने तसेच त्यांचे दर्शन केल्याने सुद्धा मनुष्याचे कल्याण होते. तात्पर्य भगवान् संपूर्ण जीवांचे कल्याण करण्याच्या उद्देशाने अवतार घेतात आणि लीला करतात. म्हणून त्यांच्या लीला वाचण्या-ऐकण्याने, त्यांचे मनन चिंतन करण्याने स्वाभाविकच त्या उद्देशाची सिद्धी होते.

चौथ्या श्लोकात अर्जुनाने भगवंताला केवळ त्यांच्या ''जन्मा'' विषयी विचारले होते. परंतु येथे भगवंतांनी अर्जुनाने न विचारताच आपल्याकडून ''कर्मा'' विषयी सांगणे आरंभ केले. यावरुन भगवंताचा असा अभिप्राय दिसतो की, जसे माझी कर्म दिव्य आहेत तसे तुझी कर्मसुद्धा दिव्य व्हावयास हवी. कारण मनुष्याचा जन्म तर दिव्य होऊ शकत नाही. परंतु त्याचे कर्म अवश्य दिव्य होऊ शकतात. कारण त्याच्यासाठीच मनुष्यजन्म झाला आहे. कर्मामध्ये दिव्यता (शुद्धी) योगाने येते. जे कर्म बंधनकारक असते. त्यात दिव्यता आल्यास तेच कर्म मुक्ती देणारे होते. कर्म दिव्य (फलेच्छा, ममता, आसक्तिरहित) झाल्यास एक तर त्या कर्माने बंधन होत नाही आणि दुसरे तो मागील कर्मांपासून (संचित) ही बांधला जात नाही—मुक्त होतो आणि तीसरे त्याच्याद्वारा झालेल्या कर्माने दुसऱ्याचेही कल्याण आपोआप होत राहते.

गंभीरतापूर्वक विचार करून पाहिल्यास (लक्षात येते की) उत्पत्ति-विनाशशील पदार्थांशी आपला संबंध समजल्यानेच कर्मांमध्ये मलिनता येते आणि ते बंधन-कारक होतात. विनाशीशी आपला संबंध मानल्याने अंत:-करण, कर्म आणि पदार्थ—तिन्हीही मलीन होतात आणि विनाशीपासून मानलेला संबंध-विच्छेद झाल्यास हे तिन्ही आपोआप पवित्र होतात. म्हणून विनाशीशी मानलेला संबंध हीच मूळ बाधा आहे.

**एवं यो वेत्ति तत्त्वतः**—अविनाशी आणि अजन्मा असून तसेच प्राणीमात्राचा ईश्वर असूनसुद्धा भगवान् संपूर्ण जीवाच्या कल्याणासाठी आपल्या प्रकृतीला अधीन करून स्वतंत्रतेने युगा-युगात मनुष्य इत्यादींच्या रूपामध्ये अवतार घेतात. या तत्त्वाला जाणणे अर्थात् दृढतापूर्वक मानणे हेच भगवंताच्या दिव्यतेला जाणणे आहे.

संपूर्ण क्रिया करूनही भगवान् अकर्ताच आहेत. अर्थात् त्यांच्यात करण्याचा अभिमान नाही (४।१३). आणि कोणत्याही कर्माच्या फलामध्ये त्यांची स्पृहा (इच्छा) नाही (४।१४). या तत्त्वाला जाणणे भगवंताच्या कर्माच्या दिव्यतेला जाणणे आहे.

जसे भगवंताच्या जन्मामध्ये स्वाभाविकच प्राणीमात्राचे केवळ हित आणि कर्मामध्ये निर्लिप्तता आहे. त्याप्रमाणे मनुष्याच्या ठिकाणी देखील केवळ प्राणीमात्राचे हित आणि कर्मामध्ये निर्लिप्तता येणेच वास्तविक भगवंताचे जन्म आणि कर्मांना तत्त्वाने जाणणे आहे.

**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति**—भगवंताला त्रैलोक्यात काहीही करावयाचे नाही आणि काहीही मिळवावयाचे शिल्लक नाही (३।२२) तरीसुद्धा ते केवळ जीवमात्राचा उद्धार करण्यासाठी या पृथ्वीवर कृपापूर्वक अवतार घेतात आणि अनेक प्रकारच्या अलौकिक लीला करतात. लीलाना गायल्याने, ऐकल्याने, वाचल्याने आणि त्याचे चितंन केल्याने भगवंताशी संबंध जोडला जातो. भगवंताशी संबंध झाल्यास पुनर्जन्म होत नाही. अर्थात् मनुष्य जन्म-मरणरूप बंधनातून मुक्त होतो.

वास्तविक पाहता कर्म बंधनकारक नसतात. कर्मामध्ये

आपण प्रकृतीच्या पलीकडील पुरुषोत्तम तसेच चिदाकाशस्वरूप ब्रह्म आहात. असे असूनसुद्धा आपण स्वेच्छेनेच हे वेगळे शरीर धारण करून अवतार घेतला आहे''

बांधण्याची जी शक्ती आहे ती केवळ मनुष्याने स्वत: निर्माण केलेली (कामना) आहे. कामनेच्या पूर्तीसाठी आसक्तीने आपल्यासाठी कर्म करण्यानेच मनुष्य बांधला जातो. मग जसजशी कामनेत वृद्धी होते. तसतसा तो पापामध्ये प्रवृत्त होऊ लागतो. अशा प्रकारे त्याची कर्म अत्यंत मलीन होतात. ज्यामुळे त्याला वारंवार नीच योनी आणि नरकाची प्राप्ती होते. परंतु जेव्हा तो केवळ दुसऱ्याच्या सेवेसाठी निष्कामभावनेने कर्म करतो. तेव्हा त्याच्या कर्मामध्ये दिव्यता आणि विलक्षणता येत राहते. अशा प्रकारे कामनेचा संपूर्णपणे नाश झाल्यास त्याचे कर्म दिव्य होतात. अर्थात् बंधनकारक राहत नाहीत. मग त्याच्या पुनर्जन्माचा प्रश्नच राहत नाही.

**मामेति सोऽर्जुन**—नाशवान् कर्माशी आपला संबंध मानल्यानेच नित्यप्राप्त परमात्मासुद्धा अप्राप्त होतात. निष्काम-भावनेने केवळ दुसऱ्याच्या हितासाठी संपूर्ण कर्म करण्याने संपूर्ण कर्मांचा प्रवाह केवळ संसाराकडे होतो आणि नित्य-प्राप्त परमात्म्याचा अनुभव होतो.

जीवावर महान् कृपाच भगवंताच्या जन्माचे कारण आहे. अशा प्रकारे भगवंताच्या जन्माच्या दिव्यतेला जाणल्याने मनुष्याची भगवंताविषयी भक्ती निर्माण होते.* भक्तीने भगवंताची प्राप्ती होते. भगवंताच्या कर्माच्या दिव्यतेला जाणल्याने मनुष्याचे कर्मसुद्धा दिव्य होतात. अर्थात् ते बंधनकारक न राहता स्वत:-चे आणि दुसऱ्याचे कल्याण करणारे होतात. ज्यामुळे संसाराशी संबंध-विच्छेद होऊन भगवंताची प्राप्ती होते.

## मार्मिक गोष्ट

संपूर्ण कर्म आरंभ आणि समाप्त होणारी आहेत. (आणि कर्माचे फलस्वरूप जे काही प्राप्त होते तेही अनित्य आणि नाशवान् असते) परंतु स्व (जीवात्मा) नित्य निरंतर राहणारा आहे. म्हणून वास्तविक स्व चा कर्माशी कोणताही संबंध नाहीच तर मानलेला संबंध आहे. म्हणून संपूर्ण कर्म करत असतानाही त्यांच्याशी आपला संबंध नाहीच—असा अनुभव केला तर त्याची कर्म दिव्य होतात. हे कर्माचे तत्त्व आहे. हाच कर्मयोग आहे.

क्रियाशील प्रकृतीशी तादात्म्य झाल्यामुळे सर्व माणसां-मध्ये कर्म करण्याचा वेग राहतो. तो क्षणमात्रसुद्धा कर्म केल्या-शिवाय राहत नाही. (३।५) संसारात तो पाहतो की, कर्म करण्यानेच सिद्धी (वस्तूची प्राप्ती) होत असते. याच कारणाने तो परमात्म्याची प्राप्तीसुद्धा कर्मद्वाराच करू इच्छितो. परंतु हा त्याचा मोठा भ्रम आहे. कारण की, नाशवान् कर्मद्वारा नाशवान् वस्तूचीच प्राप्ती होते, अविनाशीची प्राप्ती होत नाही. अविनाशीची प्राप्ती तर कर्माशी संबंध-विच्छेद झाल्यानेच होते. कर्माशी संबंध-विच्छेद कर्मयोगात (ज्ञानयोगापेक्षा) सरळ रीतीने होतो. कारण कर्मयोगात स्थूल-सूक्ष्म आणि कारण—तिन्ही शरीरानी होणारे संपूर्ण कर्म निष्कामभावनेने केवळ संसाराच्या हितासाठी झाल्याने कर्माचा प्रवाह संसाराकडे होतो आणि आपला कर्माशी संबंध-विच्छेद होतो.

याठिकाणी भगवंतांनी "**माम् एति**" पदाने हाभाव प्रगट केला आहे की, मनुष्य कर्मद्वारा ज्याची सिद्धी इच्छितो ते परमात्मतत्त्व स्वत:सिद्ध (नित्यप्राप्त) आहे. स्वत:सिद्ध वस्तूसाठी करणे कशाला? जी वस्तू प्राप्त आहे तिला प्राप्त करणे कसे? करण्याने जी वस्तू पूर्वी अप्राप्त होती तिची प्राप्ती होते.

एक उत्पत्ती असते आणि एक शोध असतो. ज्याची स्वतंत्र सत्ता नाही आणि ज्याचा प्रथम अभाव आहे आणि नंतर विनाश होतो त्याची उत्पत्ती होत असते. ज्याची स्वतंत्र सत्ता आहे, जो प्रथमपासून विद्यमान आहे आणि नित्य निरंतर राहतो. परंतु जो क्रिया आणि पदार्थरूपी संसाराला महत्त्व दिले गेल्याने लपलेला असतो, त्याचा शोध होत असतो. जेव्हा मनुष्य क्रिया आणि पदार्थांना केवळ दुसऱ्याच्या सेवेमध्ये लावतो, तेव्हा क्रिया-पदार्थरूपी संसारापासून आपोआप संबंध-विच्छेद होतो आणि नित्य-प्राप्त परमात्म्याचा साक्षात् अनुभव होतो. हाच नित्यप्राप्ताचा शोध आहे.

कर्तव्यकर्म न करता प्रमाद-आळस करणे आणि कर्तव्यकर्म करून त्यांच्या फलाची इच्छा ठेवणे—या दोन्ही कारणांनी मनुष्याला नित्यप्राप्त परमात्म्याच्या अनुभवात बाधा होते. ही बाधा दूर करण्याचा उपाय आहे—फलाची इच्छा न ठेवता दुसऱ्याची सेवा करण्यासाठीच कर्तव्यकर्म करणे. फलाची इच्छा न ठेवताना कर्तव्यकर्म करण्याने कर्माशी संबंध-विच्छेद होतो. कर्माशी संबंध-विच्छेद होताच परमात्म्याशी आपला जो स्वत:सिद्ध नित्यसंबंध आहे त्याचा अनुभव होतो.

**परिशिष्ट भाव**—निष्कामभावाने केवळ दुसऱ्याच्या हितासाठी कर्म (सेवा) केल्यास अथवा भगवंतासाठी कर्म (पूजा) केल्यास ते कर्म दिव्य मुक्तिदायक होतात. परंतु कामनापूर्वक आपल्यासाठी केले गेलेले कर्म मलिन, बंधनकारक होतात.

* उमा राम सुभाउ जेहिं जाना। ताहि भजनु तजि भाव न आना

(मानस ५।३४।२)

कर्मांत कृर्तृत्वाचे न होणे हीच दिव्यता आहे. आपल्यासाठी काहीही न करण्याने कर्तृत्व राहत नाही.

भगवंताची लहानात लहान आणि मोठ्यात मोठी प्रत्येक क्रिया 'लीला' असते. भगवान् लीलेत सामान्य मनुष्यासारखी क्रिया करूनही निर्लिप्त राहतात (गीता—चौथ्या अध्यायाचा तेरावा श्लोक). भगवंताची लीला दिव्य असते. ही दिव्यता देवतांच्या दिव्यतेपेक्षाही विलक्षण असते. देवतांची दिव्यता मनुष्यांच्या अपेक्षेने झाल्यामुळे सापेक्ष आणि सीमित असते, परंतु भगवंताची दिव्यता निरपेक्ष आणि असीम असते. जरी जीवन्मुक्त, तत्त्वज्ञ, भगवत्प्रेमी महापुरुषांच्या क्रियाही दिव्य असतात, तरी त्याही भगवल्लीलेसारख्या नसतात. भगवंताची साधारण लीलाही अत्यंत अलौकिक असते. जसे, भगवंताची रासलीला लौकिक दिसते, परंतु ती ऐकल्याने-वाचल्याने साधकाच्या कामवृत्तीचा नाश होतो. (श्रीमद्भा० दशम स्कंध, तेहतीसावा अध्याय चाळीसावा श्लोक).

हे जगत् भगवंताचा आदि अवतार आहे—**'आद्योऽवतारः पुरुषः परस्य'** (श्रीमद्भा० २।६।४१). तात्पर्य हे आहे की, भगवंतच जगत्‌रूपाने प्रगट झाले आहेत. परंतु जीवाने भोगासक्तीमुळे जगताला भगवद्‌रूपाने स्वीकार न करता नाशवान् जगतरूपानेच धारण केले आहे—**'जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत्'** (गीता ७।५). ही धारणा समाप्त करण्यासाठी साधकाने असे मानावे की, जे दिसत आहे, ते भगवंताचे स्वरूप आहे आणि जे होत आहे, ती भगवंताची लीला आहे. असे मानल्यावर (स्वीकार केल्यावर) जगत् जगत्‌रूपाने राहणार नाही आणि 'भगवंताशिवाय काहीही नाही'—याचा अनुभव होईल. दुसऱ्या शब्दात, संसार लुप्त होईल आणि केवळ भगवान् राहतील. कारण प्रत्येक वस्तू आणि व्यक्ती याला भगवंताचे स्वरूप आणि प्रत्येक क्रिया भगवल्लीला मानल्याने भोगासक्ती, राग-द्वेष राहणार नाहीत. भोगासक्ती नष्ट झाल्यास ज्या क्रिया पूर्वी लौकिक दिसत होत्या, त्याच क्रिया अलौकिक भगवल्लीलारूपाने दिसू लागतील आणि जेथे पूर्वी भोगासक्ती होती तेथे भगवत्प्रेम होईल.

भगवान् जसे रूप धारण करतात, त्यानुरूपच लीला करतात.* जेव्हा ते अर्चावतार अर्थात् मुर्तीचे रूप धारण करतात, तेव्हा ते मूर्तीसारखेच अचल राहण्याची लीला करतात. जर ते अचल राहणार नाहीत तर तो अर्चावतार कसा म्हटला जाईल. भगवंताने राम, कृष्ण इत्यादी रूपही धारण केले आणि मच्छ, कच्छप इत्यादी रूपही धारण केले. त्यांनी जसे रुप धारण केले तशीच लीला केली. जसे वराहावतारात भगवंताने डुक्कर होऊन लीला केली आणि वामनावतारात ब्रह्मचारी ब्राह्मण होऊन लीला केली. यावरुन साधकाने हे समजून घ्यावे की, आत्ताही जे होत आहे, ती सर्व भगवंताची लीलाच होत आहे!

***संबंध***—*भगवंताच्या जन्म-कर्माच्या दिव्यतेला जाणणारे कसे असतात—याचे वर्णन पुढील श्लोकात करतात.*

**वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः।**
**बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः॥ १०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **वीतरागभयक्रोधाः** | = आसक्ती, भय आणि क्रोध यापासून संपूर्णपणे रहित, | | तल्लीन, | **पूताः** | = पवित्र झालेले |
| **मन्मयाः** | = माझ्याच स्वरूपात | **माम्** | = माझा (च) | **बहवः** | = पुष्कळसे (भक्त) |
| | | **उपाश्रिताः** | = आश्रय घेतलेले (आणि) | **मद्भावम्** | = माझ्या स्वरूपाला |
| | | **ज्ञानतपसा** | = ज्ञानस्वरूप तपाने | **आगताः** | = प्राप्त झाले आहेत. |

* भगवान् श्रीकृष्ण उत्तङ्क ऋषिंना म्हणतात—

धर्मसंरक्षणार्थाय धर्मसंस्थापनाय च॥
तैस्तैर्वेषैश्च रूपैश्च त्रिषुलोकेषु भार्गव।

(महाभारत, आश्व० ५४। १३-१४)

'मी धर्माचे रक्षण आणि स्थापनेसाठी तिन्ही लोकात पुष्कळ योनीत अवतार धारण करून त्या त्या रूप आणि वेष यांच्याद्वारा तदनुरूप आचरण करतो.'

यदात्वहं देवयोनौ वर्तामि भृगुनन्दन। तदाहं देववत् सर्वमाचरामि न संशयः॥
यदा गन्धर्वयोनौ वा वर्तामि भृगुनन्दन। तदा गन्धर्ववत् सर्वमाचरामि न संशयः॥
नागयोनौ यदाचैव तदा वर्तामि नागवत्। यक्षराक्षसयोन्योस्तु यथावद् विचराम्यहम्॥

(महाभारत, आश्व० ५४। १७-१९)

'भृगुनंदन! जेव्हा मी देवयोनींत अवतार घेतो, तेव्हा देवतांसारखेच सर्व आचार-विचार याचे पालन करतो, यात संशय नाही.'

'जेव्हा मी गन्धर्वयोनीत प्रगट होतो, तेव्हा माझे संपूर्ण आचार-विचार गन्धर्वासारखेच असतात, यात संशय नाही.'

'जेव्हा मी नागयोनीत जन्म ग्रहण करतो, तेव्हा नागासारखे वर्तन करतो. यक्ष आणि राक्षस यांच्या योनीत प्रकट झाल्यास मी त्यांच्याच आचार-विचाराचे यथावत् रूपाने पालन करतो.'

*व्याख्या*— **वीतरागभयक्रोधाः**—परमात्म्याशी विमुख झाल्याने नाशवान् पदार्थांविषयी "आसक्ती" निर्माण होते. आसक्तीने मग प्राप्त वस्तूविषयी "ममता" होते आणि अप्राप्ताविषयी "कामना" उत्पन्न होते. आसक्ती (प्रिय) असणाऱ्या पदार्थाची प्राप्ती झाल्यावर तर "लोभ" निर्माण होतो. परंतु त्याच्या प्राप्तीत बाधा झाल्यास (बाधा करणाऱ्या-विषयी) "क्रोध" उत्पन्न होतो. जर बाधा करणारी व्यक्ती आपल्यापेक्षा अधिक बलवान असेल आणि आपल्या आवाक्यात नसेल तर, तसेच प्रसंगी आपले तो अनिष्ट करील अशी शक्यता वाटत असेल तर "भय" निर्माण होते. अशा प्रकारे नाशवान् पदार्थांच्या आसक्तीनेच भय, क्रोध, लोभ, ममता, कामना इत्यादी सर्व दोषांची उत्पत्ती होत असते. राग (आसक्ती) नष्ट झाल्यावर हे सर्व दोष समाप्त होतात. पदार्थांना आपले आणि आपल्यासाठी न समजता, दुसऱ्यांचे आणि दुसऱ्यासाठी समजून त्यांची सेवा केल्याने आसक्ती समाप्त होते. कारण वास्तविक पदार्थ आणि क्रियेशी आपला संबंधच नाही.

आपले स्वतःचे काहीही प्रयोजन नसतानासुद्धा भगवान् केवळ आमच्या कल्याणासाठीच अवतार घेतात. कारण ते प्राणीमात्राचे परम सुहृद् आहेत आणि त्यांच्या संपूर्ण क्रिया सर्व जीवांच्या कल्याणासाठीच होतात. अशा प्रकारे भगवंताच्या परम सुहृदतेवर दृढ विश्वास झाल्यावर भगवंताविषयी आकर्षण होते. भगवंताविषयी आकर्षण झाल्यावर संसाराचे आकर्षण (राग) आपोआप नाहीसे होते. जसे बालकांचे लहानपणी दगड-गोट्याविषयी आकर्षण असते आणि त्याच्याशी ते खेळतात. खेळात दगड-गोट्यासाठी आपसात भांडतात. एक म्हणतो हा माझा आहे. दुसरा म्हणतो हा माझा आहे. अशा प्रकारे रस्त्यावर पडलेल्या दगड-गोट्याविषयीच त्यांना महत्त्व वाटते. परंतु जेव्हा ते मोठे होतात तेव्हा त्यांचे दगड-गोट्याविषयीचे आकर्षण समाप्त होते आणि रुपयाच्या ठिकाणी आर्कषण होते. रुपयात आकर्षण झाल्यावर त्यांना दगड-गोट्यामध्ये अथवा खेळण्यामध्ये काहीही महत्त्व दिसत नाही. तसेच जेव्हा मनुष्याची परमात्म्याकडे लगन लागते तेव्हा त्याच्यासाठी संसाराचे रुपये आणि सर्व पदार्थ आकर्षक न राहता फीके होतात. त्याचे संसाराविषयीचे आकर्षण आणि आसक्ती नष्ट होते. आसक्तीचा नाश होताच भय आणि क्रोध—दोन्हीही समाप्त होतात. कारण हे दोन्हीही आसक्तीच्याच आश्रित राहतात.

**मन्मयाः**—भगवंताच्या जन्म आणि कर्माच्या दिव्यतेला तत्त्वाने जाणल्याने मनुष्यांची भगवंताविषयी प्रियता होते, प्रियता झाल्याने ते भगवंतालाच शरण जातात आणि शरण झाल्याने ते स्वतः "**मन्मयाः**" अर्थात् भगवन्मय होतात.

सांसारिक भोगाविषयी आकर्षण असणारी माणसे सांसारिक कामनेमध्ये तन्मय होतात. "**कामात्मानः**" (२। ४३) आणि भगवंताविषयी आर्कषण असणारी माणसे भगवंतामध्ये तन्मय होतात "**तन्मयाः**" (नारदभक्तिसूत्र ७०) ते नित्य निरंतर भगवंतात तल्लीन असतात. त्यांचे विचार, आचरण, इत्यादीमध्ये भगवंताचीच मुख्यता राहते. प्रेमाच्या अधिक्यामुळे ते भगवत्स्वरूप होतात. जणू त्यांची स्वतःची कोणतीच वेगळी सत्ता राहत नाही.*

**मामुपाश्रिताः**—"**वीतरागभयक्रोधाः**" मध्ये संसाराशी स्वचा संबंध-विच्छेद आहे. आणि "**मन्मयाः माम् उपाश्रिताः**" मध्ये भगवंताविषयी तल्लीनता आहे.

कोणाचा ना कोणाचा आश्रय घेतल्याशिवाय मनुष्य राहू शकत नाही. भगवंताचा अंश जीव भगवंताशी विमुख होऊन दुसऱ्याचा आश्रय घेतो. पण तो आश्रय टिकत नाही. तर समाप्त होतो. धनादी नाशवान् पदार्थांचा आश्रय पतन करणारा असतो. एवढेच नव्हे, शुभ कर्म करण्यात बुद्धीचा, भगवत्प्राप्तीच्या साधनांचा तसेच भोग आणि संग्रहाच्या त्यागाचा आश्रय घेतल्यानेसुद्धा भगवत्प्राप्तीमध्ये उशीर लागतो. जोपर्यंत मनुष्याचा स्व (स्वरूपाने) भगवंताच्या आश्रित होत नाही तोपर्यंत त्याची पराधीनता समाप्त होत नाही आणि तो दुःख भोगतच राहतो.

संसाराच्या पदार्थांमध्ये मनुष्याचे आकर्षण आणि आश्रय वेगवेगळे असतात. जसे मनुष्याचे आकर्षण स्त्री, पुत्र इत्यादीमध्ये असते आणि आश्रय वडील माणसांचा असतो. परंतु भगवंताकडे आकृष्ट झालेल्या मनुष्याचे आकर्षण भगवंतामध्येच असते आणि भगवंताचाच आश्रय असतो. कारण प्रियातीप्रिय भगवानच आहेत आणि मोठ्यात-मोठे (वडील) सुद्धा भगवानच आहेत.

---

* गतिस्मितप्रेक्षणभाषणादिषु प्रियाः प्रियस्य प्रतिरूढमूर्तयः। असावहं त्वित्यबलास्तदात्मिका न्यवेदिषुः कृष्णविहारविभ्रमाः॥
(श्रीमद्भा० १०। ३०। ३)

आपल्या प्रियतम श्रीकृष्णाची हालचाल, हसणे, बोलणे इत्यादीमध्ये श्रीकृष्णाच्या आवडत्या गोपी त्यांच्यासारख्याच झाल्या. त्यांच्या शरीरामध्ये सुद्धा तंतोतंत तशाच प्रकारचे भाव उत्पन्न झाले. त्या स्वतःला संपूर्णपणे विसरून गेल्या आणि कृष्णस्वरूप झाल्या आणि त्यांच्याच विलासाचे अनुकरण करीत "मी कृष्णच आहे" असे म्हणू लागल्या.

**बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः**—जरी ज्ञानयोगा (सांख्यनिष्ठा) नेसुद्धा मनुष्य पवित्र होऊ शकतो. तरीपण येथे भगवंताच्या जन्म आणि कर्माच्या दिव्यतेला तत्त्वाने जाणण्याला ''ज्ञान'' म्हटले आहे. या ज्ञानाने मनुष्य पवित्र होतो. कारण भगवान् पवित्राती पवित्र आहेत. ''**पवित्राणां पवित्रं यः**'' भगवंताचाच अंश असल्याने जीवातही स्वतः स्वाभाविक पवित्रता आहे—''**चेतन अमल सहज सुख रासी**'' (मानस ७।११७।१) नाशवान् पदार्थांना महत्त्व देण्याने, त्यांना आपले समजल्यानेच जीव अपवित्र होतो. कारण नाशवान् पदार्थांची ममताच मल (अपवित्रता) आहे* भगवंताला जन्म, कर्माच्या तत्त्वाने जाणल्याने, जेव्हा नाशवान् पदार्थांचे आकर्षण , त्यांची ममता संपूर्णपणे नाहीशी होते तेव्हा सर्व मलिनता नष्ट होते आणि मनुष्य परम पवित्र होतो.

कर्मयोगाचा प्रसंग असल्याने उपर्युक्त पदांत आलेल्या ''**ज्ञान**'' शब्दाचा अर्थ कर्मयोगाचे ज्ञानसुद्धा मानले जाऊ शकते. कर्मयोगाचे ज्ञान—शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, पद, योग्यता, अधिकार, धन, जमीन इत्यादी मिळालेल्या सर्व वस्तू संसाराच्या आणि संसारासाठीच आहेत, आपल्या आणि आपल्यासाठी नाहीत. कारण हे आहे की, स्व (स्वरूप) नित्य आहे, म्हणून याच्याबरोबर अनित्य वस्तू कशा राहू शकतात? तसेच त्याच्या कामीही कशा येऊ शकतील? शरीरादी वस्तू जन्मापूर्वीही आपल्याबरोबर नव्हत्या आणि मेल्यानंतरही राहणार नाहीत. तसेच या समयीसुद्धा त्यांचा प्रतिक्षण आपल्यापासून संबंध-विच्छेद होत आहे. या मिळालेल्या वस्तूंचा सदुपयोग करण्याचाच आपला अधिकार आहे, आपली समजण्याचा अधिकार नाही. या वस्तू संसाराच्याच आहेत म्हणून यांना संसाराच्याच सेवेत लावावयाचे आहे. हाच त्यांचा सदुपयोग आहे. त्यांना आपले आणि आपल्यासाठी समजणे हेच वास्तविक पाहता बंधन अथवा अपवित्रता आहे.

अशा प्रकारे नाशवान् वस्तूंना आपले आणि आपल्यासाठी न मानणे ''ज्ञानतप'' आहे. ज्यामुळे मनुष्य परम पवित्र होतो. जितकी तप आहेत त्या सर्वापेक्षा श्रेष्ठ ''ज्ञानतप '' आहे. या ज्ञानतपाने जडाशी मानलेल्या संबंधाचा संपूर्णपणे विच्छेद होतो. जोपर्यंत मनुष्य जडाशी आपला संबंध मानत राहतो तोपर्यंत दुसऱ्या तपश्चर्याने त्याची तितकी पवित्रता होत नाही जितकी पवित्रता ज्ञानतपाने जडाचा संबंध-विच्छेद करण्याने होते. या ज्ञानतपाने पवित्र होऊन मनुष्य भगवंताच्या भावाला (सत्तेला) अर्थात् सच्चिदानंदघन परमात्मतत्त्वाला प्राप्त होतो. तात्पर्य जसे भगवान् नित्य निरंतर राहतात तसेच तो देखील त्यांचे ठिकाणी नित्य निरंतर राहतो जसे भगवान् निर्लिप्त-निर्विकार राहतात, तसेच तो देखील निर्लिप्त निर्विकार राहतो. जसे भगवंतासाठी काही करणे शेष नसते तसेच त्याच्यासाठी-ही काही करणे शिल्लक नसते. ज्ञानमार्गानेसुद्धा मनुष्य अशा प्रकारे भगवंताच्या भावाला प्राप्त होतो (१४।१९)

या पूर्वीही पुष्कळ भक्त ज्ञानतपाने पवित्र होऊन भगवंताला प्राप्त झाले आहेत. म्हणून साधकांनी वर्तमान काळांतसुद्धा ज्ञानतपाने पवित्र होऊन भगवंताला प्राप्त करून घ्यावे. भगवंताला प्राप्त करण्यात सर्व स्वतंत्र आहेत. कोणीही परतंत्र नाही. कारण मानवशरीर भगवत्प्राप्तीसाठीच मिळालेले आहे.

***संबंध**—जन्माच्या दिव्यतेचे तर वर्णन झाले आता कर्माची दिव्यता कशी असते या विषयाला आरंभ करतात.*

**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्।**
**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः॥११॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पार्थ** | = हे पृथानंदन! | **अहम्** | = मी | **मनुष्याः** | = सर्वच मनुष्य |
| **ये** | = जे भक्त | **तान्** | = त्यांना | **सर्वशः** | = सर्व प्रकाराने |
| **यथा** | = ज्या रीतीने | **तथा, एव** | = त्याच रीतीने | **मम** | = माझ्या |
| **माम्** | = मला | **भजामि** | = आश्रय देतो, (कारण) | **वर्त्म** | = मार्गाचे |
| **प्रपद्यन्ते** | = शरण येतात, | | | **अनुवर्तन्ते** | = अनुसरण करतात. |

***व्याख्या**—* **ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्**—भक्त ज्या भावनेने, जो संबंध स्वीकारून, ज्या पद्धतीने भगवंताला शरण जातो, भगवंतही त्याच भावनेने, त्याच संबंधाने, त्याच पद्धतीने त्याला आश्रय देतात. जसे भक्त भगवंताला आपला गुरू मानत असेल तर ते श्रेष्ठ गुरू होतात, शिष्य मानत असेल तर श्रेष्ठ शिष्य होतात, माता-पिता मानत असेल तर

* ''ममता मल जरि जाइ'' (मानस ७।११७ क)
''ममतामेध्य दूषितः'' (योगवासिष्ठ ६।२।५३।११)

श्रेष्ठ माता-पिता होतात, पुत्र मानत असेल तर श्रेष्ठ पुत्र होतात, भाऊ मानत असेल तर श्रेष्ठ भाऊ होतात, सखा मानत असेल तर श्रेष्ठ सखा होतात, नोकर मानत असेल तर श्रेष्ठ नोकर होतात. भक्त भगवंताविना व्याकूळ होत असेल तर भगवंतही भक्ताविना व्याकूळ होतात.

अर्जुनाचा भगवान श्रीकृष्णाविषयी सखाभाव होता. तसेच ते त्यांना आपले सारथी करू इच्छित होते. म्हणून भगवान् सखाभावाने त्यांचे सारथी झाले. विश्वामित्र ऋषींनी भगवान् श्रीरामांना आपले शिष्य मानले तर भगवान त्यांचे शिष्य झाले. अशा प्रकारे भक्तांच्या श्रद्धा भावनेनुसार भगवंताचा तसाच होण्याचा स्वभाव आहे.

अनन्त ब्रह्मांडाचे स्वामी भगवान् असूनसुद्धा आपणच निर्माण केलेल्या सामान्य मनुष्यांच्या भावानुसार वर्तन करतात. ही त्यांची केवढी विलक्षण उदारता, केवढा दयाळूपणा आणि आपलेपणा आहे?

भगवान् विशेषत्वाने भक्तांसाठीच अवतार घेतात—असे प्रस्तुत प्रकरणावरुन सिद्ध होते. भक्तलोक ज्या भावनेने, ज्या रूपामध्ये सेवा करू इच्छितात, भगवंताना त्यांच्यासाठी त्याच रूपामध्ये यावे लागते. जसे उपनिषदामध्ये आले आहे "**एकाकी न रमते**" (बृहदारण्यक १।४।३) भगवंताचे एकट्याचे मन लागले नाही (एकट्याला करमले नाही) तर तेच अनेक रूपाने प्रगट होऊन खेळ खेळू लागले. तसेच भक्तांच्या मनात जेव्हा भगवंताबरोबर खेळ खेळण्याची इच्छा होते तेव्हा भगवान् त्यांच्याबरोबर खेळ खेळण्यासाठी (लीला करण्यासाठी) प्रगट होतात. भक्त भगवंताशिवाय राहू शकत नाही तर भगवानही भक्ताशिवाय राहू शकत नाहीत.

या ठिकाणी आलेले "**यथा**" आणि "**तथा**" या वाचक पदांचा अभिप्राय "संबंध", "भाव" आणि "तन्मयता" यांच्याशी आहे. भक्त आणि भगवंताचा प्रकार एकसारखा असला तरी यात फार मोठा फरक हा आहे की, भगवान् भक्ताच्या इच्छेनुसार वर्तन करीत नाहीत तर आपल्या पद्धतीनुसार वर्तन करतात.* भगवान् सर्वत्र विद्यमान, सर्वसमर्थ, सर्वज्ञ, परम सुहृद आणि सत्यसंकल्प आहेत. भक्ताला केवळ आपली पूर्ण शक्ती खर्च करावयाची आहे, मग भगवंतही आपल्या पूर्ण शक्तीने त्याला प्राप्त होतात.

भगवत्प्राप्तीमध्ये बाधा स्वत: साधकच निर्माण करतो, कारण भगवत्प्राप्तीसाठी तो समज, सामुग्री, समय आणि सामर्थ्य स्वत:चे समजून त्यांना पूर्ण खर्ची घालत नाही. तर आपल्याजवळ काही शिल्लक ठेवतो. जर त्याने समज इत्यादींना आपले न समजता त्यांना पूर्ण पणाला लावले तर त्याला लवकरच भगवत्प्राप्ती होईल. कारण ही समज, सामुग्री इत्यादी त्याच्या आपल्या नाहीत तर भगवंताकडून मिळालेल्या आहेत. त्या भगवंताच्या आहेत. म्हणून त्यांना आपले समजणेच बाधा आहे. साधक स्वत:च भगवंताचा अंश आहे. त्याने स्वत: आपल्याला भगवंतापासून वेगळे मानले आहे, भगवंतांनी नव्हे.

भक्ती (प्रेम) कर्मजन्य अर्थात् कोणत्या विशेष साधनेचे फल नव्हे. भगवंताला संपूर्णपणे शरण होणाऱ्याला भक्ती स्वत: प्राप्त होते. दास्य, सख्य, वात्सल्य, माधुर्य इत्यादी भावांमध्ये सर्वात श्रेष्ठ शरणागतीचा भाव आहे. याठिकाणी भगवान् जणू हे म्हणत आहेत की, तू आपले सर्व काही मला देशील तर मीसुद्धा माझे सर्व काही तुला देईन आणि जर तू स्वत: आपल्याला मला देऊन टाकशील तर मीसुद्धा स्वत:ला तुला देऊन टाकीन. भगवत्प्राप्तीचा केवढा सरळ आणि स्वस्त सौदा आहे.

स्वत: आपल्याला भगवच्चरणी समर्पित केल्यावर भगवान् भक्तांच्या मागील उणीवांचे स्मरणसुद्धा करीत नाहीत. ते तर साधकाच्या हृदयातला वर्तमान काळातल्या भावनेलाच पाहतात.

**रहति न प्रभु चित चूक किए की। करत सुरति सय बार हिए की॥**

(मानस १।२९।३)

या (अकराव्या) श्लोकात द्वैत-अद्वैत, सगुण-निर्गुण, सायुज्य-सामीप्य इत्यादी शास्त्रीय विषयांचे वर्णन नाही तर भगवंताशी होणाऱ्या आपुलकीचेच वर्णन आहे. जसे नवव्या श्लोकात भगवंताच्या जन्म-कर्माच्या दिव्यतेला जाणल्याने भगवत्प्राप्ती होण्याचे वर्णन आहे. "केवळ भगवान्‌च माझे आहेत आणि मी भगवंताचाच आहे, दुसरा कोणीही माझा नाही आणि मी दुसऱ्या कोणाचाही नाही" अशा प्रकारे भगवंताविषयी आपुलकी झाल्यावर त्यांची प्राप्ती शीघ्र आणि सुगमतेने होते. म्हणून साधकाने केवळ भगवंताशीच आपलेपणा जोडला पाहिजे. (जो वास्तविक आहे) मग तो समजो अथवा न समजो. जर संसाराचे खोटे संबंधसुद्धा मानल्याने खरे वाटू लागतात तर मग ज्या भगवंताचा नेहमीचाच जो खरा संबंध आहे तो अनुभवात का येणार नाही? अर्थात् अवश्य येईल.

**शंका**—जो भगवंताला ज्या भावनेने स्वीकार करतो.

* दरिया दूषण दास में, नही राम में दोष। जन चाले इक पाँवडो, हरिचाले सौ कोस॥

भगवान्‌सुद्धा त्याच्याशी त्याच भावनेने वर्तन करतात. तर मग जर कोणी द्वेष-वैर इत्यादी भावाने स्वीकार करील तर भगवान् देखील त्याच्याशी (द्वेष इत्यादी) त्याच भावनेने वर्तन करतील का?

**समाधान—**याठिकाणी ''**प्रपद्यन्ते**'' पदाने भगवंताच्या प्रपत्ती अर्थात् शरणागतीचाच विषय आहे, त्यांच्याशी द्वेष-वैर इत्यादीचा विषय नाही. म्हणून याठिकाणी या विषयात शंका होऊ शकत नाही. तरीसुद्धा थोडा विचार केला तर भगवंताच्या स्वीकार करण्याचे तात्पर्य कल्याण करणे आहे. जो भगवंताला ज्या भावनेने स्वीकार करतो भगवान्‌ही त्याच्याशी तसेच आचरण करून शेवटी त्याचे कल्याणच करतात.* भगवान् प्राणीमात्राचे परम सुहृद आहेत. (५।२९) म्हणून ज्याचे ज्यामध्ये हित होते भगवान् त्याच्यासाठी तसाच प्रबन्ध करतात. वैर-द्वेष करणाऱ्यांचेसुद्धा ज्यामुळे कल्याण होईल तसेच भगवान् करतात. (वैर-द्वेष करणारे भगवंताचे काय बिघडवू शकतात?) अंगदजीना रावणाच्या सभेत पाठवतेवेळी भगवान् श्रीराम म्हणतात की, अशीच गोष्ट सांग की, ज्यामुळे आपले कार्यही होईल आणि रावणाचे कल्याणही होईल—''**काजु हमार तासु हित होई**'' (मानस ६।१७।४)

भगवंताच्या सुहृदतेची तर गोष्ट सोडाच, भक्तसुद्धा सर्व प्राण्यांचे सुहृद असतात ''**सुहृदः सर्व देहिनाम्**'' (श्रीमद्भा० ३।२५।२१) जर भक्ताकडूनच कोणाचे किंचिन्मात्र अहित होत नाही तर भगवंताकडून कोणाचे अहित कसे होऊ शकेल? भगवंताशी कोणत्याही प्रकारचा संबंध जोडला तर तो कल्याण करणाराच होतो. कारण भगवान् परम दयाळू, परम सुहृद आणि चिन्मय आहेत. जसे गंगेचे स्नान वैशाख मासात करा अथवा माघ मासात करा, दोन्हीचे माहात्म्य सारखेच आहे. परंतु वैशाखाच्या स्नानात प्रसन्नता असते तशी प्रसन्नता माघाच्या स्नानामध्ये नसते. त्याच प्रकारे भक्तिप्रेमपूर्वक भगवंताशी संबंध जोडणारास जसा आनंद मिळतो. तसा आनंद वैर-द्वेषपूर्वक भगवंताशी संबंध जोडल्याने मिळत नाही.

**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः—**श्रेष्ठ पुरुष जसे आचरण करतात. दुसरे लोकसुद्धा त्यानुसारच अनुकरण करतात (३।२१). भगवान् सर्वात श्रेष्ठ (सर्वोपरि) आहेत, म्हणून सर्वच लोक त्यांच्या मार्गाचे अनुकरण करतात. तीसऱ्या अध्यायात तेवीसाव्या श्लोकाच्या उत्तरार्धातसुद्धा हीच गोष्ट (उपर्युक्त पदानेच) सांगितली गेली आहे.

साधक भगवंताशी ज्या रीतीने संबंध जोडतो, भगवान् त्याच्याशी तसाच संबंध स्वीकारण्यासाठी तयार राहतात. महाराज दशरथजी भगवान् श्रीरामाला पुत्र भावनेने स्वीकार करतात. तर भगवान् त्यांचे खरे पुत्र होतात आणि सामर्थ्य असूनही ''पिता'' दशरथजींच्या वचनाला टाळण्याविषयी आपल्याला असमर्थ† मानतात. अशा प्रकारच्या आचरणातून भगवान् एक रहस्य प्रगट करतात की, जर तुझी संसारामध्ये कोणाशी संबंधाच्या नात्याने प्रियता असेल तर तोच संबंध तू माझ्याशी कर, जसे मातेविषयी प्रियता असेल तर मला माता समज, पित्याविषयी प्रियता असेल तर मला पिता समज, पुत्राविषयी प्रियता असेल तर मला आपला पुत्र मान इत्यादी. असे समजल्याने माझ्या ठिकाणी वास्तविक प्रियता होईल आणि माझी प्राप्ती सुगमतेने होईल.

दुसरी गोष्ट, भगवान् आपल्या आचरणाने असे पटवून देतात की, ज्याप्रमाणे माझ्याशी जो जसा संबंध मानतो, त्याच्यासाठी मी तसाच होतो. त्याचप्रमाणे तुझ्याशी जो जसा संबंध मानतो तूही त्याच्यासाठी तसाच हो. जसे—माता-पित्यासाठी तू सुपुत्र हो, पत्नीसाठी तू सुयोग्य पती हो, बहीणीसाठी तू श्रेष्ठ भाऊ हो, इत्यादी. परंतु मोबदल्यात त्यांच्याकडून कशाचीही इच्छा करू नको. जसे—काहीही त्यांच्याकडून मिळविण्याच्या इच्छेने माता-पित्यांना आपले न मानता केवळ त्यांची सेवा करण्यासाठीच त्यांना आपले समज. असे समजल्यानेच भगवंताच्या मार्गाचे अनुकरण होते. अभिमानरहित होऊन निःस्वार्थभावनेने दुसऱ्याची सेवा करण्याने लवकरच दुसऱ्याची ममता नाहीशी होऊन भगवंताविषयी प्रेम होईल. ज्यामुळे भगवंताची प्राप्ती होईल.

---

* कामाद् द्वेषाद् भयात् स्नेहाद् यथा भक्त्येश्वरे मनः। आवेश्य तदघं हित्वा बहवस्तद्गतिं गताः॥

(श्रीमद्भा० ७।१।२९)

अनेक मनुष्य कामाने, द्वेषाने, भयाने, स्नेहाने आपल्या मनाला भगवंतामध्ये लावून तसेच आपले सारे पाप धुऊन भगवंताला असे प्राप्त झाले जसे भक्त भक्तीने भगवंताला प्राप्त होतात.

† अहं हि वचनाद् राज्ञः पतेयमपि पावके। भक्षयेयं विषं तीक्ष्णं पतेयमपि चार्णवे॥

(वाल्मिकी रामा० अयोध्या० १८।२८-२९)

भगवान् श्रीराम म्हणतात ''मी महाराज पिताजीच्या आज्ञेनुसार अग्नीमध्येसुद्धा प्रवेश करू शकतो, तीक्ष्ण विषाचे देखील भक्षण करू शकतो आणि समुद्रातही उडी घेऊ शकतो.''

**विशेष गोष्ट**

अहंकाररहित होऊन नि:स्वार्थभावनेने कुठेही प्रेम झाले तर ते प्रेम आपोआप भगवंताशी एकरूप होते. कारण आपला अहंकार आणि स्वार्थच भगवत्प्रेमामध्ये बाधा आणतो. या दोन्हीमुळे मनुष्याच्या प्रेमाचा भाव सीमित होतो आणि यांचा त्याग झाल्यास त्याच्या प्रेमाचा भाव व्यापक होतो. प्रेमाचा भाव व्यापक झाल्यावर मनुष्याने मानलेले सर्व कृत्रिम संबंध नष्ट होतात आणि भगवंताशी नित्य, स्वाभाविक संबंध जागृत होतो.

संपूर्ण जीवांचा परमात्म्याशी स्वाभाविक नित्य संबंध आहे. (१५।७) परंतु जीव या संबंधाला जोपर्यंत ओळखत नाही आणि दुसरा संबंध जोडतो तोपर्यंत तो जन्म-मरणाच्या चक्रामध्ये फिरत राहतो. त्याचे हे बंधन दोन प्रकाराने असते—एक तर तो भगवंताशी असलेल्या आपल्या नित्य संबंधाला ओळखत नाही आणि दुसरे, ज्याच्याशी वास्तविक आपला संबंधच नाही, त्याच्या संबंधाला नित्य समजतो. जेव्हा जीव **"ये यथा मां प्रपद्यन्ते"** नुसार आपला संबंध केवळ भगवंताशी मानतो अर्थात् ओळखतो तेव्हा त्याला भगवंताशी आपल्या नित्य संबंधाचा अनुभव होतो.

भगवंताच्या नित्य संबंधाला ओळखणे हेच भगवंताला शरण होणे आहे. शरण झाल्यावर भक्त निश्चिंत, निर्भय, नि:शोक आणि नि:संशय होतो. मग त्याच्याकडून भगवंताच्या आज्ञेविरुद्ध कोणतीही क्रिया कशी होऊ शकते? त्याच्या संपूर्ण क्रिया भगवंताच्या आज्ञेनुसारच होतात—**"मम वर्त्मानुवर्तन्ते"**

**परिशिष्ट भाव**—जरी हा संसार साक्षात् भगवंताचे स्वरूप आहे, तरी जो याला ज्या रूपाने पाहतो, भगवान्ही त्याच्यासाठी त्याचरूपाने प्रकट होतात. आपण आपल्याला शरीर मानून आपल्यासाठी वस्तूंची आवश्यकता मानतो आणि त्यांची इच्छा करतो तर भगवान्ही त्या वस्तूंच्या रूपात आपल्यासमोर येतात, आपण असत्‌मध्ये स्थित होऊन पाहू तर भगवान्ही असत् रूपानेच दिसतात. जसे बालक खेळणी इच्छिते तर पिता पैसे खर्च करूनसुद्धा खेळणी आणून देतो, तसेच आपण जे इच्छितो, परम दयाळू भगवान् (स्वयं सदा सत्स्वरूप राहत असूनही) त्याचरूपाने आपल्यासमोर येतात. जर आपण भोग इच्छिणार नाही तर भगवंताना भोगरूपाने कशाला यावे लागेल? बनावटी रूप कशाला धारण करावे लागेल?

भगवंताच्या स्वभावात 'यथा-तथा' असले तरीही जीवावर त्यांची फार मोठी कृपा आहे, कारण कुठे जीव आणि कुठे भगवान्? अभिमानाशिवाय जीवात आणखी कोणते सामर्थ्य आहे? असे असूनही जीवाचे भगवंतात आकर्षण असते तर भगवंताचेही जीवात आकर्षण असते. जसे विदुरपत्नी आपण आपल्याला विसरून गेली तर भगवानही आपले आपल्याला विसरून गेले आणि केळाची सालपटे खाऊ लागले आणि त्यातच आनंद घेऊ लागले!

भगवंताच्या स्वभावात 'यथा-तथा' केवळ क्रियेत आहे, भावात नाही. भगवंताचा आस्तिकाती आस्तिक व्यक्तीविषयी जसा स्नेह आहे, कृपा आहे, तसाच स्नेह, कृपा नास्तिकाती नास्तिक व्यक्तीविषयीही आहे. म्हणून भगवंताच्या 'यथा-तथा' यात स्वार्थभाव नाही, उलट ही तर भगवंताची महत्ता आहे की, कुठे जीव आणि कुठे भगवान्! तरीही ते जीवाला आपला मित्र बनवितात, त्याला आपल्यासारखा दर्जा देतात. भगवान् आपल्यात मोठेपणाचा भाव ठेवत नाहीत—हे त्यांचे माहात्म्य आहे.

***संबंध**—पूर्व श्लोकामध्ये भगवंतानी म्हटले की, जो मला ज्या भावनेने स्वीकार करतो मीही त्याला त्याच भावनेने स्वीकार करतो. अर्थात् माझी प्राप्ती फारच सरळ आणि सुगम आहे. असे असतानाही लोक भगवंताचा आश्रय का घेत नाहीत? याचे कारण पुढील श्लोकात सांगतात.*

**काङ्क्षन्तः कर्मणां सिद्धिं यजन्त इह देवताः।**
**क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा॥१२॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कर्मणाम्** | = कर्मांच्या | **देवताः** | = देवतांची | **कर्मजा** | = कर्मापासून उत्पन्न होणारी |
| **सिद्धिम्** | = सिद्धीचे (फलाचे) | **यजन्ते** | = उपासना करतात. | **सिद्धिः** | = सिद्धी |
| **काङ्क्षन्तः** | = इच्छुक (मनुष्य) | **हि** | = कारण | **क्षिप्रम्** | = लवकर |
| | | **इह** | = या | **भवति** | = प्राप्त होते. |
| | | **मानुषे, लोके** | = मनुष्यलोकांत | | |

*व्याख्या*— **काङ्क्षन्तः कर्मणां सिद्धीं यजन्त इह देवताः**—मनुष्याला नवीन कर्म करण्याचा अधिकार मिळाला आहे. कर्म केल्यानेच सिद्धी प्राप्त होते असे प्रत्यक्ष पाहण्यात येते. या कारणामुळे मनुष्याच्या अंत:करणात ही गोष्ट दृढतेने

ठसली आहे की, कर्म केल्याशिवाय कोणतीही वस्तू मिळत नाही. ते असे समजतात की, सांसारिक पदार्थांप्रमाणे भगवंताची प्राप्ती देखील कर्म (तप, ध्यान, समाधी इत्यादी) केल्यानेच होते. नाशवान् पदार्थांच्या कामनेमुळे त्यांची दृष्टी ह्या वास्तविकतेकडे जातच नाही की, सांसारिक वस्तू कर्मजन्य आहेत आणि एकदेशीय आहेत आपणाला नित्य प्राप्त नाहीत, आपल्यापासून वेगळ्या आहेत आणि परिवर्तनशील आहेत, म्हणून त्यांच्या प्राप्तीसाठी कर्म करणे आवश्यक आहे. परंतु भगवान् कर्मजन्य नाहीत, सर्वत्र परिपूर्ण आहेत, आपल्याला नित्यप्राप्त आहेत, आपल्यापासून वेगळे नाहीत आणि अपरिवर्तनशील आहेत. म्हणून भगवत्प्राप्तीमध्ये सांसारिक वस्तूंच्या प्राप्तीचा नियम लागू पडत नाही. भगवत्प्राप्ती केवळ उत्कट अभिलाषेने होते. उत्कट अभिलाषा जागृत न होण्याचे खास कारण सांसारिक भोगांची कामनाच आहे.

भगवान् पित्यासमान आहेत आणि देवता दुकानदारासारख्या आहेत. जर दुकानदाराने वस्तू दिली नाही तर त्याला पैसे घेण्याचा अधिकार राहत नाही, परंतु पित्याला पैसे घेण्याचाही अधिकार आहे आणि वस्तू देण्याचासुद्धा अधिकार आहे. बालकाला पित्यापासून कोणती वस्तू घेण्यासाठी काहीही मूल्य द्यावे लागत नाही. परंतु दुकानदाराकडून वस्तू घेण्यासाठी मूल्य द्यावे लागते. त्याचप्रमाणे भगवंतापासून काही मिळविण्यासाठी कोणतेही मूल्य देण्याची जरूरी नाही. परंतु देवताकडून काही मिळविण्यासाठी विधीपूर्वक कर्म करावी लागतात. दुकानदाराकडून बालक काड्याची पेटी (माचिस) चाकू इत्यादी हानिकारक पदार्थसुद्धा पैसे देऊन विकत घेऊ शकतो. परंतु त्याने पित्याला अशा हानिकारक वस्तू मागितल्या तर ते त्याला त्या देणार नाहीत आणि पैसेही घेऊ शकतील. पिता तीच वस्तू देतात ज्यामुळे बालकाचे हित होईल. त्याच प्रकारे देवतालोक आपल्या उपासकांना (त्यांची उपासना सांगोपांग झाल्यावर) त्यांच्या हित-अहिताचा विचार न करताच त्यांच्या इच्छित वस्तू देतात. परंतु परम पिता भगवान् आपल्या भक्तांना आपल्या इच्छेने त्याच वस्तू देतात, ज्यामध्ये त्यांचे परमहित असेल. असे असतानासुद्धा नाशवान पदार्थांची आसक्ती, ममता आणि कामना असल्याकारणाने अल्प-बुद्धी मनुष्य भगवंताच्या महत्तेला आणि सुहृदतेला जाणत नाहीत. म्हणून ते अज्ञानाने देवतांची उपासना करतात (७।२०-२३, ९।२३-२४)

**क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा**—हा मनुष्यलोक कर्मभूमी आहे—"**कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके**" (१५।२) याशिवाय दुसरे लोक (स्वर्ग नरकादी) भोगभूमी आहेत. मनुष्यलोकातसुद्धा नवीन कर्म करण्याचा अधिकार मनुष्यालाच आहे. पशु-पक्षी इत्यादींना नाही. मनुष्यशरीरात केलेल्या कर्माचे फलच इहलोकात आणि परलोकात भोगले जाते.

मनुष्यलोकात कर्माची आसक्ती असणारी माणसे असतात "**कर्मसङ्गिषु जायते**" (१४-१५) कर्माच्या आसक्तीमुळे ती कर्मजन्य सिद्धीवरच लुब्ध होतात. कर्मांनी जी सिद्धी प्राप्त होते ती जरी शीघ्र मिळत असली तरी ती सदा राहणारी नसते. जर कर्माचाच आदि अंत होतो तर त्यापासून मिळणारी सिद्धी (फल) सदा कशी राहू शकते? म्हणून नाशवान कर्माचे फलसुद्धा नाशवानच असते. परंतु कामना असणाऱ्या मनुष्याची दृष्टी शीघ्र मिळणाऱ्या फलावर तर जाते परंतु त्याच्या नाशाकडे जात नाही. विधिपूर्वक सांगोपांग केल्या गेलेल्या कर्माचे फल देवतांकडून शीघ्र मिळत असते. म्हणून ते देवतानांच शरण जातात आणि त्यांचीच आराधना करतात. कर्मजन्य फलाची इच्छा असल्याने ते कर्मबंधनातून मुक्त होत नाहीत आणि परिणामी वारंवार जन्मत-मरत राहतात.

जी सिद्धी वास्तविक आहे ती कर्मजन्य नाही. वास्तविक सिद्धी "भगवत्प्राप्ती" आहे. भगवत्प्राप्तीचे साधन—कर्मयोग-ज्ञानयोग आणि भक्तियोगसुद्धा कर्मजन्य नाहीत. योगाची सिद्धी कर्माद्वारा होत नाही. तर कर्माच्या संबंध-विच्छेदाने होते.

**शंका**—कर्मयोगाची सिद्धी तर कर्म करण्यानेच होते असे सांगितले आहे—"**आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते**" (६।३) तर मग कर्मयोग कर्मजन्य कसा नाही?

**समाधान**—कर्मयोगामध्ये कर्माशी आणि कर्म-सामुग्रीशी संबंध-विच्छेद करण्यासाठीच कर्म केली जातात. योग (परमात्म्याचा नित्य संबंध) तर स्वत:सिद्ध आणि स्वाभाविक आहे. म्हणून योग अथवा परमात्मप्राप्ती कर्मजन्य नाही. वास्तविक कर्म सत्य नाही तर परमात्मप्राप्तीच्या साधनरूपी कर्माचे विधान सत्य आहे. कोणतेही कर्म जर सत्साठी केले जाते तर त्याचा परिणाम सत् असल्यामुळे त्या कर्माचे नाव सुद्धा सत् होते—"**कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते।**" (१७।२७)

आपल्यासाठी कर्म करण्यानेच योगा (परमात्म्याशी नित्ययोग) चा अनुभव येत नाही. कर्मयोगामध्ये दुसऱ्यासाठीच सर्व कर्म केली जातात. आपल्यासाठी अर्थात् फलप्राप्ती-साठी नव्हे. "**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन**" (२।४७) आपल्यासाठी कर्म करण्याने मनुष्य बंधनात पडतो. (३।९) आणि दुसऱ्यासाठी कर्म करण्याने तो मुक्त होतो (४।२३) कर्मयोगामध्ये दुसऱ्यासाठीच सर्व कर्म करण्याने कर्म आणि फलाशी संबंध-विच्छेद होतो, जो "योगा" चा

अनुभव करविण्याला कारण आहे.

कर्म करण्यासाठी "पर" अर्थात् शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, पदार्थ, व्यक्ती, देश, काल इत्यादी परिवर्तनशील वस्तूंची साहाय्यता घ्यावी लगते. "पर" ची साहाय्यता घेणे परतंत्रता आहे. स्वरूप जसेच्या तसे आहे. त्यात कधीही कोणते परिवर्तन होत नाही. म्हणून त्याच्या अनुभूतीमध्ये "पर" म्हणविले जाणारे शरीरादी पदार्थांच्या सहयोगाची थोडीहीसुद्धा अपेक्षा, आवश्यकता नसते. "पर" शी मानलेल्या संबंधाचा त्याग झाल्यास स्वरूपामध्ये स्वत: सिद्ध स्थितीचा अनुभव होतो.

***संबंध—*** *आठव्या श्लोकामध्ये आपल्या अवताराच्या उद्देशाचे वर्णन करून नवव्या श्लोकात भगवंतांनी आपल्या कर्माच्या दिव्यतेला जाणण्याचे माहात्म्य वर्णन केले. कर्मजन्य सिद्धीची इच्छा ठेवल्यानेच कर्मामध्ये मलिनता येते. म्हणून कर्ममध्ये दिव्यता (पवित्रता) कशी येईल? हे सांगण्यासाठी आता भगवान् आपल्या कर्मांच्या दिव्यतेचे विशेष वर्णन करतात.*

**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः।**
**तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम्॥ १३॥**
**न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा।**
**इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते॥ १४॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **मया** | = माझ्याद्वारा | **अव्ययाम्** | = अविनाशी परमेश्वराला (तू) | **न, लिम्पन्ति** | = लिप्त करीत नाहीत. |
| **गुणकर्मविभागशः** | = गुण आणि कर्मांच्या विभागानुसार | **अकर्तारम्** | = अकर्ता | **इति** | = अशाप्रकारे |
| **चातुर्वण्यम्** | = चारी वर्णांची | **विद्धि** | = जाण! (कारण) | **यः** | = जो |
| **सृष्टम्** | = रचना केली गेली आहे. | **कर्मफले** | = कर्मांच्या फलात | **माम्** | = मला |
| **तस्य** | = त्यांचा (सृष्टि-रचना इत्यादीचा) | **मे** | = मला | **अभिजानाति** | = तत्त्वाने जाणतो, |
| **कर्तारम्, अपि** | = कर्ता असूनही | **स्पृहा** | = स्पृहा | **सः** | = तो (ही) |
| **माम्** | = मला | **न** | = नाही, (म्हणून) | **कर्मभिः** | = कर्मांनी |
| | | **माम्** | = मला | **बध्यते** | = बांधला जात |
| | | **कर्माणि** | = कर्म | **न** | = नाही. |

***व्याख्या—*** **चातुर्वर्ण्यं* मया सृष्टं गुणकर्मविभागशः—** पूर्व जन्मामध्ये केल्या गेलेल्या कर्मानुसार सत्त्व, रज आणि तम—या तिन्ही गुणांमध्ये न्यूनाधिकता राहत असते. सृष्टिरचनेच्या वेळी त्या गुण आणि कर्मानुसार भगवान् ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या चारी वर्णांची रचना करतात†. मनुष्याव्यतिरिक्त देव, पितर, तीर्यक, आदी दुसऱ्या योनींची रचनासुद्धा भगवान् गुण आणि कर्मानुसारच करतात. यामध्ये भगवंताची थोडीसुद्धा विषमता नसते.

**चातुर्वर्ण्यम्**—हे पद जीवमात्राचे उपलक्षण आहे याचे तात्पर्य मानवच चार प्रकारचे नसतात तर पशू, पक्षी, वृक्ष इत्यादीसुद्धा चार प्रकारचे असतात. जसे पक्षात कबूतर इत्यादी ब्राह्मण, ससाणा इत्यादी क्षत्रिय, घार इत्यादी वैश्य आणि कावळा इत्यादी शूद्र पक्षी आहेत. त्याचप्रमाणे वृक्षात पिंपळ इत्यादी ब्राह्मण, कडुनिंब इत्यादी क्षत्रिय, चिंच इत्यादी वैश्य आणि बाभूळ इत्यादी शूद्र वृक्ष आहेत. परंतु याठिकाणी "**चातुर्वर्ण्यम्**" पदाने माणसांनाच घेतले पाहिजे. कारण वर्ण विभागाला माणसेच समजू शकतात आणि त्यानुसार कर्म करू शकतात. कर्म करण्याचा अधिकार मनुष्यालाच आहे.

चारी वर्णांची रचना मीच केली आहे—यावरुन भगवंताचा हा भावसुद्धा आहे की, एक तर हे माझेच अंश आहेत आणि दुसरे मी प्राणीमात्रांचा सुहृद आहे. म्हणून मी त्यांच्या हिता-कडेच लक्ष ठेवतो. या विपरीत हे देवतांचेही अंश नाहीत आणि देवता सर्वांचे सुहृदही नाहीत. म्हणून माणसांनी आपल्या वर्णानुसार संपूर्ण कर्तव्यकर्मांने माझे पूजन करावे (१८।४६)

**तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम्**—या

* "चत्वारो वर्णाश्चातुर्वर्ण्यम्" येथे "चतुर्वर्णादीनां स्वार्थे उपसंख्यानम्" या वार्तिकाने स्वार्थात "ष्यञ्प्रत्यय" केला गेला आहे.

† सत्त्वगुणाच्या प्रधानतेने ब्राह्मणाची, रजोगुणाच्या प्रधानतेने तसेच सत्त्वगुणाच्या गौणतेने क्षत्रियाची, रजोगुणाच्या प्रधानतेने तसेच तमोगुणाच्या गौणतेने वैश्याची आणि तमोगुणाच्या प्रधानतेने शूद्राची रचना केली गेली आहे.

ठिकाणी "**अकर्तारम्**" पद कर्म करीत असतानासुद्धा कर्तृत्वाभिमानाचा अभाव सांगण्यासाठी आले आहे. सृष्टीची रचना पालन, संहार इत्यादी संपूर्ण कर्मांना करीत असून-सुद्धा भगवान् त्या कर्मापासून संपूर्णपणे अतीत आणि निर्लिप्तच राहतात.

सृष्टिरचनेत भगवंतच उपादान कारण आहेत आणि तेच निमित्त कारण आहेत. मातीपासून तयार झालेल्या घटा-मध्ये माती उपादान कारण आहे आणि कुंभार निमित्त कारण आहे. घट तयार होण्यासाठी माती खर्च होते आणि कुंभाराची शक्ती खर्च होते. परंतु सृष्टिरचनेत भगवंताचे काहीही खर्च होत नाही. ते जसेच्या तसेच राहतात म्हणून त्यांना "**अव्ययम्**" म्हटले गेले आहे.

जीवसुद्धा भगवंताचा अंश असल्याने अव्ययच आहे. विचार करावा की, शरीरादी सर्व वस्तू सर्व संसाराच्या आहेत आणि संसाराकडूनच मिळाल्या आहेत. म्हणून त्यांना संसाराच्याच सेवेमध्ये लावल्याने आपले काय खर्च झाले? आपण तर (स्वरूपत:) अव्ययच राहिलो. म्हणून जर साधकाने शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, धन, संपत्ती इत्यादी मिळालेल्या सांसारिक पदार्थांना आपले आणि आपल्यासाठी न समजले तर मग त्याला आपल्या अव्ययतेचा अनुभव येईल.

या ठिकाणी "**विद्धि**" पदाने भगवंताने आपल्या कर्मांच्या दिव्यतेला समजून घेण्याची आज्ञा केली आहे. कर्म करीत असतानाही कर्म, कर्मसामुग्री आणि कर्मफलाशी आपला कोणताच संबंध न राहणे हेच कर्मांची दिव्यता आहे.

**न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा**—सृष्टि-रचनेचे संपूर्ण कर्म करीत असतानाही भगवंताचा त्या कर्माशी काहीही संबंध नाही. त्यांच्या कर्मात विषमता, पक्षपात आदी दोष लेशमात्रही नसतात. त्यांची कर्मफलात किंचिन्मात्रही आसक्ती, ममता अथवा कामना नसते म्हणून ते कर्म भगवंताला लिप्त करत नाहीत.

उत्पत्ति-विनाशशील सर्व वस्तू कर्मफल आहेत. भगवान् म्हणतात की, जशी मला कर्मफलाविषयी स्पृहा नाही तशीच तूही कर्मफलाविषयी स्पृहा करू नको. कर्मफलामध्ये स्पृहा न राहिल्यास संपूर्ण कर्म करीत असतानासुद्धा तू कर्माने बांधला जाणार नाहीस.

मागील (तेराव्या) श्लोकात भगवंतांनी सांगितले की, संपूर्ण सृष्टि-रचनादी कर्माचा कर्ता असूनसुद्धा मी अकर्ता आहे अर्थात् माझ्या ठिकाणी कर्तृत्वाभिमान नाही आणि या श्लोकात सांगतात की, कर्मफलामध्ये माझी स्पृहा नाही अर्थात् माझे ठिकाणी भोक्तृत्वाभिमानही नाही. म्हणून साधकांनीसुद्धा या दोन्हीपासून रहित व्हावे. फलेच्छेचा त्याग करून केवळ दुसऱ्यासाठी कर्म करण्याने कर्तृत्व आणि भोक्तृत्व दोन्हीही राहत नाही. कर्तृत्व भोक्तृत्व हाच संसार आहे. म्हणून हे न राहिल्यास मुक्ती स्वत: सिद्धच आहे.

**इति मां योऽभिजानाति**—मनुष्याचे ठिकाणी जेव्हा कामना निर्माण होतात तेव्हा त्याची दृष्टी उत्पत्ति-विनाशशील (अनित्य) पदार्थावर राहते. उत्पत्ति-विनाशशील (अनित्य) पदार्थावर दृष्टी राहिल्याने तो नित्य भगवंताला तत्त्वाने जाणू शकत नाही. परंतु कामना नष्ट झाल्याने जेव्हा अंत:करण शुद्ध होते तेव्हा भगवंताकडे आपोआप दृष्टी जाते. भगवंताकडे दृष्टी लागल्यामुळे मनुष्याला हे कळते की, भगवान् प्राणीमात्राचे परम सुहृद आहेत, म्हणून त्यांच्याकडून होणाऱ्या सर्व क्रिया प्राणीमात्राच्या हितासाठीच होतात. भगवंत तर जीवांना कर्म-बंधनापासून रहित होण्यासाठीच त्यांना मनुष्यशरीर देतात. परंतु ही गोष्ट न समजल्यामुळे जीव कर्माशी नवीन नवीन संबंध जोडून आणखी बंधन वाढवतो. म्हणून कर्तेपणा आणि फलेच्छा नसतानाही ते केवळ कृपा करून जीवांना कर्मबंधनापासून रहित करून त्यांचा उद्धार करण्यासाठीच सृष्टि-रचनेचे कार्य करतात. भगवंताला याप्रमाणे जाणल्याने मनुष्य भगवंताकडे ओढला जातो.

**उमा राम सुभाउ जेहिं जाना। ताहि भजनु तजि भाव न आना॥**
(मानस ५।३४।२)

**कर्मभिर्न स बध्यते**—भगवंताची कर्म तर दिव्य आहेतच, संत महात्म्यांची कर्मसुद्धा दिव्य होतात. वास्तविक संत महात्माच नाही तर प्रत्येक मनुष्य आपल्या कर्मांना दिव्य बनवू शकतो. जेव्हा कर्मामध्ये मलिनता (कामना, ममता, आसक्ती इत्यादी) येते तेव्हा ते कर्म बंधनकारक होतात. जेव्हा मलिनता नाहीशी होऊन कर्म दिव्य होतात तेव्हा ते त्याला बंधनकारक होत नाहीत. एवढेच नव्हे ती कर्म त्या कर्त्याला आणि दुसऱ्यांनासुद्धा (त्यानुसार आचरण केल्याने) मुक्त करणारी होतात.

आपल्या कर्मांना दिव्य बनविण्याचा, संसारापासून मिळालेल्या वस्तूंना आपल्यासाठी न समजता (संसाराची आणि संसारासाठीच समजून) संसाराच्या सेवेमध्ये लावणे, हाच सरळ उपाय आहे.

विचार केला पाहिजे की, आपल्याजवळ जेवढ्या म्हणून बाह्य वस्तू आहेत, त्या सर्वांना आपण बरोबर आणले नाही आणि जाऊ तेव्हा बरोबर घेऊन जाऊ शकत नाही, त्या असताना त्यांच्यात आपल्या इच्छेनुसार परिवर्तन करू शकत नाही, त्यांना इच्छेनुसार ठेऊ शकत नाही अर्थात्

त्यांचेवर आपले अधिपत्य चालत नाही. त्याचप्रमाणे जन्म जन्मांतरापासून बरोबर आलेले सूक्ष्म आणि कारणशरीरसुद्धा परिवर्तनशील आणि प्रकृतीचे कार्य आहे. म्हणून त्यांचेशीसुद्धा आपला संबंध नाही. त्या वस्तू ''आपल्यासाठी'' सुद्धा नाहीत. कारण त्या मिळाल्या तरी ''आणखी मिळावे'' अशी इच्छा राहते. जर त्या वस्तू आपल्यासाठी असत्या तर आणखी मिळण्याची इच्छा राहिली नसती. असे असतानाही त्या वस्तूंना आपले आणि आपल्यासाठी समजणे केवढी मोठी चूक आहे? त्या वस्तूमध्ये जो आपलेपणा दिसतो तो केवळ वास्तविक दृष्टीने त्याचा उपयोग करण्यासाठी आहे त्यांचेवर आपला अधिकार गाजविण्यासाठी नव्हे.

सेवा करण्यासाठी तर सर्व आपले आहेत पण घेण्यासाठी कोणी आपले नाही. संसाराची गोष्ट तर सोडा भगवान्सुद्धा घेण्यासाठी आपले नाहीत अर्थात् भगवंतापासूनही काही घ्यावयाचे नाही तर स्वतः आपल्यालाच भगवंताला समर्पित व्हावयाचे आहे. कारण जी वस्तू आपल्याला हवी आहे आणि आपल्या हिताची आहे ती भगवंतांनी पूर्वीच आपल्याला न मागताच देऊन ठेवली आहे आणि पुष्कळ दिली आहे कमी नाही. आपली आवश्यकता जेवढी भगवंताला समजते तेवढी आपण समजूही शकत नाही. कारण भगवंताची उदारता अपार आहे. त्यांच्या दृष्टीने आपली समज तर फारच अल्प आहे. म्हणून त्यांच्याकडून मागण्याची काय आवश्यकता आहे? जे काही आपल्याला मिळाले आहे त्याचाच आपल्याला सदुपयोग करावयाचा आहे. वस्तूंना आपली आणि आपल्यासाठी न समजता निष्कामभावनेने दुसऱ्याच्या हितासाठी लावणे हाच वस्तूंचा सदुपयोग आहे. यामुळे कर्म आणि पदार्थाशी संबंध-विच्छेद होतो आणि महान् आनंदस्वरूप परमात्म्याचा अनुभव होतो.

**परिशिष्ट भाव**—जसे सृष्टि-रचना इत्यादी करूनही भगवंताचा अकर्तेपणा सुरक्षित (जसाच्या तसा) राहतो, तसेच जीवाचाही स्वरूपाने अकर्तेपणा स्वाभाविक सुरक्षित राहतो—'**शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते**' (गीता १३।३१). परंतु तो मूढतापूर्वक आपल्यात कर्तेपणा स्वीकार करतो—'**अहङ्कारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते**' (गीता ३।२७).

कर्म, क्रिया आणि लीला—तिन्ही एक दिसत असले तरीही वास्तविक संपूर्णपणे भिन्न आहेत. जी क्रिया कर्तृत्वाभिमानपूर्वक केली जावी आणि अनुकूल-प्रतिकूल फल देणारी असावी ती क्रिया 'कर्म' म्हणविली जाते. जी क्रिया कर्तृत्वाभिमानपूर्वक केली जात नाही आणि जी फलदायकही नसते ती 'क्रिया' होते, जसे—श्वासांचे येणे, जाणे, नेत्राचे उघडणे आणि बंद होणे, नाड्यांचे अभिसरण, हृदयाचे ठोके इत्यादी. जी क्रिया कर्तृत्वाभिमान आणि फलेच्छेने रहित तर असते, त्याचबरोबर दिव्य आणि संपूर्ण जगताचे हित करणारीही असते, ती 'लीला' असते. सांसारिक लोकाद्वारा 'कर्म' होते, मुक्त पुरुषाद्वारा 'क्रिया' होते.* आणि भगवंताद्वारा लीला होते—'**लोकवत्तु लीलाकैवल्यम्**' (ब्रह्मसूत्र २।१।३३) अर्थात् जसे, संसार नसतानाही दिसतो, तसेच भगवंताचे सृष्टि-रचना इत्यादी कार्य केवळ लीलामात्र आहेत. तात्पर्य हे आहे की, भगवंत कर्ते नसतानाही लीलेमुळे कर्ते दिसतात.

'**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः**' पदांने सिद्ध होते की, गीता जन्मानेच (उत्पत्तीनेच) जाती मानते. जो मनुष्य ज्या वर्णात ज्या जातीच्या माता-पित्यापासून उत्पन्न झाला आहे, त्यावरुनच त्याची जाती मानली जाते. 'जाती' शब्दच '**जनी प्रादुर्भावे**' धातूने बनतो, जो जन्माने जाती सिद्ध करतो. कर्माने तर 'कृति' शब्द होतो; जो '**डुकृञ् करणे**' धातूने बनतो. हां! जातीचे पूर्ण रक्षण त्यानुसार कर्तव्यकर्म केल्यानेच होते.

***संबंध***—*पूर्व श्लोकात आपले उदाहरण देऊन आणि आता पुढील श्लोकात भगवान् मुमुक्षु पुरुषांचे उदाहरण समोर ठेवून अर्जुनाला निष्कामभावनेने आपले कर्तव्यकर्म करण्याची आज्ञा देतात.*

**एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः।**
**कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम्॥ १५॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पूर्वैः** | = पूर्वकालाच्या | **कृतम्** | = केले आहेत, | **कृतम्** | = केल्या जाणाऱ्या |
| **मुमुक्षुभिः अपि** | = मुमुक्षूंनीही | **तस्मात्** | = म्हणून | | |
| **एवम्** | = अशाप्रकारे | **त्वम्** | = तू (ही) | **कर्म, एव** | = कर्मांनाच (त्यांच्याप्रमाणे) |
| **ज्ञात्वा** | = जाणून | **पूर्वैः** | = पूर्वजांद्वारा | | |
| **कर्म** | = कर्म | **पूर्वतरम्** | = नेहमी | **कुरू** | = कर. |

* याला गीतेने हालचालसुद्धा म्हटले आहे—'सदृशं चेष्टते' (३।३३)

*व्याख्या*— (नवव्या श्लोकात भगवंतांनी आपल्या कर्माच्या दिव्यतेचा जो विषय आरंभ केला होता त्याचा इथे उपसंहार करतात.)

**एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः**—अर्जुन मुमुक्षु होते अर्थात् आपले कल्याण इच्छित होते. परंतु युद्धरूपाने प्राप्त झालेल्या आपल्या कर्तव्यकर्माला करण्यात त्यांना आपले कल्याण दिसत नव्हते. तर ते त्याला घोर कर्म समजून त्याचा त्याग करू इच्छित होते. (३।१) म्हणून भगवान् अर्जुनाला पूर्वकाळाच्या मुमुक्षू पुरुषांचे उदाहरण देत आहेत की, त्यांनीसुद्धा आपापल्या कर्तव्यकर्माचे पालन करून आपले कल्याण करून घेतले आहे, म्हणून तूही त्यांच्याप्रमाणे आपल्या कर्तव्याचे पालन करावयास हवे.

तीसऱ्या अध्यायाच्या वीसाव्या श्लोकात जनकादिकांचे उदाहरण देऊन तसेच याच (चौथ्या) अध्यायाच्या पहिल्या दुसऱ्या श्लोकामध्ये विवस्वान, मनु, इक्ष्वाकु इत्यादींचे उदाहरण देऊन भगवंतांनी जी गोष्ट म्हटली होती. त्याच विषयाचे विवेचन या श्लोकातही करत आहेत.

शास्त्रामध्ये असे प्रसिद्ध आहे की, मुमुक्षा जागृत झाल्यास कर्माचा स्वरूपाने त्याग केला पाहिजे. कारण मुमुक्षा उत्पन्न झाल्यावर मनुष्य कर्माचा अधिकारी राहत नाही, तर ज्ञानाचा अधिकारी होतो*. परंतु येथे भगवान् म्हणतात की, मुमुक्षुंनीसुद्धा कर्मयोगाचे तत्त्व जाणून कर्म केली आहेत. म्हणून मुमुक्षा जागृत झाल्यावरसुद्धा आपल्या कर्तव्यकर्माचा त्याग करावयास नको तर निष्कामभावनेने कर्तव्यकर्म करीत राहिले पाहिजे.

कर्म करीत असताना योगात स्थित असणे आणि योगात स्थित राहून कर्म करणे हे कर्मयोगाचे तत्त्व आहे. कर्म संसारासाठी आणि योग आपल्यासाठी असतो. कर्म करणे आणि कर्म न करणे अशा दोन अवस्था आहेत. म्हणून प्रवृत्ती (कर्म करणे) आणि निवृत्ती (कर्म न करणे) दोन्हीही प्रवृत्तीच (कर्म करणे) आहेत. प्रवृत्ती आणि निवृत्ती या दोन्हीहून पलीकडे जाणे योग आहे, जी पूर्णपणे निवृत्ती आहे. पूर्ण निवृत्ती कोणती अवस्था नव्हे.

चौदाव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले की, कर्मफलात माझी स्पृहा नाही. म्हणून मला कर्म बंधनकारक होत नाहीत. जो मनुष्य कर्म करण्याच्या या विद्येला (कर्मयोगाला) जाणून फलेच्छेचा त्याग करून कर्म करतो तोसुद्धा कर्माने बांधला जात नाही. कारण फलेच्छेमुळेच मनुष्य बंधनात सापडतो—**''फले सक्तो निबध्यते''** (५।१२) जर मनुष्य आपल्या सुखभोगासाठी अथवा धन, मान, प्रतिष्ठा, स्वर्ग इत्यादींच्या प्राप्तीसाठी कर्म करतो तर ते कर्म त्याला बंधनकारक होतात (३।९) परंतु जर त्याचा उद्देश उत्पत्ति-विनाशशील संसार नसेल तसेच तो संसाराशी संबंध-विच्छेद करण्यासाठी नि:स्वार्थ सेवाभावनेने केवळ दुसऱ्याच्या हितासाठी कर्म करीत असेल तर ते कर्म त्याला बंधनकारक होत नाहीत (४।२३). कारण दुसऱ्यासाठी कर्म केल्याने कर्माचा प्रवाह संसाराकडे होतो ज्यामुळे कर्माशी संबंध (आसक्ति) समाप्त होतो आणि फलेच्छा न राहिल्याने नवीन संबंध निर्माण होत नाही.

**कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम्**—या पदांनी भगवान् अर्जुनाला आज्ञा करत आहेत की, तू मुमुक्षू आहेस म्हणून जसे पूर्वीच्या इतर मुमुक्षूंनी लोकहितार्थ कर्म केली आहेत तसेच तूसुद्धा संसाराच्या हितासाठी कर्म कर.

शरीर, इंद्रियें, मन, बुद्धी इत्यादी कर्माची सर्व सामुग्री आपल्यापासून भिन्न तसेच संसाराशी अभिन्न आहे. ती संसाराची आहे आणि संसाराच्या सेवेसाठीच मिळालेली आहे. तिला आपली समजून आपल्यासाठी कर्म करण्याने कर्माचा संबंध आपल्याशी होतो. जेव्हा संपूर्ण कर्म केवळ, दुसऱ्याच्या हितासाठीच केली जातात तेव्हा कर्माचा संबंध आपल्याशी राहत नाही. कर्माशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद झाल्यास ''योग'' अर्थात् परमात्म्याशी आपल्या नित्यसिद्ध संबंधाचा अनुभव होतो, जो पूर्वीपासूनच आहे.

**परिशिष्ट भाव**—तेराव्या-चौदाव्या श्लोकांत भगवंताने सांगितले की, कर्तृत्वाभिमान आणि फलेच्छारहित होऊन सृष्टि-रचना इत्यादी कर्म केल्याने ते कर्म मला बंधनकारक होत नाहीत. येथे भगवान् म्हणतात की, मुमुक्षूंनीही याचप्रमाणे कर्तृत्वाभिमान आणि फलेच्छेचा त्या करून कर्म केले आहेत. कारण कर्तृत्वाभिमान आणि फलेच्छा झाल्यासच कर्म बंधनकारक होतात. म्हणून तूही त्याच रीतीने कर्म कर.

ज्ञानयोगात प्रथम कर्तृत्वाभिमानाचा त्याग केला जातो, मग फलेच्छेचा त्याग आपोआप होतो. कर्मयोगात प्रथम फलेच्छेचा त्याग केला जातो, मग कर्तृत्वाभिमानाचा त्याग सुगमतेने होतो.

---

* तावत् कर्माणि कुर्वीत न निर्विद्येत यावता। मत्कथाश्रवणादौ वा श्रद्धा यावन्न जायते॥

(श्रीमद्भा० ११।२०।९)

''तोपर्यंतच कर्म केले पाहिजे जोपर्यंत वैराग्य होणार नाही अथवा जोपर्यंत माझ्या (भगवंताच्या) कथेच्या श्रवणादीमध्ये श्रद्धा उत्पन्न होत नाही.''

*संबंध—पूर्व श्लोकात "एवंज्ञात्वा कृतं कर्म" पदाने कर्मांना जाणण्याची गोष्ट सांगितली होती. आता भगवान् पुढील श्लोकापासून कर्मांना "तत्त्वाने" जाणण्यासाठी प्रकरण आरंभ करतात.*

**किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः।**
**तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्॥ १६॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कर्म** | = कर्म | **कवयः, अपि** | = विद्वान्ही | **प्रवक्ष्यामि** | = चांगल्या रीतीने सांगेन, |
| **किम्** | = काय आहे (आणि) | **मोहिताः** | = मोहित होतात. (म्हणून) | **यत्** | = ज्याला |
| **अकर्म** | = अकर्म | | | **ज्ञात्वा** | = जाणून (तू) |
| **किम्** | = काय आहे— | **तत्** | = ते | **अशुभात्** | = अशुभापासून (संसारबंधनातून) |
| **इति** | = अशा प्रकारे | **कर्म** | = कर्मतत्त्व (मी) | | |
| **अत्र** | = या विषयात | **ते** | = तुला | **मोक्ष्यसे** | = मुक्त होशील. |

*व्याख्या*— **किं कर्म**—साधारणपणे मनुष्य शरीर आणि इंद्रियांच्या क्रियांनाच कर्म मानतो. तसेच शरीर आणि इंद्रियांच्या क्रिया बंद होण्याला अकर्म मानतो. परंतु भगवंतांनी शरीर, वाणी आणि मनाकडून होणाऱ्या सर्व क्रियांना कर्म मानले आहे. "**शरीरवाङमनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः**" (१८।१५)

भावानुसारच कर्माची संज्ञा ठरते. भाव बदलला की, कर्माची संज्ञा बदलते. जसे कर्म स्वरूपाने सात्त्विक दिसत असूनही जर कर्त्याचा भाव राजस अथवा तामस असेल तर ते कर्मसुद्धा राजस अथवा तामस होते. जसे एखादा देवीची उपासनारूपी कर्म करीत आहे. जे स्वरूपाने सात्त्विक आहे. परंतु जर कर्ता ते कर्म एखाद्या कामनेच्या सिद्धीसाठी करत असेल तर ते कर्म राजस होते आणि एखाद्याचा नाश करण्यासाठी करेल तर तेच कर्म तामस होते. त्याचप्रमाणे जर कर्त्यामध्ये फलेच्छा, ममता आणि आसक्ती नसेल तर त्याच्या द्वारा केली गेलेली कर्म "अकर्म" होतात. अर्थात् फलात बांधणारी होत नाहीत. तात्पर्य केवळ बाह्य क्रिया करणे अथवा न करण्याने कर्माच्या वास्तविक स्वरूपाचे ज्ञान होत नाही. या विषयात शास्त्रार्थ जाणणारे मोठमोठे प्रकांड पंडितसुद्धा मोहित होतात. अर्थात् ते कर्माच्या तत्त्वाचा यथार्थ निर्णय करू शकत नाहीत. ज्या क्रियेला ते कर्म मानतात, ते कर्मही होऊ शकते, अकर्मही होऊ शकते आणि विकर्मही होऊ शकते. कारण कर्त्याच्या भावानुसार कर्माचे स्वरूप बदलते. म्हणून भगवान् जणू हे म्हणत आहेत की, वास्तविक दृष्टीने कर्म म्हणजे काय आहे? ते का बंधनकारक ठरते? कसे बंधनकारक होते? यापासून कोण्या रीतीने मुक्त होऊ शकतो?—या सर्वांचे मी विवेचन करीन, जे जाणल्या-नंतर त्याप्रमाणे कर्म केल्यास ती कर्म बंधनकारक होऊ शकणार नाहीत.

जर मनुष्याच्या ठिकाणी ममता, आसक्ती आणि फलेच्छा असेल तर कर्म न करतानासुद्धा वास्तविक कर्मच होत आहे अर्थात् कर्माशी लिप्तता आहे. परंतु जर ममता, आसक्ती आणि फलेच्छा नसेल तर कर्म करतानासुद्धा कर्म होत नाही अर्थात् कर्माशी निर्लिप्तता आहे. तात्पर्य जर कर्ता निर्लिप्त असेल तर कर्म करणे अथवा न करणे दोन्हीही अकर्म आहेत आणि कर्ता लिप्त असेल तर कर्म करणे अथवा न करणे. दोन्हीही कर्म आहेत आणि बंधनकारक आहेत.

**किमकर्मेति**—भगवंतांनी कर्माचे दोन भेद सांगितले आहेत. कर्म आणि अकर्म. कर्माने जीव बांधला जातो आणि अकर्माने (दुसऱ्यासाठी कर्म करण्याने) मुक्त होतो.

कर्मांचा त्याग करणे अकर्म नाही. भगवंतांनी मोहाने केल्या गेलेल्या कर्मांच्या त्यागाला "तामस" म्हटले आहे (१८।७) शारीरिक कष्टाच्या भयाने केल्या गेलेल्या कर्मांच्या त्यागास "राजस" म्हटले आहे (१८।८). तामस आणि राजस त्यागामध्ये कर्मांचा स्वरूपाने त्याग असूनही कर्माशी संबंध विच्छेद होत नाही. कर्मामध्ये फलेच्छा आणि आसक्तीचा त्याग "सात्त्विक" आहे (१८।९). सात्त्विक त्यागात स्वरूपाने कर्म करणेसुद्धा वास्तविक अकर्म आहे, कारण सात्त्विक त्यागात कर्माशी संबंध-विच्छेद होतो. म्हणून कर्म करत असतानासुद्धा त्याच्यापासून निर्लिप्त राहणे वास्तविक अकर्म आहे.

शास्त्राच्या तत्त्वाला जाणणारे विद्वानसुद्धा अकर्म काय आहे या विषयात मोहित होतात. म्हणून कर्म करणे अथवा न करणे—दोन्हीही अवस्थेमध्ये ज्यामुळे जीव बांधला जात नाही, त्या तत्त्वाला समजून घेतल्यानेच कर्म म्हणजे काय आणि अकर्म म्हणजे काय आहे ही गोष्ट समजून येईल. अर्जुन युद्धरूप कर्म न करण्याला कल्याणकारक समजत आहेत. म्हणून भगवान् जणू हे म्हणत आहेत की, युद्धरूपी कर्माचा केवळ त्याग केल्याने तुझी अकर्म अवस्था (बंधनापासून मुक्ती) होणार नाही (३।४) उलट युद्ध करीत असताना-सुद्धा तू अकर्म-अवस्था प्राप्त करू शकतोस (२।३८). म्हणून

अकर्म म्हणजे काय आहे या तत्त्वाला तू समज.

निर्लिप्त राहून कर्म करणे अथवा कर्म करीत असताना निर्लिप्त राहणे—हीच वास्तविक अकर्म अवस्था आहे.

**कवयोऽप्यत्र मोहिताः**—साधारण मनुष्यामध्ये कर्म आणि अकर्माचा तात्त्विक निर्णय करू शकण्याचे सामर्थ्य नसते. शास्त्रार्थ जाणणारे महान पंडितसुद्धा या विषयामध्ये चूक करतात. कर्म आणि अकर्माच्या तत्त्वाचा निर्णय घेताना त्यांच्या बुद्धीत भ्रम होतो. तात्पर्य यांचे तत्त्व एक तर कर्मयोगाने सिद्ध झालेला अनुभवी तत्त्वज्ञ महापुरुष जाणतो अथवा भगवान् जाणतात.

**तत्ते कर्म प्रवक्ष्यामि**—जीव कर्मानेच बांधला गेला आहे. तर कर्मानेच मुक्त होईल. येथे भगवान् प्रतिज्ञा करतात की, मी ते कर्मतत्त्व चांगल्या प्रकारे सांगेन, ज्यामुळे कर्म करूनसुद्धा ती कर्म बंधनकारक ठरणार नाहीत. तात्पर्य कर्म करण्याची ती कला तुला सांगेन की, तू कर्म करूनसुद्धा जन्म-मरणाच्या बंधनातून मुक्त होशील.

कर्म करण्याचे दोन मार्ग आहेत. प्रवृत्तिमार्ग आणि निवृत्तिमार्ग. प्रवृत्तिमार्गाला "कर्म करणे" म्हणतात आणि निवृत्तिमार्गाला "कर्म न करणे" म्हणतात. हे दोन्हीही मार्ग बंधनकारक नाहीत. बंधन करणारी तर कामना, ममता आणि आसक्ती आहे. मग ती प्रवृत्तीमार्गात असो की निवृत्तिमार्गात असो. जर कामना, ममता, आसक्ती नसेल तर मनुष्य प्रवृत्तिमार्ग आणि निवृत्तिमार्ग—दोन्हीत स्वाभाविक मुक्त आहे. ही गोष्ट समजून घेणेच कर्म-तत्त्वाला समजणे आहे.

दुसऱ्या अध्यायाच्या पन्नासाव्या श्लोकात भगवंतांनी "**योगः कर्मसु कौशलम्**" कर्मामध्ये योगच कुशलता आहे असे म्हणून कर्माचे तत्त्व सांगितले. तात्पर्य कर्मबंधनातून सुटका करून घेण्याचा वास्तविक उपाय "योग" अर्थात् समताच आहे. परंतु अर्जुन या तत्त्वाला त्यावेळी ग्रहण करू शकले नाहीत. म्हणून भगवान् या तत्त्वाला पुनः समजून देण्याची प्रतिज्ञा करीत आहेत.

## विशेष गोष्ट

कर्मयोग कर्म नाही तर सेवा आहे. सेवेमध्ये त्यागाची मुख्यता राहते. सेवा आणि त्याग हे दोन्हींही कर्म नाहीत. या दोन्हीत विवेकाची प्रधानता असते.

आपल्याजवळ शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादी जेवढ्या म्हणून वस्तू आहेत त्या सर्व मिळालेल्या आहेत आणि आपल्याला सोडून जाणाऱ्या आहेत. मिळालेल्या वस्तूला आपल्या मानण्याचा आपल्याला अधिकार नाही. संसाराच्या वस्तू संसाराच्याच सेवेमध्ये लावण्याचा आपल्याला अधिकार आहे. जी वस्तू वास्तविक आपली आहे त्या (स्वरूप अथवा परमात्मा) चा त्याग कधीही होऊ शकत नाही आणि जी वस्तू आपली नाही त्याचा (शरीर आणि संसार) त्याग स्वाभाविक होतो. म्हणून त्याग त्याचाच होत असतो जे आपले नाही. परंतु ज्याला चुकीने आपले मानले आहे अर्थात् आपलेपणाच्या मान्यतेचाच त्याग होत असतो. अशा प्रकारे जी वस्तू आपली नाहीच त्याला आपले न मानणे हा त्याग कसा म्हणता येईल? हा तर विवेक आहे.

कर्मसामुग्री (शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादी) आपली आणि आपल्यासाठी नाही तर दुसऱ्यांची आणि दुसऱ्यांसाठीच आहे. याचा संबंध संसाराशी आहे. "स्व" शी याचा कोणताही संबंध नाही. कारण "स्व" नित्य निरंतर निर्विकाररूपाने एकरस राहतो. परंतु कर्मसामुग्री पूर्वी आपल्याजवळ नव्हती, नंतरही आपल्याजवळ राहणार नाही आणि आत्ताही निरंतर ती आपल्याला सोडून जात आहे. म्हणून याच्याद्वारा ज़ी काही कर्म केली जातील ती दुसऱ्यांसाठीच होतात आपल्यासाठी नव्हे. यात एक मार्मिक गोष्ट अशी आहे की, कर्मसामुग्रीशिवाय कोणतेही कर्म केले जाऊ शकत नाही. जसे कितीही मोठा लेखक का असेना, शाई, लेखणी आणि कागद यावाचून तो काहीही लिहू शकत नाही. म्हणून जर कर्मसामुग्रीवाचून कोणतेही कार्य केले जाऊ शकत नाही तर हे विधान मानावेच लागेल की, आपल्यासाठी काहीही करावयाचे नाही. कारण कर्मसामुग्रीचा संबंध संसाराशी आहे आपल्याशी नाही. म्हणून कर्मसामुग्री आणि कर्म नेहमी दुसऱ्यासाठीच असतात, ज्याला "सेवा" म्हणतात. दुसऱ्याचीच वस्तू दुसऱ्याला मिळाली तर सेवा कुठे झाली? हा तर विवेक आहे.

अशा प्रकारे त्याग आणि सेवा—हे दोन्हीही कर्मसाध्य नाहीत तर विवेकसाध्य आहेत. मिळालेली वस्तू आपली नाही, दुसऱ्याची आणि दुसऱ्याच्या सेवेमध्ये लावण्यासाठीच आहे—हा विवेक आहे. म्हणून मूलतः कर्मयोग कर्म नसून विवेक आहे.

विवेक एखाद्या कर्माचे फल नाही तर प्राणीमात्राला अनादिकालापासून स्वाभाविक प्राप्त आहे. जर विवेक एखाद्या शुभ कर्माचे फल असते तर विवेकाशिवाय त्या शुभ कर्माला कोणी केले असते? कारण विवेकामुळेच मनुष्य शुभ आणि अशुभ कर्मांच्या भेदाला जाणतो. तसेच अशुभ कर्माचा त्याग करून शुभ कर्माचे आचरण करतो. म्हणून विवेक शुभ कर्मांचे कारण आहे कार्य नव्हे. हा विवेक स्वाभाविक असतो म्हणून कर्मयोगही स्वाभाविक आहे. अर्थात् कर्मयोगात

परिश्रम नाहीत. त्याचप्रमाणे ज्ञानयोगामध्ये आपले असंग स्वरूप स्वत: सिद्ध आहे आणि भक्तियोगामध्ये भगवंताशी आपला संबंध स्वत:सिद्ध आहे.

**यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्**—जीव स्वत: शुभ आहे आणि परिवर्तनशील संसार अशुभ आहे. जीव स्वत: परमात्म्याचा नित्य अंश असूनसुद्धा परमात्म्याशी विमुख होऊन अनित्य संसारामध्ये फसला आहे. भगवान् म्हणतात की, मी त्या कर्म-तत्त्वाचे वर्णन करीन, ज्याला जाणून कर्म केल्याने तू अशुभापासून अर्थात् जन्म-मरणरूपी संसार-बंधनातून मुक्त होशील.

(या श्लोकात कर्मांना जाणण्याचे जे प्रकरण आरंभ झाले आहे त्याचा उपसंहार बत्तीसाव्या श्लोकात "**एवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे**" पदाने केला गेला आहे.)

**मार्मिक गोष्ट**

कर्मयोगाचे तात्पर्य "कर्म" संसारासाठी आणि "योग" आपल्यासाठी, हे आहे. कर्माचे दोन अर्थ होतात. करणे आणि न करणे. ह्या दोन्ही प्राकृत अवस्था आहेत. या दोन्हीही अवस्थेत अहंता राहते. कर्म करण्यात "कार्य" रूपाने अहंता राहते आणि कर्म न करण्यात "कारण" रूपाने अहंता राहते. जोपर्यंत अहंता आहे तोपर्यंत संसाराशी संबंध असतो आणि जोपर्यंत संसाराशी संबंध आहे तोपर्यंत अहंता आहे. परंतु "योग" दोन्हीही अवस्थाहून अतीत आहे. या योगाचा अनुभव करण्यासाठी अहंतारहित होणे आवश्यक आहे. अहंतारहित होण्याचा उपाय, कर्म करताना अथवा न करताना योगामध्ये स्थित राहणे आणि योगामध्ये स्थित राहून कर्म करणे अथवा न करणे—हा आहे. तात्पर्य कर्म करणे अथवा न करणे दोन्हीही अवस्थेत निर्लिप्तता रहावी—"**योगस्थ: कुरु कर्माणि**" (२।४८)

कर्म करण्याने संसारामध्ये आणि कर्म न करण्याने परमात्म्यामध्ये प्रवृत्ती होते. असे मानून संसारापासून निवृत्त होऊन एकांतामध्ये ध्यान आणि समाधी लावणेसुद्धा कर्म करणेच आहे. एकांतामध्ये ध्यान आणि समाधी लावण्याने तत्त्वाचा साक्षात्कार होईल—अशा प्रकारे भविष्यामध्ये परमात्म-तत्त्वाची प्राप्ती करण्याचा भावसुद्धा कर्माचे सूक्ष्म रूप आहे. कारण की, करण्याच्या आधारावरच भविष्यात तत्त्वप्राप्तीची आशा राहते. परंतु परमात्मतत्त्व करणे आणि न करणे या दोन्हीहून पलीकडचे आहे.

भगवान् म्हणतात की, मी ते कर्म-तत्त्व सांगेन, जे जाणल्याने तात्काळ परमात्मतत्त्वाची प्राप्ती होइल. याच्यासाठी भविष्याची (काळाची) अपेक्षा नाही. कारण परमात्मतत्त्व संपूर्ण देश, काळ, वस्तू, व्यक्ती, शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, प्राण इत्यादीमध्ये समानरूपाने परिपूर्ण आहे. मनुष्य आपणाला ज्याठिकाणी समजतो त्याच ठिकाणी परमात्मा असतात. कर्म करीत असताना अथवा करीत नसताना दोन्ही अवस्थेत परमात्मतत्त्वाचा संबंध आपल्याशी जसाच्या तसाच राहतो. केवळ प्रकृतिजन्य क्रिया आणि पदार्थांशी संबंध मानल्यामुळेच त्याचा अनुभव येत नाही.

अहंतेने केलेले साधन आणि साधनेचा अभिमान जोपर्यंत राहतो तोपर्यंत अहंतेचा नाश होत नाही उलट ती दृढ होत राहते. मग ती अहंता स्थूलरूपाने (कर्म करण्याशी) राहो अथवा सूक्ष्मरूपाने (कर्म न करण्याशी) राहो!

"मी करीत आहे" यामध्ये जशी अहंता असते तशीच अहंता "मी करीत नाही" याच्यातही आहे. आपल्यासाठी काहीही न करण्याने अर्थात् सर्व कर्म संसारासाठीच करण्याने अहंता संसारामध्ये विलीन होते.

***संबंध**—आता भगवंत कर्मांच्या तत्त्वाला जाणून घेण्याची प्रेरणा करीत आहेत.*

## कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मण:।
## अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गति:॥१७॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कर्मण:, अपि** | = कर्मांचे (तत्त्व) ही | **च** | = तसेच | **कर्मण:** | = कर्मांची |
| **बोद्धव्यम्** | = जाणले पाहिजे | **विकर्मण:** | = विकर्माचे (तत्त्वही) | **गति:** | = गती |
| **च** | = आणि | | | **गहना** | = गहन आहे अर्थात् समजण्यास फारकठीण आहे |
| **अकर्मण:** | = अकर्माचे (तत्त्वही) | **बोद्धव्यम्** | = जाणले पाहिजे, | | |
| **बोद्धव्यम्** | = जाणले पाहिजे | **हि** | = कारण | | |

*व्याख्या*— **कर्मणो ह्यपि बोद्धव्यम्**—कर्म करीत असताना अलिप्त राहणेच कर्माच्या तत्त्वाला जाणणे आहे, ज्याचे वर्णन पुढे अठराव्या श्लोकात "**कर्मण्यकर्म य: पश्येत्**" पदाने केले गेले आहे.

कर्म स्वरूपाने एक दिसत असले तरी अंत:करणाच्या भावानुसार त्याचे तीन भेद होतात. सकामभावनेने केली

गेलेली शास्त्रविहित क्रिया ''कर्म '' होते. फलेच्छा, ममता आणि आसक्तिरहित होऊन केवळ, दुसऱ्याच्या हितासाठी केली गेलेली कर्म ''अकर्म'' होतात. विहित कर्मसुद्धा जर दुसऱ्याचे अहित करणे अथवा त्याला दुःख पोचविण्याच्या भावनेने केले गेलेले असेल तर ते देखील ''विकर्म'' होते. निषिद्ध कर्म तर ''विकर्म'' आहेच.

**अकर्मणश्च बोद्धव्यम्**—निर्लिप्त राहून कर्म करणेच अकर्माच्या तत्त्वाला जाणणे आहे, ज्याचे वर्णन पुढे अठराव्या श्लोकात ''**अकर्मणि च कर्म यः**'' पदांनी केले गेले आहे.

**बोद्धव्यं च विकर्मणः**—कामनेमुळे कर्म होतात. जेव्हा कामना अधिक वाढते तेव्हा विकर्म (पापकर्म) होतात.

दुसऱ्या अध्यायाच्या अडतीसाव्या श्लोकात भगवंतांनी सांगितले आहे की, जर युद्धासारखे हिंसायुक्त घोर कर्मसुद्धा शास्त्राज्ञेप्रमाणे आणि समता राखून (जय-पराजय, लाभ-हानी आणि सुखदुःखांना समान समजून) केले गेले तर त्यापासून पाप लागत नाही. तात्पर्य समता राखून कर्म करण्याने विकर्म होत असलेले दिसत असले तरीसुद्धा ते ''अकर्म'' होत असते.

शास्त्रनिषिद्ध कर्माचे नाव ''विकर्म'' आहे. विकर्म होण्यास कामनाच कारण आहे (३।३६-३७)* म्हणून विकर्माचे तत्त्व कामना आहे आणि विकर्माच्या तत्त्वाला जाणणे म्हणजे विकर्माचा स्वरूपतः त्याग करणे तसेच त्याचे कारण असलेल्या कामनेचा त्याग करणे आहे.

**गहना कर्मणो गतिः**—कोणते कर्म मुक्त करणारे आणि कोणते कर्म बंधन करणारे आहे—याचा निर्णय करणे फार कठीण आहे. कर्म म्हणजे काय, अकर्म म्हणजे काय आणि विकर्म म्हणजे काय आहे याचे यथार्थ तत्त्व जाणून घेण्यामध्ये मोठमोठे प्रकांड पंडित देखील स्वतःला असमर्थ समजतात. अर्जुनालाही हे तत्त्व न समजल्यामुळे ते आपल्या युद्धरूपी कर्तव्यकर्माला घोर कर्म समजत आहेत. म्हणून कर्माची गती (ज्ञान अथवा तत्त्व) फार गहन आहे.

**शंका**—या (सतराव्या) श्लोकात भगवंतांनी ''**बोद्धव्यं च विकर्मणः**'' पदांनी हे म्हटले आहे की, विकर्माचे तत्त्वही जाणून घेतले पाहिजे. परंतु एकोणीसाव्यापासून तेवीसाव्या श्लोकापर्यंतच्या प्रकरणामध्ये भगवंतांनी ''विकर्मा'' च्या विषयामध्ये काही सांगितलेच नाही. मग केवळ या श्लोकातच विकर्माविषयीचे विवेचन का केले?

**समाधान**—एकोणीसाव्यापासून ते वीसाव्या श्लोकापर्यंतच्या प्रकरणामध्ये भगवंतांनी मुख्यरूपाने ''कर्मात अकर्मा'' विषयी विवेचन केले आहे, ज्यामुळे सर्व कर्म अकर्म होऊन जावे अर्थात् कर्म करूनसुद्धा बंधन व्हावयास नको. कर्म आणि विकर्म यांचा निकटचा संबंध आहे. कारण कर्मामध्ये कामनाच विकर्माला मुख्य हेतू आहे. म्हणून कामनेचा त्याग करण्यासाठी तसेच विकर्माला तुच्छ दाखविण्यासाठी भगवंतांनी विकर्माचे नाव घेतले आहे.

ज्या कामनेने ''कर्म '' होतात तीच कामना अधिक वाढल्यास ''विकर्म'' होऊ लागतात. परंतु कामना नष्ट झाल्यावर सर्व कर्म ''अकर्म'' होतात. या प्रकरणाचे मुख्य तात्पर्य ''अकर्मा'' ला जाणून घेण्यातच आहे आणि कामनांचा नाश झाल्यावर ''अकर्म'' होते. कामनेचा नाश झाल्यावर विकर्म होतच नाही, म्हणून विकर्माच्या विवेचनाची आवश्यकताच नाही. म्हणून या प्रकरणात विकर्माचे विवेचन आले नाही. दुसरी गोष्ट अशी की विकर्म पापजनक आणि नरकांची प्राप्ती करून देणारे असल्यामुळे संपूर्णपणे त्याज्य आहे. म्हणून याचा विस्तार केला गेला नाही. मात्र विकर्माचे मूळ कारण ''कामना'' हिचा त्याग करण्याविषयीचा भाव या प्रकरणामध्ये मुख्यरूपाने आला आहे. जसे ''**कामसङ्कल्पवर्जिताः**'' (४।१९), ''**त्यक्त्वा कर्मफलासङ्गम्**'' (४।२०), ''**निराशीः**'' (४।२१), ''**समः सिद्धावसिद्धौ च**'' (४।२२), ''**गतसङ्गस्य**'', ''**यज्ञायाचरतः**'' (४।२३)

अशा प्रकारे विकर्माचे मूळ ''कामना'' हिच्या त्यागाचे वर्णन करण्यासाठीच या श्लोकात विकर्माला जाणून घेण्याविषयी सांगितले गेले आहे.

**परिशिष्ट भाव**—आपल्यासाठी आणि दुसऱ्यासाठी, आत्ता आणि परिणामी कोणत्या कर्माचे कोणते फल प्राप्त होते, हे समजणे फार कठीण आहे. एखादे कर्म केल्याने मनुष्य आपले हित समजतो, परंतु होते अहित! तो लाभासाठी करतो परंतु होते नुकसान! तो सुखासाठी करतो परंतु होते दुःख! कारण कर्तृत्वाभिमान आणि फलेच्छा (सुखासक्ती) राहिल्यामुळे मनुष्य कर्मांची गती समजू शकत नाही.

***संबंध**—आता भगवान् कर्माच्या तत्त्वाला जाणून घेणाऱ्या मनुष्याची प्रशंसा करतात.*

---

* सोळाव्या अध्यायात ज्या ठिकाणी आसुरी संपत्तीचे वर्णन आले आहे त्या ठिकाणी आठव्या श्लोकापासून तेवीसाव्या श्लोकापर्यंत ''काम'' शब्द एकूण नऊ वेळा आला आहे. यावरुन सिद्ध होते की, ''काम'' अर्थात् कामनाच संपूर्ण आसुरी संपत्ती (विकर्म) चे कारण आहे !

**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः।**
**स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत्॥ १८॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यः** | = जो मनुष्य | **यः** | = जो | **बुद्धिमान्** | = बुद्धिमान आहे, |
| **कर्मणि** | = कर्मात | **अकर्मणि** | = अकर्मात | **सः** | = तो |
| **अकर्म** | = अकर्म | **कर्म** | = कर्म (पाहतो) | **युक्तः** | = योगी आहे, (आणि) |
| **पश्येत्** | = पाहतो | **सः** | = तो | **कृत्स्नकर्मकृत्** | = संपूर्ण कर्मांना करणारा (कृतकृत्य) आहे. |
| **च** | = आणि | **मनुष्येषु** | = मनुष्यांत | | |

*व्याख्या*— **कर्मण्यकर्म यः पश्येत्**—कर्म करून अथवा न करून त्यापासून अलिप्त राहणे अर्थात् आपल्यासाठी कोणतीही प्रवृत्ती अथवा निवृत्ती न करणे, कर्मामध्ये अकर्म पाहणे आहे. अमुक कर्म मी करीत आहे, या कर्माचे अमुक फल मला मिळावे, असा भाव ठेवून कर्म करण्यानेच मनुष्य कर्माने बंधनात पडतो. प्रत्येक कर्माचा आरंभ आणि अंत होत असतो म्हणून त्याचे फलही आरंभ आणि अंत होणारे असते. परंतु जीव स्वतः नित्य निरंतर राहतो. अशा प्रकारे जरी जीव स्वतः परिवर्तनशील कर्म आणि त्याच्या फलापासून संपूर्णपणे संबंधरहित आहे तरीपण तो फलाच्या इच्छेमुळे त्याच्याशी बांधला जातो. म्हणून चौदाव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, मला कर्म बांधत नाहीत कारण कर्मफलामध्ये माझी स्पृहा नाही. फलाची स्पृहा अथवा इच्छा हीच बांधणारी आहे—"**फले सक्तो निबध्यते**" (५।१२)

फलाची इच्छा न ठेवल्याने नवीन आसक्ती उत्पन्न होत नाही आणि दुसऱ्याच्या हितासाठी कर्म करण्याने पूर्वीची आसक्ती नष्ट होते. अशा प्रकारे आसक्तिरूप बंधन न राहिल्याने साधक संपूर्णपणे वीतराग होतो. वीतराग झाल्याने सर्व कर्म अकर्म होतात.

जीवाचा जन्म कर्मबंधनानुसार होत असतो. जसे ज्या परिवारात जन्म घेतला असेल त्या परिवारातील लोकांशी ऋणानुबंध असतो. अर्थात् एखाद्यापासून उऋण होणे असते आणि एखाद्याकडून ऋण वसूल करावयाचे असते. कारण अनेक जन्मामध्ये अनेकाकडून घेतलेले असते आणि अनेकांना दिलेले असते. हा देण्या घेण्याचा व्यवहार अनेक जन्मापासून चालत आलेला आहे. हा व्यवहार बंद केल्या-शिवाय जन्म-मरणापासून सुटका मिळू शकत नाही. याला बंद करण्याचा उपाय, पुढे घेणे बंद करणे अर्थात् आपल्या अधिकाराचा त्याग करणे आणि आपल्यावर ज्यांचा अधिकार आहे त्यांची सेवा आरंभ करणे, हा आहे. अशा प्रकारे नवीन ऋण घेऊ नये आणि मागील ऋण (दुसऱ्यासाठी कर्म करून) फेडून टाकावे म्हणजे ऋणानुबंध (देण्या-घेण्याचा व्यवहार) समाप्त होईल, अर्थात् जन्म-मरण थांबेल. (४।२३) जसे एखादा दुकानदार आपले दुकान बंद (व्यवहार बंद) करू इच्छित असेल तर तो दोन कामे करील. पहिले ज्याचे देणे आहे, त्याला देऊन टाकील आणि दुसरे ज्याच्याकडून येणे आहे ते वसूल करील अथवा सोडून देईल. असे केल्याने त्याचे दुकान (व्यवहार) बंद होईल. जर तो असा विचार करेल की, जे येणे आहे ते सर्वचे सर्व वसूल करू तर दुकान बंद होणार नाही. कारण जोपर्यंत तो वसूलीच्या इच्छेने वस्तू देत राहील तोपर्यंत दुकान चालतच राहील, बंद होणार नाही.

आपल्यासाठी काहीही न करणे आणि न इच्छिण्याने असंगता आपोआप प्राप्त होते. कारण करण (शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, प्राण) आणि उपकरण (कर्म करण्यात उपयोगी सामुग्री) संसाराचे आहेत आणि संसाराच्या सेवेमध्ये लावण्यासाठीच मिळाले आहेत, आपल्यासाठी नव्हे. म्हणून संपूर्ण कर्तव्यकर्म (सेवा, भजन, जप, ध्यान, समाधीसुद्धा) केवळ संसाराच्या हितासाठीच करण्याने कर्मांचा प्रवाह संसाराकडे जातो आणि साधक स्वतः असंग, निर्लिप्त राहतो. हेच कर्मामध्ये अकर्म पाहणे आहे.

जोपर्यंत प्रकृतीशी संबंध आहे तोपर्यंत कर्म करणे अथवा न करणे—दोन्हीही "कर्म" आहेत. म्हणून कर्म करणे अथवा न करणे—दोन्हीही अवस्थेमध्ये कर्मयोग्याने निर्लिप्त रहावे. कर्म करण्यामध्ये निर्लिप्त राहण्याचे तात्पर्य, कर्म करण्याने आपल्याला चांगला लाभ मिळेल, आपल्याला चांगले फल मिळेल, आपले ध्येय साध्य होईल, लोक आपल्याला चांगले म्हणतील, यालोकी आणि परलोकी आपल्याला भोग मिळतील—अशा प्रकारची कोणतीही इच्छा न होणे, हे आहे. तसेच कर्म न करण्यामध्ये निर्लिप्त राहण्याचे तात्पर्य, कर्मांचा त्याग केल्याने आपल्याला मान, आदर, भोग, शरीराला आराम इत्यादी मिळतील—अशा प्रकारची किंचिन्मात्र-सुद्धा इच्छा नसणे, हे आहे.

दु:ख समजून तसेच शारीरिक कष्टाच्या भयाने कर्म न करणे राजस त्याग आहे आणि मोह आळस, प्रमादामुळे कर्म न करणे तामस त्याग आहे. हे दोन्हीही त्याग सर्वथा त्याज्य आहेत. याशिवाय कर्म न करणे जर आपल्या विलक्षण स्थितीसाठी असेल, समाधीचे सुख भोगण्यासाठी असेल, जीवन्मुक्तीचा आनंद घेण्यासाठी असेल तर या त्यागानेही प्रकृतीशी संबंध-विच्छेद होत नाही. कारण जोपर्यंत कर्म न करण्याशी संबंध आहे तोपर्यंत प्रकृतीशी संबंध राहतो. प्रकृतीशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद झाल्यास कर्मयोगी कर्म करणे आणि न करणे या दोन्ही अवस्थेत जसाच्या तसा निर्लिप्त राहतो.

**अकर्मणि च कर्म यः**—अकर्मामध्ये कर्म पाहण्याचे तात्पर्य, निर्लिप्त राहून कर्म करणे अथवा न करणे, हे आहे. भाव असा आहे की, कर्म करीत असताना अथवा नसताना सुद्धा नित्य निरंतर निर्लिप्त रहावे.

संसारामध्ये एखादा कार्य करण्यासाठी प्रवृत्त होतो तर त्यावेळी त्याच्यासमोर प्रवृत्ती (करणे) आणि निवृत्ती (न करणे) दोन्हीही येतात. एखाद्या कार्यात प्रवृत्ती होते आणि एखाद्या कार्यापासून निवृत्ती होते. परंतु कर्मयोग्याची प्रवृत्ती आणि निवृत्ती दोन्हीही अलिप्त राहून आणि केवळ संसाराच्या हितासाठीच होतात. प्रवृत्ती आणि निवृत्ती—दोन्हीशीही त्याचे काही प्रयोजन नसते—"**नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन**" (३।१८). जर प्रयोजन असेल तर तो कर्मयोगी नसतो तर कर्मी असतो.

साधक जोपर्यंत प्रकृतीशी आपला संबंध मानतो तोपर्यंत तो कर्म करण्याने आपली सांसारिक उन्नती मानतो आणि कर्म न करण्याने आपली पारमार्थिक उन्नती मानतो. परंतु वास्तविक पाहता प्रवृत्ती आणि निवृत्ती दोन्हीही प्रवृत्ती आहेत. कारण दोन्हीमध्येही प्रकृतीशी संबंध राहतो. जसे चालणे, फिरणे, खाणे-पिणे इत्यादी स्थूल शरीराच्या क्रिया आहेत, तसेच एकांतात बसून राहणे, चिंतन करणे, ध्यान लावणे, सूक्ष्म शरीराच्या क्रिया आहेत आणि समाधी लावणे कारण शरीराची क्रिया आहे. म्हणून निर्लिप्त राहूनच लोकसंग्रहार्थ कर्तव्यकर्म करावयाचे आहे. हेच अकर्मामध्ये कर्म आहे. यालाच दुसऱ्या अध्यायाच्या अठ्ठेचाळीसाव्या श्लोकात "**योगस्थः कुरु कर्माणि**" (योग अर्थात् समतेमध्ये स्थित होऊन कर्म कर) पदाने म्हटले आहे.

सांसारिक प्रवृत्ती आणि निवृत्ती—दोन्ही "कर्म" आहेत. प्रवृत्ती अथवा निवृत्ती करताना निर्लिप्त राहणे आणि निर्लिप्त राहूनच प्रवृत्ती अथवा निवृत्ती करणे—अशा प्रकारे प्रवृत्ती आणि निवृत्ती—दोन्हीमध्ये संपूर्णपणे निर्लिप्त राहणे "योग" आहे. यालाच कर्मयोग म्हणतात.

**शंका**—कर्म करताना अथवा न करताना निर्लिप्त राहणे आणि निर्लिप्त राहून कर्म करणे अथवा न करणे—या दोन्हीत "अकर्म" अर्थात् एक निर्लिप्तताच मुख्य झाली, मग भगवंतांनी कर्मामध्ये अकर्म आणि अकर्मामध्ये कर्म—ह्या दोन गोष्टी का सांगितल्या?

**समाधान**—कर्मामध्ये अकर्म आणि अकर्मामध्ये कर्म—या दोन्हीमध्ये एक निर्लिप्तता प्रधान असतानासुद्धा कर्मामध्ये अकर्म ह्यामध्ये कर्म करताना अथवा न करताना दोन्ही अवस्थेमध्ये राहणाऱ्या निर्लिप्ततेची मुख्यता आहे आणि अकर्मात कर्म ह्यामध्ये निर्लिप्त राहून कर्म करणे अथवा न करणे याची मुख्यता आहे. तात्पर्य निर्लिप्तता आपल्यासाठी आणि कर्म संसारासाठी आहे. कारण निर्लिप्ततेचा संबंध "स्व" (स्वरूप) शी आणि कर्म करणे अथवा न करणे याचा संबंध "पर" (शरीर, संसार) शी आहे. म्हणून निर्लिप्तता स्वधर्म आणि कर्म करणे अथवा न करणे परधर्म आहे. या दोन्हींचा विभाग संपूर्णपणे वेगवेगळा दाखविण्यासाठीच भगवंतांनी उपर्युक्त दोन गोष्टी सांगितल्या.

कर्मामध्ये अकर्म आणि अकर्मामध्ये कर्म—या दोन्ही गोष्टी कर्मयोगाच्या आहेत. ज्याचे तात्पर्य प्रकृतीशी तर संपूर्णपणे संबंध-विच्छेद व्हावा अर्थात् करणे अथवा न करणेशी आपले कोणतेही प्रयोजन रहावयास नको आणि लोकसंग्रहासाठी कर्माचे करणे अथवा न करणे व्हावे. कारण कर्म करून निर्लिप्त राहणे आणि निर्लिप्त राहूनसुद्धा दुसऱ्याच्या हितासाठी कर्म करणे—हे दोन्हीही गीतेचे सिद्धांत आहेत.

प्रवृत्ती (करणे) आणि निवृत्ती (न करणे) दोन्हीही प्रकृतीच्या राज्यातीलच आहेत. प्रकृती निरंतर परिवर्तनशील आहे. म्हणून प्रवृत्तीचासुद्धा आरंभ आणि अंत होत असतो. तसेच निवृत्तीचाही आरंभ आणि अंत होत असतो. परंतु याहून संपूर्णपणे वेगळे असलेले परम निवृत्ततत्त्व—आपल्या स्वरूपाचा आदि आणि अंत होत नाही. ते तत्त्व प्रवृत्ती आणि निवृत्तीच्या आरंभीही राहते आणि त्यांच्या अंतीही राहते. तसेच प्रवृत्ती आणि निवृत्तीच्या काळातही जसेच्या तसे राहते. ते प्रवृत्ती आणि निवृत्ति—दोन्हींचे प्रकाशक आणि आधार आहे. म्हणून त्यामध्ये प्रवृत्तीही नाही आणि निवृत्तीही नाही. ह्या तत्त्वाला समजण्याकरिता आणि त्यात स्थित होऊन लोकसंग्रहार्थ (यज्ञार्थ) कर्म करण्यासाठी याठिकाणी कर्मामध्ये अकर्म आणि अकर्मामध्ये कर्म ह्या दोन गोष्टी

सांगितल्या आहेत.

**स बुद्धिमान्मनुष्येषु**—जो पुरुष कर्मामध्ये अकर्म पाहतो आणि अकर्मात कर्म पाहतो अर्थात् नित्य निरंतर निर्लिप्त राहतो, तोच वास्तविक कर्म तत्त्वाला जाणणारा आहे. जोपर्यंत तो निर्लिप्त झाला नाही अर्थात् कर्म आणि पदार्थांना आपले आणि आपल्यासाठी मानतो, तोपर्यंत त्याने कर्म तत्त्वाला समजलेच नाही.

परमात्म्याला जाणून घेण्यासाठी स्व ने परमात्म्याशी अभिन्नतेचा अनुभव करावयाचा असतो आणि संसाराला जाणून घेण्यासाठी स्व ने संसाराशी (क्रिया आणि पदार्थ) संपूर्णपणे भिन्नतेचा अनुभव करावयाचा असतो. कारण वास्तविक पाहता आपण (स्वरूपाने) परमात्म्याशी अभिन्न आणि संसारापासून भिन्न आहोत म्हणून कर्मापासून वेगळे होऊन अर्थात् निर्लिप्त होऊनच कर्म-तत्त्वाला जाणू शकतो. कर्म आदि आणि अंत असणारे आहेत आणि मी (स्वतः जीव) नित्य राहणारा आहे. म्हणून मी स्वरूपाने कर्मापासून वेगळा (निर्लिप्त) आहे—या वास्तविकतेचा अनुभव करणेच "जाणणे" आहे. वास्तविकतेच्या तळाला गेल्याशिवाय जाणणे होऊच कसे शकते?

जसे काजळाच्या खोलीमध्ये प्रवेश करूनही काजळा-पासून सर्वथा निर्लिप्त राहणे साधारण बुद्धिमानाचे काम नाही. तसेच संपूर्ण कर्तव्यकर्मांना करूनसुद्धा कर्माशी सर्वथा निर्लिप्त राहणे साधारण मनुष्याच्या आवाक्यातील गोष्ट नाही. म्हणूनच भगवान् अशा कर्मयोग्याला मनुष्यामध्ये बुद्धिमान् म्हणत आहेत. अठराव्या अध्यायाच्या दहाव्या श्लोकातसुद्धा भगवंतांनी त्याला "**मेधावी**" (बुद्धिमान्) म्हटले आहे.

आत्ताच सतराव्या श्लोकात भगवंतांनी कर्म, अकर्म आणि विकर्म तिन्हीचे तत्त्व समजून घेण्यास सांगितले होते. येथे "**मनुष्येषु बुद्धिमान्**" पद देऊन भगवान् जणू हे सांगत आहेत की, ज्याने कर्मामध्ये अकर्माच्या आणि अकर्मामध्ये कर्माच्या तत्त्वाला जाणून घेतले आहे त्याने सर्व काही जाणले अर्थात् तो ज्ञात-ज्ञातव्य झाला आहे.

**स युक्तः**—कर्मयोगी सिद्धी-असिद्धीमध्ये सम राहतो. कर्माचे फल मिळो अथवा न मिळो त्याच्यात कधी विषमता येत नाही कारण त्याने फलेच्छेचा सर्वथा त्याग केलेला असतो. समतेचे नाव योग आहे. तो नित्य निरंतर समतेमध्ये स्थित असतो म्हणून तो योगी आहे.

प्राणीमात्राचा परमात्म्याशी स्वतः सिद्ध नित्ययोग आहे. परंतु मनुष्याने संसाराशी आपला संबंध मानला म्हणून तो या नित्ययोगाला विसरला. तात्पर्य जडाशी आपला संबंध मानणेच परमात्म्याशी असलेल्या आपल्या नित्य संबंधाला विसरणे आहे. कर्मयोगी फलेच्छा, ममता आणि आसक्तीचा त्याग करून केवळ दुसऱ्यासाठीच कर्तव्यकर्म करतो ज्यामुळे त्याचा जडाशी मानलेला संबंध तुटून जातो आणि त्याला परमात्म्याशी असलेल्या स्वतःसिद्ध नित्ययोगाची अनुभूती होते. म्हणून त्याला योगी म्हटले गेले आहे.

**युक्तः**—या पदात हा भाव आहे की, त्याने प्राप्त करण्यायोग्य तत्त्वाला प्राप्त केले आहे. अर्थात् तो प्राप्त-प्राप्तव्य झाला आहे.

**कृत्स्नकर्मकृत्**—जोपर्यंत काही मिळविणे शिल्लक राहते तोपर्यंत "करणे" ही शिल्लक राहतेच अर्थात् जोपर्यंत काही ना काही मिळविण्याची इच्छा राहते तोपर्यंत करण्याची आसक्ती समाप्त होत नाही.

नाशवान् कर्मांनी मिळणारे फल सुद्धा नाशवान्च असते. जोपर्यंत नाशवान् फलाची इच्छा असते तोपर्यंत (कर्म) करणे समाप्त होत नाही. परंतु जेव्हा नाशवानाशी संपूर्णपणे संबंध सुटून परमात्मप्राप्तीरूपी अविनाशी फलाची प्राप्ती होते तेव्हा करणे (कर्म) नेहमीसाठी समाप्त होऊन जाते आणि कर्मयोग्याचे कर्म करणे अथवा न करणे ह्याच्याशी कोणतेही प्रयोजन राहत नाही. असा कर्मयोगी संपूर्ण कर्मांना करणारा आहे अर्थात् त्याच्यासाठी आता काही करावयाचे शिल्लक नसते, तो कृतकृत्य झाला आहे.

करणे, जाणणे आणि मिळविणे शिल्लक न राहिल्याने तो कर्मयोगी अशुभ संसार-बंधनातून मुक्त होतो (४।१६-३२)

**परिशिष्ट भाव**—एक विभाग कर्माचा आहे आणि एक विभाग अकर्माचा आहे. या दोन्हीत अकर्मच सार तत्त्व आहे. म्हणून जो मनुष्य कर्मात अकर्म पाहतो अर्थात् कर्म करून निर्लिप्त राहतो आणि जो अकर्मात कर्म पाहतो अर्थात् निर्लिप्त राहून कर्म करतो, त्याच्यासाठी काहीही करणे, जाणणे आणि प्राप्त करणे शिल्लक राहत नाही. जसे कोण्या कर्माच्या आरंभी तर गणेशजींचे पूजन करतात, परंतु कर्म करतेवेळी सतत त्याचे पूजन करीत नाहीत, तसेच कोणी असे समजू नये की, कर्माच्या आरंभी एकवेळ निर्लिप्त झाले तर आता त्या निर्लिप्ततेला सतत आचरणात आणायचे नाही. म्हणून भगवंताने येथे उपर्युक्त दोन गोष्टी सांगितल्या आहेत. तात्पर्य हे आहे की, आपल्यात कधीही लिप्तता (फलेच्छा आणि कर्तृत्वाभिमान) येऊ, देऊ नये अर्थात् सतत निर्लिप्त रहावे.

तीसऱ्या अध्यायाच्या आठव्या श्लोकात भगवंताने म्हटले आहे की, कर्म न करण्यापेक्षा कर्म करणे श्रेष्ठ आहे—'**कर्म**

**ज्यायो ह्यकर्मणः** ' आणि येथे सांगतात की, कर्म करण्यापेक्षाही अकर्माला (अकर्तृत्वाला) पाहणे श्रेष्ठ आहे आणि अशा पाहणाऱ्या मनुष्यासाठी काहीही करणे, जाणणे आणि प्राप्त करणे शिल्लक राहत नाही. यावरुन सिद्ध होते की, मनुष्यात फलेच्छा आणि कर्तृत्वाभिमान राहू नये, कारण या दोन्हीनेच मनुष्य बांधला जातो.

***संबंध—*** *आता भगवान् पुढील दोन श्लोकात कर्ममध्ये अकर्म आणि अकर्मामध्ये कर्म पाहणारे अर्थात् कर्मांचे तत्त्व जाणणाऱ्या सिद्ध कर्मयोगी महापुरुषाचे वर्णन करीत आहेत.*

**यस्य सर्वे समारम्भाः कामसङ्कल्पवर्जिताः।**
**ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पण्डितं बुधाः॥१९॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यस्य** | = ज्यांचा | | आहे (तसेच) | **तम्** | = त्याला |
| **सर्वे** | = संपूर्ण | **ज्ञानाग्निदग्ध-** | = ज्याची | **बुधाः** | = ज्ञानीलोक (ही) |
| **समारम्भाः** | = कर्मांचा आरंभ | **कर्माणम्** | संपूर्ण कर्मे | **पण्डितम्** | = पंडित |
| **कामसङ्कल्प-** | = संकल्प आणि | | ज्ञानरूपी अग्नीने | | (बुद्धिमान्) |
| **वर्जिताः** | कामनारहित | | जळून गेली आहेत, | **आहुः** | = म्हणतात. |

***व्याख्या—*** **यस्य सर्वे समारम्भाः कामसङ्कल्पवर्जिताः ***—विषयांचे वारंवार चिंतन होण्याने, त्यांची पुनः पुनः आठवण येण्याने, त्याविषयी "हे विषय चांगले आहेत, कामी येणारे आहेत, जीवनाला उपयोगी असून सुख देणारे आहेत"—अशी सम्यक् बुद्धी असणे याला "संकल्प" म्हणतात आणि "हे विषय-पदार्थ आपल्यासाठी चांगले नाहीत, हानिकारक आहेत" अशी बुद्धी उत्पन्न होणे याला विकल्प म्हणतात. असे संकल्प आणि विकल्प बुद्धीच्या ठिकाणी होत असतात. जेव्हा विकल्प नाहीसा होऊन केवळ एक संकल्प शिल्लक राहतो, तेव्हा "हे पदार्थ आपल्याला मिळाले पाहिजेत, हे आमचे झाले पाहिजेत" अशा प्रकारे अंतःकरणात त्यांना प्राप्त करण्याची जी इच्छा होते त्याचे नाव "काम" (कामना) आहे. कर्मयोगात सिद्ध झालेल्या महापुरुषाचे ठिकाणी संकल्प आणि कामना—दोन्हीही राहत नाहीत. अर्थात् त्याचे ठिकाणी कामनेचे कारण संकल्प राहत नाही आणि संकल्पाचे कार्य कामनाही राहत नाही. म्हणून त्याच्याकडून जी काही कर्म होतात ती सर्व संकल्प आणि कामनारहित होतात.

संकल्प आणि कामना ही दोन्ही कर्माची बीजे आहेत. संकल्प आणि कामना न राहिल्यास कर्म अकर्म होतात. अर्थात् कर्म बंधनकारक ठरत नाहीत. सिद्ध महापुरुषाचे ठिकाणीसुद्धा संकल्प आणि कामना न राहिल्याने त्याच्याकडून होणारी कर्म बंधनकारक नसतात. त्याच्याद्वारा लोकसंग्रहार्थ, कर्तव्य परंपरा सुरक्षित राहण्यासाठी संपूर्ण कर्म होत असूनसुद्धा तो त्या कर्मांपासून स्वतः संपूर्णपणे निर्लिप्त राहतो.

भगवंतांनी कुठे संकल्पांचा (६।४), कुठे कामनांचा (२।५५) आणि कुठे संकल्प तसेच कामना—दोघांचा (६।२४-२५) त्याग सांगितला आहे. म्हणून जेथे केवळ संकल्पांचा त्याग सांगितला आहे तेथे कामनांचा आणि जेथे केवळ कामनांचा त्याग सांगितला आहे तेथे संकल्पांचाही त्याग समजून घ्यावयास हवा. कारण संकल्प कामनांचे कारण आहे आणि कामना संकल्पाचे कार्य आहे. तात्पर्य साधकांनी संपूर्ण संकल्प आणि कामनांचा त्याग केला पाहिजे.

मोटारच्या चार अवस्था असतात—

(१) मोटार ज्यावेळी गैरेजमध्ये ठेवलेली असते त्यावेळी इंजिन आणि चाके दोन्हीही चालत नाहीत.

(२) मोटार चालू केल्यावर इंजिन चालू होते पण चाके चालत नाहीत.

(३) मोटारीला तेथून रवाना केले असता इंजिनही चालते आणि चाकेही चालतात.

(४) उताराच्या रस्त्यावरुन मोटार जात असताना इंजिन बंद करतात आणि चाके चालतात. त्याचप्रमाणे

* ज्याठिकाणी दोन्ही पदांचा अर्थ प्रधान असतो तेथे "द्वंद्व समास" होतो. या ठिकाणी "संकल्प" आणि "काम" दोन्ही शब्द आपापल्या अर्थात प्रधान आहेत. म्हणून येथे "संकल्पाश्च कामाश्च" असा द्वंद्व समास झाल्याने "संकल्प कामाः" असे रूप झाले. परंतु द्वन्द्व समासाच्या ज्या पदात कमी स्वर असतात त्याचा पूर्व प्रयोग होतो. येथेही "काम" शब्दात कमी स्वर असल्याने त्याचा पूर्व प्रयोग झाला आहे म्हणून "कामसंकल्पाः" असे रूप झाले. आता "कामसंकल्पैर्वर्जिताः" असा तृतिया समास केल्यावर पूर्ण पद "कामसंकल्पवर्जिताः" झाले.

मनुष्याच्यासुद्धा चार अवस्था होतात.

(१) कामनाही नसते आणि कर्मही होत नाही.

(२) कामना असते पण कर्म होत नाही.

(३) कामनाही असते आणि कर्मही होते.

(४) कामना नसते आणि कर्म होते.

मोटारची सर्वात उत्तम (चौथी) अवस्था ही आहे की, इंजन न चालावे आणि चाके चालावीत अर्थात् तेलही खर्च होऊ नये आणि मार्गक्रमण होत रहावा. त्याचप्रमाणे मनुष्याची सर्वात उत्तम अवस्था ही आहे की, कामना नसावी आणि कर्म होत रहावेत. अशी अवस्था असणाऱ्या मनुष्याला ज्ञानीलोकसुद्धा पण्डित (बुद्धिमान्) म्हणतात.

**समारम्भाः***—या पदाचा हा भाव आहे की, कर्मयोगाने सिद्ध झालेल्या महापुरुषाकडून प्रत्येक कर्म सावधानीने, सांगोपांग आणि तत्परतेने होत असते. दुसरा एक भाव असाही आहे की, त्याची कर्म शास्त्रसम्मत असतात. त्याच्याकडून करण्यायोग्य कर्मच होतात. ज्यापासून एखाद्याचे अहित होईल असे कर्म त्याच्याकडून कधीही होत नाही.

**सर्वे**—या पदाचा हा भाव आहे की, त्याच्याकडून होणारी सर्वची सर्व कर्म संकल्प आणि कामनारहित होतात. कोणतेही कर्म संकल्पसहित होत नाही. सकाळी उठल्या-पासून संध्याकाळी झोपेपर्यंत शौच-स्नान, खाणे-पिणे, पाठ-पूजा, जप-चिंतन, ध्यान-समाधी, इत्यादी शरीरनिर्वाहसंबंधी संपूर्ण कर्म संकल्प आणि कामनारहितच होतात.

**ज्ञानाग्निदग्धकर्माणम्**—कर्माचा संबंध "पर" (शरीर-संसारा) शी आहे. "स्व" (स्वरूपा) शी नाही. कारण कर्माचा आरंभ आणि अंत होतो. परंतु स्वरूप जसेच्या तसे राहते. या तत्त्वाला योग्य प्रकारे जाणणेच "ज्ञान" आहे. या ज्ञानरूपी अग्नीने संपूर्ण कर्म भस्म होऊन जातात. अर्थात् कर्मामध्ये फल देण्याची (बांधण्याची) शक्ती राहत नाही (४।१६-३२)

वास्तविक पाहता शरीर आणि क्रिया दोन्ही संसाराशी अभिन्न आहेत. परंतु स्व सर्वथा भिन्न असूनही भ्रमाने यांच्याशी आपला संबंध मानतो. जर महापुरुषाचा आपले म्हणविले जाणाऱ्या शरीराशीसुद्धा कोणता संबंध राहत नाही. तर जसे संपूर्ण संसाराकडून सर्व कर्म होत असतात तसेच त्याच्या म्हणविल्या जाणाऱ्या शरीराकडून सर्व कर्म होतात. अशा प्रकारे कर्माशी निर्लिप्ततेचा अनुभव असल्याने त्या महापुरुषाचे वर्तमान कर्मच केवळ नष्ट होत नाहीत तर संचित कर्मसुद्धा सर्वथा नष्ट होतात. प्रारब्धकर्मही केवळ अनुकूल अथवा प्रतिकूल परिस्थितीच्या रूपामध्ये त्याच्या समोर येऊन नष्ट होतात. परंतु फलाशी असंग असल्याने तो त्यांचा भोक्ता बनत नाही. अर्थात् किंचित्मात्रसुद्धा सुखी अथवा दुःखी होत नाही. म्हणून प्रारब्धकर्मसुद्धा अस्थायी परिस्थिती केवळ निर्माण करून नष्ट होऊन जातात.

**तमाहुः पण्डितं बुधाः**—जो कर्मांचा स्वरूपाने त्याग करून परमात्म्याकडे वळला आहे, त्या मनुष्याला समजून घेणे तर सुगम आहे. परंतु जो किंचित्मात्रसुद्धा कर्माशी लिप्त न होता तत्परतेने कर्म करत असतो, त्याला समजून घेणे कठीण आहे. संतवाणी मध्ये आलेले आहे.

**त्यागी शोभा जगतमें करता है सब कोय।**
**हरिया गृहस्थी संतका भेदी बिरला होय॥**

तात्पर्य संसारात (बाह्य त्याग करणारे) त्यागी पुरुषाचे माहात्म्य तर सर्व गातात, परंतु गृहस्थाश्रमामध्ये राहून सर्व कर्तव्यकर्म करूनसुद्धा जो निर्लिप्त राहतो त्या (अंतर-त्याग करणाऱ्या) पुरुषाला ओळखणारा एखादा विरळाच असतो.

जसे कमळाचे पान पाण्यातूनच उत्पन्न होऊन आणि पाण्यातच राहूनसुद्धा पाण्याशी लिप्त होत नाही तसेच कर्मयोगी कर्मयोनीतच (मनुष्यशरीर) उत्पन्न होऊन आणि कर्ममय जगतात राहून कर्म करूनसुद्धा कर्माशी लिप्त होत नाही†. कर्माशी लिप्त न होणे एखाद्या साधारण बुद्धिवानाचे काम नाही. मागील अठराव्या श्लोकात भगवंतांनी अशा कर्म-योग्याला "मनुष्यात बुद्धिमान्" म्हटले आहे आणि येथे म्हटले आहे की, त्यांना ज्ञानीलोकसुद्धा पण्डित अर्थात् बुद्धिमान् म्हणतात. भाव हा आहे की, असा कर्मयोगी पंण्डितांचाही पण्डित, ज्ञान्यांचासुद्धा ज्ञानी आहे.‡

* याठिकाणी "समारम्भाः" पद सिद्ध कर्मयोग्याच्या राग-द्वेषरहित सांगोपांग प्रवृत्तीचे वाचक आहे. चौदाव्या अध्यायाच्या बाराव्या श्लोकात आलेल्या "आरम्भ" पदाचा वाचक नाही. कारण तेथे "प्रवृत्ति" आणि "आरम्भ" हे दोन शब्द आले आहेत म्हणून तेथे कर्तव्यकर्म करणे "प्रवृत्ती" आहे तसेच भोग आणि संग्रहाच्या उद्देशाने नवीन नवीन कर्मांना सुरू करणे "आरम्भ" आहे.

† निवृत्तिरपि मूढस्य प्रवृत्तिरुपजायते। प्रवृत्तिरपि धीरस्य निवृत्तिफलदायिनी॥ (अष्टावक्रगीता १८।६१)
मूढ पुरुषाची निवृत्तीही प्रवृत्तीला उत्पन्न करणारी असते आणि ज्ञानी पुरूषाची प्रवृत्तीही निवृत्तीरूपी फल देणारी असते.

‡ गृहेषु पण्डिताः केचित्केचिन्मूर्खेषु पण्डिताः। सभायां पण्डिताः केचित्केचित्पण्डितपण्डिताः॥

# त्यक्त्वा कर्मफलासङ्गं नित्यतृप्तो निराश्रयः।
# कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किञ्चित्करोति सः॥ २०॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कर्मफलासङ्गम्** | = (जो) कर्म आणि फलाच्या आसक्तीचा | | आणि | | लागलेलाही (वास्तविक) |
| **त्यक्त्वा** | = त्याग करून | **नित्यतृप्तः** | = सदा तृप्त आहे, | **किञ्चित्, एव** | = काहीही |
| **निराश्रयः** | = आश्रयरहित | **सः** | = तो | **करोति** | = करीत |
| | | **कर्मणि** | = कर्मांत | **न** | = नाही. |
| | | **अभिप्रवृत्तः, अपि** | = उत्तम रीतीने | | |

*व्याख्या*—**त्यक्त्वा कर्मफलासङ्गम्**—जर कर्म करीत असताना कर्त्याचा हा भाव असेल की, शरीरादी कर्म सामुग्री माझी आहे, मी कर्म करीत आहे, कर्म माझे आणि माझ्यासाठी आहे. तसेच याचे मला अमुक फल मिळेल, तर तो कर्मफलाचा हेतू होईल. कर्मयोगामध्ये सिद्धमहापुरुषाला प्राकृत पदार्थाशी संपूर्णपणे संबंध-विच्छेदाचा अनुभव होतो, म्हणून कर्म करण्याच्या सामुग्रीमध्ये, कर्मामध्ये, तसेच कर्म फलामध्ये किंचित्मात्रसुद्धा आसक्ती नसल्यामुळे तो कर्मफलाचा हेतू होत नाही.

सेना विजयाच्या इच्छेने युद्ध करत असते, विजय झाल्यावर विजय सेनेचा न मानता राजाचा मानला जातो. कारण राजानेच सैन्याच्या जीवननिर्वाहाचा प्रबंध केला असतो, सेनेला युद्ध करण्याची सामुग्री दिलेली असते आणि त्याला युद्ध करण्याची प्रेरणा केलेली असते आणि सैन्य देखील राजासाठीच युद्ध करत असते. अशा प्रकारे शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादी कर्मसामुग्रीशी संबंध जडल्यानेच जीव त्यांच्याद्वारा केल्या गेलेल्या कर्माच्या फलाचा भागीदार होतो.

कर्मसामुग्रीशी किंचित्मात्र संबंध नसल्याकारणाने महापुरुषाचा कर्मफलाशी कोणताही संबंध नसतो.

वास्तविक पाहता स्वरूपाचा कर्मफलाशी संबंध नाहीच. कारण स्वरूप चेतन, अविनाशी आणि निर्विकार आहे. परंतु कर्म आणि कर्मफल—दोन्ही जड तसेच विकारी आहेत आणि त्यांचा आरंभ आणि अंत होत असतो. स्वरूपाबरोबर सर्वकाळ कोणतेही कर्म तसेच त्याचे फल राहत नाही. अशाप्रकारे जरी कर्म आणि फलाशी स्वरूपाचा कोणताही संबंध नसतो तरीपण जीवाने भ्रमामुळे त्यांच्याशी आपला संबंध मानला आहे. हा मानलेला संबंधच बंधनाला कारण आहे. जर हा मानलेला संबंध नाहीसा झाला तर कर्म आणि कर्मफलात त्याला त्याच्या स्वतः सिद्ध निर्लिप्ततेचा बोध होतो.

**निराश्रयः**—देश, काल, वस्तू, व्यक्ती, परिस्थिती इत्यादींचा थोडाही आश्रय न घेणे हेच "निराश्रय" अर्थात् आश्रयरहित होणे आहे. कितीही मोठा धनवान, राजा महाराजा का असेना त्याला देश, काल इत्यादींचा आश्रय घ्यावाच लागतो. परंतु कर्मयोगाने सिद्ध झालेला महापुरुष देश, काल इत्यादीचा कोणाचाही आश्रय मानीत नाही. आश्रय मिळो अथवा न मिळो त्याला याची थोडीसुद्धा पर्वा नसते म्हणून तो निराश्रयी असतो.

**नित्यतृप्तः**—जीव (आत्मा) परमात्म्याचा सनातन अंश असल्यामुळे सत्-स्वरूप आहे. सत्चा कधी अभाव होत नाही—"**नाभावो विद्यते सतः**" (२।१६) परंतु जेव्हा तो असत्शी आपला संबंध मानतो तेव्हा त्याला आपल्यामध्ये अभाव अर्थात् उणीवेचा अनुभव येऊ लागतो. त्या उणीवेची पूर्ती करण्यासाठी तो सांसारिक वस्तूंची कामना करू लागतो. इच्छित वस्तू मिळाल्याने एक तृप्ती होते. परंतु ती तृप्ती टिकत नाही, ती क्षणिक असते. कारण. संसाराची प्रत्येक वस्तू, व्यक्ती, परिस्थिती इत्यादी प्रतिक्षण अभावाच्या दिशेने वाटचाल करीत आहे. म्हणून त्यांच्या आश्रित राहणारी तृप्ती स्थायी कशी राहू शकेल? सत् वस्तूची तृप्ती असत् वस्तूने होऊच कशी शकते? म्हणून जीव जोपर्यंत उत्पत्ति-विनाशशील क्रिया आणि पदार्थ यांच्याशी आपला संबंध मानतो तसेच त्यांच्या आश्रयाने राहतो तोपर्यंत त्याला स्वतः सिद्ध नित्य तृप्तीचा अनुभव येत नाही.

कर्मयोगाने सिद्ध झालेला महापुरुष निराश्रयी अर्थात् संसाराच्या आश्रयाने सर्वथा रहित असतो, म्हणून त्याला स्वतःसिद्ध, नित्यतृप्तीचा अनुभव येतो. तीसऱ्या अध्यायाच्या सतराव्या श्लोकात "**आत्मतृप्तः**" पदानेसुद्धा याच नित्य तृप्तीची गोष्ट आलेली आहे.

**कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किञ्चित्करोति सः**—"**अभिप्रवृत्तः**" पदाचे तात्पर्य हे आहे की, कर्मयोगाने सिद्ध झालेल्या महापुरुषद्वारा होणारी सर्व कर्म सांगोपांग रीतीने

होतात. कारण त्याची कर्मफलामध्ये मुळीच आसक्ती नसते. त्याचे संपूर्ण कर्म केवळ संसाराच्या हितासाठीच होतात.

ज्याची कर्मफलामध्ये आसक्ती असते तो सांगोपांग रीतीने कर्म करू शकत नाही. कारण फलाशी संबंध असल्याने कर्म करीत असताना अधुन मधुन फलाचे चिंतन झाल्याने त्याची शक्ती व्यर्थ खर्च होते ज्यामुळे त्याची शक्ती पूर्ण रीतीने कर्म करण्यामध्ये लागत नाही.

**अपि**—या पदाचे तात्पर्य—सांगोपांग रीतीने सर्व कर्म करत असतानाही तो वास्तविक काहीच करत नाही, कारण संपूर्णपणे निर्लिप्त असल्यामुळे कर्माचा त्याला स्पर्शही होत नाही. त्याची सर्व कर्म अकर्म होतात.

जर तो काहीच करत नाही तर तो कर्म फलाशी कसा बांधला जाऊ शकतो? म्हणून अठराव्या अध्यायाच्या बाराव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, कर्मफलाचा त्याग करणाऱ्या कर्मयोग्याला कर्माचे फल कुठेही मिळत नाही. "**न तु सन्न्यासिनां क्वचित्**".

प्रकृती निरंतर क्रियाशील आहे. म्हणून जोपर्यंत प्रकृतीच्या गुणाशी (क्रिया आणि पदार्थ) संबंध आहे तोपर्यंत कर्म न करतानासुद्धा मनुष्याचा कर्माशी संबंध असतो. प्रकृतीच्या गुणाशी संबंध नसल्यास मनुष्य कर्म करत असतानासुद्धा काहीही करत नाही. कर्मयोगाने सिद्ध झालेल्या महापुरुषाचा प्रकृतिजन्य गुणांशी कोणताही संबंध राहत नाही. म्हणून तो लोकहितार्थ सर्व कर्म करत असतानासुद्धा वास्तविक काहीच करीत नाही.

**परिशिष्ट भाव**—जोपर्यंत मनुष्यात कर्तृत्व आहे तोपर्यंत तो करीत असला तरी करीत आहे, आणि करीत नसला तरी करीत आहे. परंतु कर्तृत्व समाप्त झाल्यास तो कधी काही करीत नाही.

***संबंध***—*एकोणीसाव्या-वीसाव्या श्लोकामध्ये कर्मयोगाने सिद्ध झालेल्या महापुरुषांच्या कर्मापासूनच्या निर्लिप्ततेचे वर्णन करून आता भगवान् एकवीसाव्या श्लोकात निवृत्तिपरायण आणि बावीसाव्या श्लोकात प्रवृत्तिपरायण कर्मयोगी साधकाच्या कर्माविषयीच्या निर्लिप्ततेचे वर्णन करीत आहेत.*

## निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः।
## शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्॥ २१॥

**यतचित्तात्मा** = ज्याचे शरीर आणि अंतःकरण उत्तम रीतीने वश झालेले आहे,
**त्यक्तसर्वपरिग्रहः** = ज्याने सर्व प्रकारच्या संग्रहाचा परित्याग केला आहे असा
**निराशीः** = इच्छारहित (कर्मयोगी)
**केवलम्** = केवळ
**शारीरम्** = शरीरसंबंधी
**कर्म** = कर्म
**कुर्वन्** = करून (सुद्धा)
**किल्बिषम्** = पापाला
**न, आप्नोति** = प्राप्त होत नाही.

***व्याख्या***—**यतचित्तात्मा**—संसाराकडून आशा अथवा इच्छा राहिल्यामुळेच शरीर, इंद्रिये, मन इत्यादी वश होत नाहीत. याच श्लोकात "**निराशीः**" पदाने सांगितले आहे की, कर्मयोग्याच्या ठिकाणी आशा अथवा इच्छा राहत नाही. म्हणून त्याचे शरीर, इंद्रिये आणि अंतःकरण आपोआप वश असतात. हे वश असल्याने त्याच्याकडून कोणतीही व्यर्थ क्रिया होत नाही.

**त्यक्तसर्वपरिग्रहः**—कर्मयोगी जर संन्यासी असेल, तर तो सर्व प्रकारच्या भोगसामुग्रीचा स्वरूपाने त्याग करतो. जर तो गृहस्थी असेल तर तो भोगबुद्धीने (आपल्या सुखासाठी) कोणत्याही सामुग्रीचा संग्रह करीत नाही. त्याच्याजवळ जी काही सामुग्री आहे त्याला ती आपली आणि आपल्यासाठी न मानता संसाराची आणि संसारासाठीच मानतो. तसेच संसाराच्या सुखासाठीच त्या सामुग्रीचा व्यय करतो. भोगबुद्धी न ठेवता संग्रहाचा त्याग करणे हे तर सर्व साधकांसाठी आवश्यक आहे.

(असा निवृत्तिपर श्लोक गीतेमध्ये इतर कुठे आला नाही. सहाव्या अध्यायाच्या दहाव्या श्लोकामध्ये ध्यान-योग्यासाठी आणि अठराव्या अध्यायाच्या त्रेपन्नाव्या श्लोकात ज्ञानयोग्यासाठी परिग्रहाचा त्याग करण्याविषयीची गोष्ट आलेली आहे. परंतु त्यापेक्षाही श्रेष्ठ श्रेणीचे परिग्रह त्यागाचे विवेचन "**त्यक्तसर्वपरिग्रहः**" या पदातून आले आहे. कारण "परिग्रहा" बरोबर "सर्व" शब्द केवळ याठिकाणी आला आहे. बाराव्या अध्यायाच्या एकोणीसाव्या श्लोकात भक्ति-योग्यासाठी "**अनिकेतः**" पद आले आहे. परंतु तेथे त्याचा अर्थ निवास-स्थानाविषयी ममता, आसक्तिरहित होणे आहे)

**निराशीः**—कर्मयोग्याचे ठिकाणी आशा, कामना, स्पृहा, वासना इत्यादी राहत नसतात. तो केवळ बाह्य

रीतीनेच भोगसामुग्रीच्या संग्रहाचा त्याग करतो असे नाही तर तो अंत:करणापासून देखील भोगसामुग्रीच्या आशेचा आणि इच्छेचा त्याग करतो. आशा अथवा इच्छा यांचा संपूर्णपणे त्याग न झाला तरीसुद्धा त्याचा उद्देश त्यांच्या त्यागाचाच राहतो.

**शारीरं केवलं कर्म कुर्वन्**—"शारीरम् कर्म" (शरीर संबंधी कर्म) याचे दोन अर्थ होतात. एक् तर शरीराने होणारे कर्म आणि दुसरा शरीरनिर्वाहासाठी केले जाणारे कर्म. शरीराने होणाऱ्या कर्माची गोष्ट पाचव्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकातही आली आहे, ज्याचे तात्पर्य सर्व कर्म शरीर, इंद्रिये, मन, बुद्धीद्वाराच होत आहेत, माझा त्याच्याशी काहीही संबंध नाही असे समजून कर्मयोगी अंत:करणाच्या शुद्धीसाठी कर्म करत असतो. परंतु येथे आलेला श्लोक निवृत्तिपरक आहे. म्हणून येथे उपरोक्त पदाचा अर्थ शरीरनिर्वाहासाठी केली जाणारी आवश्यक सर्व कर्म (खाणे-पिणे, शौच, स्नान इत्यादी) मानणेच उपयुक्त वाटते. निवृत्तिपरायण कर्मयोगी केवळ तेवढेच कर्म करतो जेवढ्याने केवळ शरीरनिर्वाह होईल.

**नाप्नोति किल्बिषम्**—जो कर्म करणे अथवा न करणे याच्याशी आपला थोडासुद्धा संबंध ठेवतो तो पापाला अर्थात् जन्म-मरणरूप बंधनाला प्राप्त होतो. परंतु आशारहित कर्मयोगी कर्म करणे अथवा न करणे याच्याशी आपला काहीही संबंध ठेवत नाही म्हणून तो पापाला प्राप्त होत नाही अर्थात् त्याचे सर्व कर्म अकर्म होऊन जातात.

निवृत्तिपरायण असूनही कर्मयोगी केव्हाही आळस, प्रमाद करीत नाही. आळस, प्रमादाचाही भोग असतो. एकांतात नुसते पडून राहणे याने आळसाचा भोग होतो आणि शास्त्रविरुद्ध तसेच निरर्थक कर्म करण्याने प्रमादाचा भोग होतो. अशाप्रकारे निवृत्तीमध्ये आळसाच्या सुखाचा आणि प्रवृत्तीमध्ये प्रमादाच्या सुखाचा भोग होऊ शकतो. म्हणून आळस-प्रमादाने मनुष्य पापाला प्राप्त होतो. परंतु अत्यंत कमी कर्म करूनसुद्धा निवृत्तिपरायण कर्मयोग्यामध्ये किंचित्मात्रसुद्धा आळस-प्रमाद येत नाहीत. जर त्याचे ठिकाणी थोडेही आळस-प्रमाद आले असते तर "**किल्बिषम् न आप्नोति**" म्हणता आले नसते. तो "**यतचित्तात्मा**" असतो अर्थात् त्याचे शरीर, इंद्रिये आणि अंत:करण संयत असतात. म्हणून त्याचे ठिकाणी आळस-प्रमाद येऊच शकत नाहीत. शरीर, इंद्रिये आणि अंत:करण वश असल्याने, भोगसामुग्रीचा त्याग झाल्याने, तसेच आशा, कामना, ममता इत्यादीपासून रहित झाल्याने त्याच्याकडून निषिद्ध क्रिया होऊच शकत नाही.

याठिकाणी शंका येऊ शकते की, जर त्याच्याकडून पापक्रिया होऊच शकत नाही तर असे का म्हटले की, तो पापाला प्राप्त होत नाही? याचे समाधान असे आहे की, एकंदर क्रियेच्या आरंभी अनिवार्य दोष (पाप) घडतात "**सर्वारम्भा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः**" (१८।४८) परंतु मुळात असत्च्या संगानेच (कामना, ममता आणि आसक्ती) पाप लागते. कर्मयोग्याचे ठिकाणी कामना, ममता आणि आसक्ती नसतेच अथवा त्याचा कामना, ममता आणि आसक्तीचा उद्देशच नसतो. म्हणून त्याचे कर्म करण्याचे अथवा न करण्याचे कोणतेच प्रयोजन राहत नाही. याच कारणामुळे त्याला कर्मात होणारे अनुषंगिक पाप लागत नाही आणि शास्त्रविहित कर्माच्या त्यागाचेही पाप लागत नाही.

दुसरी एक शंका ही होऊ शकते की, तीसऱ्या अध्यायामध्ये भगवंतांनी सिद्ध महापुरुषासही (आपल्यासाठी कोणतेहो कर्म शिल्लक नसतानाही) लोकसंग्रहासाठी कर्म करण्याविषयीची प्रेरणा केली आहे (३।२५-२६) स्वत:-साठीही भगवंतांनी म्हटले आहे की, त्रैलोक्यात काहीही कर्तव्य आणि प्राप्तव्य नसतानासुद्धा मी सावधानतेने कर्म करीत असतो. (३।२२-२४) म्हणून केवळ शरीरनिर्वाहासाठी कर्म करणाऱ्या कर्मयोग्याला लोकसंग्रहाच्या त्यागाचा दोष लागणार नाही का? याचे समाधान असे आहे की, कामना, ममता इत्यादी न राहिल्यामुळे त्याला कोणताही दोष लागत नाही. जरी सिद्धमहापुरुषाचे ठिकाणी आणि भगवंताचे ठिकाणी कामना, ममता इत्यादींचा सर्वथा अभाव असतो तरीपण ते जे लोगसंग्रहासाठी कर्म करतात, ही त्यांची दया, कृपाच आहे. वास्तविक ते लोकसंग्रह करोत अथवा न करोत त्यात ते स्वतंत्र आहेत. याची त्यांच्यावर कसल्याच प्रकारची जबाबदारी नाही, (३।१८) वास्तविक पाहिले तर हासुद्धा निवृत्तिपरायण साधकासाठी एक लोकसंग्रहच आहे. लोकसंग्रह केला जात नाही, तर होत असतो.

तीसरी एक शंका अशीही होऊ शकते की, तीसऱ्या अध्यायाच्या तेराव्या श्लोकात भगवंतांनी केवळ आपल्या शरीराचे पोषण करणाऱ्या मनुष्याला पापी म्हटले आहे आणि येथे म्हणत आहेत की, केवळ शरीरनिर्वाहासाठी कर्म करणारा पापाला प्राप्त होत नाही. दोन्हींचे सामंजस्य कसे होईल? याचे समाधान असे आहे की, जोपर्यंत भोगबुद्धी आहे आणि कर्म तसेच पदार्थ यामध्ये आसक्ती कायम आहे, तोपर्यंत कर्म करणे अथवा न करणे यामुळे पाप लागतच असते. म्हणूनच त्या ठिकाणी "**पचन्ति आत्मकारणात्**" पद आले आहे. परंतु

त्या कर्मयोग्याचे ठिकाणी भोगबुद्धी नसते आणि कर्म तसेच पदार्थ यांचे ठिकाणी आसक्तीही नसते. म्हणून संपूर्णपणे निर्लिप्त झाल्याने त्याला कर्म करणे अथवा न करण्याने किंचित्मात्रसुद्धा पाप लागत नाही.

**प्रश्न**—या श्लोकाला जर सांख्ययोग्यासाठी समजले तर काय आपत्ती आहे? कारण यात आलेली सर्व लक्षणे सांख्ययोग्यात दिसून येतात.

**उत्तर**—पहिली गोष्ट ही आहे की, येथे कर्मयोगाचा प्रसंग आहे, म्हणून हा श्लोक प्रधानरूपाने कर्मयोग्यासाठीच आहे. दुसरी गोष्ट सांख्ययोगी आपल्याला कर्ता मानतच नाही. त्याचे ठिकाणी "मी काहीही करत नाही" (५।८) असा स्पष्ट विवेक राहतो. मग त्याच्यासाठी "कर्म करत असून सुद्धा पापाला प्राप्त होत नाही" असे कसे म्हणता येईल?

कर्मयोगाच्या साधकामध्ये तसा स्पष्ट विवेक जागृत नसला तरीही त्याचा हा निश्चय असतो की, "माझे काहीही नाही, माझ्यासाठी काहीही नको आणि माझ्यासाठी काहीही करावयाचे नाही" या तीन गोष्टींचा दृढ निश्चय असल्यामुळे तो कर्म करत असूनसुद्धा त्याच्यापासून निर्लिप्त राहतो.

लोकांमध्ये बहुतांशी असा समज आहे की, कर्मयोगी गृहस्थाश्रमामध्ये असतो आणि ज्ञानयोगी (सांख्ययोगी) संन्यास आश्रमामध्ये असतो. परंतु वास्तविक अशी गोष्ट नाही. ज्याला शरीरापासून आपल्या वेगळ्या सत्तेचा स्पष्ट विवेक आहे तो ज्ञानयोगीच आहे मग तो गृहस्थाश्रमामध्ये असो अथवा संन्यास आश्रमामध्ये असो. ज्यात एवढा विवेक नाही, परंतु उपर्युक्त तीन गोष्टींचा पक्का निश्चय आहे तो कर्मयोगीच आहे मग तो गृहस्थाश्रमामध्ये असो अथवा संन्यास आश्रमामध्ये असो.

## यदृच्छालाभसन्तुष्टो द्वन्द्वातीतो विमत्सरः।
## समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबध्यते॥ २२॥

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **यदृच्छालाभ-सन्तुष्टः** | = | अपोआप जे काही मिळेल, त्यात संतुष्ट राहतो (आणि) | **द्वन्द्वातीतः** | = | द्वन्द्वरहित (तसेच) | **समः** | = | सम आहे, (तो) |
| | | | **सिद्धौ** | = | सिद्धी | **कृत्वा, अपि** | = | (कर्म) करूनही (त्याने) |
| | | | **च** | = | आणि | **निबध्यते** | = | बांधला जात |
| **विमत्सरः** | = | (जो) ईर्ष्या रहित, | **असिद्धौ** | = | असिद्धीत | **न** | = | नाही. |

***व्याख्या*— यदृच्छालाभसन्तुष्टः**—कर्मयोगी निष्काम-भावनेने संपूर्ण कर्तव्यकर्म सांगोपांग रीतीने करतो. फल प्राप्तीचा उद्देश न ठेवता कर्म करण्याने फलाच्या रूपात त्याला अनुकूलता अथवा प्रतिकूलता, लाभ अथवा हानी, मान अथवा अपमान, स्तुती अथवा निंदा इत्यादी जे काही प्राप्त होते त्यापासून त्याच्या अंत:करणात कोणताही असंतोष उत्पन्न होत नाही. जसे तो व्यापार करत असेल तर त्याला व्यापारात लाभ हो अथवा हानी हो त्याच्या अंत:करणावर त्याचा काहीही परिणाम होत नाही. तो प्रत्येक परिस्थितीमध्ये समानरूपाने संतुष्ट राहतो. कारण त्याच्या मनात फलाची इच्छा नसते. तात्पर्य व्यापारामध्ये त्याला लाभ हानीचे ज्ञान तर होते. तसेच तो त्यानुसार योग्य प्रयत्नही करतो. परंतु परिणामी तो सुखी अथवा दु:खी होत नाही. जर साधकाच्या अंत:करणावर अनुकूल प्रतिकूलतेचा थोडासा जरी परिणाम होत असेल तरीही त्याने घाबरून जाऊ नये. कारण साधकाच्या अंत:करणात तो प्रभाव स्थायी राहत नाही, लवकर नष्ट होत असतो.

उपर्युक्त पदात आलेला "लाभ" या शब्दाचा अर्थ प्राप्ती असा आहे. त्यानुसार केवळ "लाभ" अथवा अनुकूलता प्राप्त होणे तरच "लाभ" असे नाही तर लाभ-हानी, अनुकूलता-प्रतिकूलता, इत्यादी जे काही प्राप्त होईल ते सर्व "लाभ" च आहे.

**विमत्सरः**—कर्मयोगी संपूर्ण प्राणीमात्राशी आपली एकता मानतो—"**सर्वभूतात्मभूतात्मा**" (५।७) म्हणून त्याचा कोणत्याही प्राण्याशी किंचित्मात्रसुद्धा इर्ष्येचा भाव राहत नाही.

**विमत्सरः**—हे पद देण्याचा दुसरा भाव असा आहे की, आपल्यामध्ये कोणत्याही प्राण्याविषयी थोडासुद्धा ईर्ष्येचा भाव यावयास नको. या विषयात कर्मयोगी फार सावधान असतो. कारण कर्मयोग्याच्या संपूर्ण क्रिया प्राणीमात्राच्या हितासाठीच होतात. म्हणून जर त्याच्यात थोडासुद्धा ईर्ष्येचा भाव राहील तर त्याच्या संपूर्ण क्रिया दुसऱ्याच्या हितासाठी होऊ शकणार नाहीत.

ईर्ष्या दोष फार सूक्ष्म आहे. दोन दुकानदार आहेत आणि ते एकमेकाचे मित्र आहेत. त्यांच्यापैकी एकाचे

दुकान दुसऱ्यापेक्षा चांगले चालत असेल तर दुसऱ्यात थोडी ईर्ष्या उत्पन्न होईल की, त्याचे दुकान चांगले चालत आहे आणि माझे कमी चालत आहे. या प्रकारे ईर्ष्या ह्या दोषामुळे मित्रालाही मित्राची उन्नती सहन होत नाही. जेथे आपसात एकता आहे, प्रेम आहे, मित्रता आहे तेथे सुद्धा ईर्ष्या दोष येतो. मग जेथे वैर, भिन्नता इत्यादी असतील तर त्यांच्याबद्दल काय सांगावे ? म्हणून साधकाने या दोषापासून सुटका होण्यासाठी विशेष सावधान राहिले पाहिजे.

**द्वन्द्वातीतः**—कर्मयोगी लाभ-हानी, मान-अपमान, स्तुती-निंदा, अनुकूलता-प्रतिकूलता, सुख-दुःख इत्यादी द्वन्द्वांपासून अतीत असतो. म्हणून त्याच्या अंत:करणात त्या द्वन्द्वांपासून होणारे राग-द्वेष, हर्ष-शोक इत्यादी विकार उत्पन्न होत नाहीत.

द्वन्द्व अनेक प्रकारचे असतात. जसे भगवंताचे सगुण-साकार रूप चांगले आहे अथवा निर्गुण-निराकार रूप चांगले आहे, अद्वैत सिद्धांत योग्य आहे अथवा द्वैत सिद्धांत योग्य आहे, भगवंताचे ठिकाणी मन लागले अथवा नाही लागले, एकान्त मिळाला अथवा मिळाला नाही, शांती मिळाली अथवा नाही मिळाली, सिद्धी प्राप्त झाली अथवा नाही झाली इत्यादी. या सर्व द्वन्द्वाशी संबंध न ठेवण्यानेच साधक निर्द्वन्द्व होतो.जसे तराजू कोणीकडेही झुकला तर तो बरोबर आहे असे म्हणता येत नाही. तसेच साधकाचे अंत:करण कोणत्या-ही बाजूकडे झुकले तर ते द्वन्द्वातीत म्हटले जात नाही.

कर्मयोगी सर्व प्रकारच्या द्वन्द्वापासून अतीत असतो म्हणून तो सुखाने संसारबंधनातून मुक्त होतो (५।३)

**समः सिद्धावसिद्धौ च**—कोणत्याही कर्तव्यकर्माचे निर्विघ्नपणे पूर्ण होणे सिद्धी होय आणि कोणत्याही प्रकारचे विघ्न अथवा अडथळ्यामुळे त्याचे पूर्ण न होणे असिद्धी होय. कर्माचे फल मिळणे सिद्धी आहे आणि न मिळणे असिद्धी आहे. सिद्धी आणि असिद्धीत राग-द्वेष, हर्ष-शोक इत्यादी विकारांचे न होणेच सिद्धी-असिद्धीमध्ये सम राहणे आहे. दुसऱ्या अध्यायाच्या अठ्ठेचाळीसाव्या श्लोकात "**सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा**" पदामध्ये हाच भाव आला आहे.

आपले काहीही नाही, आपल्यासाठी काहीही नको आणि आपल्यासाठी काहीही करावयाचे नाही—ह्या तीन गोष्टी योग्य रीतीने अनुभवामध्ये आल्या तरच सिद्धी आणि असिद्धीमध्ये पूर्णत: समता येईल.

**कृत्वापि न निबध्यते**—याठिकाणी "**कृत्वा अपि**" पदाचे तात्पर्य कर्मयोगी कर्म करूनसुद्धा बांधला जात नाही मग कर्म न करता बंधनाचा प्रश्नच उद्भवत नाही. तो दोन्ही अवस्थेत निर्लिप्त राहतो.

जसे केवळ शरीराच्या निर्वाहासाठी कर्म करणारा कर्मयोगी कर्माने बांधला जात नाही तसेच शास्त्रविहित संपूर्ण कर्मांना करणारा कर्मयोगीसुद्धा कर्माने बांधला जात नाही.

वास्तविक पाहिले तर कर्मयोगात कर्म करणे, अधिक करणे, कमी करणे अथवा न करणे बंधन अथवा मुक्तीचे कारण नाही. यांच्याशी जी लिप्तता आहे तीच बंधनाला कारणीभूत आहे आणि जी निर्लिप्तता आहे तीच मुक्तीला कारण आहे. जसे नाटकामध्ये एक व्यक्ती लक्ष्मणाचे आणि दुसरा व्यक्ती मेघनादाचे पात्र करीत असेल आणि त्या दोन्हीही व्यक्ती आपापली भूमिका योग्य तऱ्हेने वठवून देखील त्या भूमिकेपासून अलिप्तच राहत असतात अर्थात् आपल्याला वास्तविक लक्ष्मण अथवा मेघनाद मानत नाहीत. तसेच कर्मयोगी आपल्या वर्ण आश्रम इत्यादीनुसार कर्तव्याचे पालन करून सुद्धा त्यापासून निर्लिप्त राहतो अर्थात् आपला त्या भूमिकेशी कोणताही संबंध मानीत नाही. त्याचा संबंध नित्य निरंतर राहणाऱ्या स्वरूपाशी राहतो, क्षणाक्षणाला परिवर्तनशील प्रकृतीशी नसतो. म्हणून त्याची स्थिती स्वाभाविक समतेतच राहते. समतेमध्ये स्थिती राहिल्याने तो कर्म करूनसुद्धा त्याने बांधला जात नाही.

जर विशेष विचार करून पाहिले तर समता स्वत: सिद्ध आहे. हा प्रत्येक मनुष्याचा अनुभव आहे की, अनुकूल परिस्थितीमध्ये आपण जसे राहतो, प्रतिकूल परिस्थिती आली असताही आपण तसेच राहतो. जर आपण तेच (एकच) नसतो तर दोन वेगवेगळ्या (अनुकूल आणि प्रतिकूल) परिस्थितींचे ज्ञान आपणाला कसे झाले असते? यावरुन सिद्ध झाले की, परिवर्तन परिस्थितीत होत असते आपल्या स्वरूपात नव्हे. म्हणून परिस्थिती बदलली असताही स्वरूपाने आपण समच (जसेच्या तसे) राहतो. चूक ही होते की, आपण परिस्थितीकडे तर लक्ष देतो पण स्वरूपाकडे पाहत नाही. आपल्या सम स्वरूपाकडे लक्ष देत नसल्यानेच आपण येणाऱ्या जाणाऱ्या परिस्थितीशी तादात्म्य करून सुखी-दु:खी होतो.

***संबंध**—तीसऱ्या अध्यायाच्या नवव्या श्लोकाच्या पूर्वार्धात भगवंतांनी "व्यतिरेक पद्धती" ने म्हटले होते की, यज्ञा-व्यतिरिक्त कर्म मनुष्याला बांधतात. आता तेवीसाव्या श्लोकाच्या उत्तरार्धात त्याच गोष्टीला "अन्वय रीती" ने सांगत आहेत.*

**गतसङ्गस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः।**
**यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते॥ २३॥**

**गतसङ्गस्य** = ज्याची आसक्ती संपूर्णपणे समाप्त झाली आहे, **मुक्तस्य** = जो मुक्त झाला आहे, **ज्ञानावस्थित-चेतसः** = ज्याची बुद्धी स्वरूपाच्या ज्ञानात स्थित झाली आहे (अशा केवळ) **यज्ञाय** = यज्ञासाठी **आचरतः** = कर्म करणाऱ्या मनुष्याची **समग्रम्** = संपूर्ण **कर्म** = कर्म **प्रविलीयते** = नष्ट होतात.

***व्याख्या***— (कर्मयोग्याची संपूर्ण कर्म विलीन होण्याचा विषय संपूर्ण गीतेमध्ये केवळ याच श्लोकात आला आहे. म्हणून हा कर्मयोगाचा मुख्य श्लोक आहे. त्याच प्रकारे चौथ्या अध्यायाचा छत्तीसावा श्लोक ज्ञानयोगाचा आणि अठराव्या अध्यायाचा सहासष्टावा श्लोक भक्तियोगाचा मुख्य श्लोक आहे)

**गतसङ्गस्य**—क्रियांचा, पदार्थांचा, घटनांचा, परिस्थितींचा, व्यक्तींचा जो संग आहे यांच्याशी जी अंत:करणाची आसक्ती आहे तीच वास्तविक बांधणारी अर्थात् जन्म-मरण देणारी आहे. (१३।२१) स्वार्थभावरहित होऊन केवळ लोकांच्या हितासाठी लोकसंग्रहार्थ कर्म करत राहिल्याने कर्मयोगी, क्रिया, पदार्थ इत्यादींशी असंग होतो अर्थात् त्याची आसक्ती संपूर्णपणे समाप्त होते.

वास्तविक मनुष्य स्वरूपाने असंगच आहे "**असङ्गो ह्ययं पुरुषः**" (बृहदारण्याक: ४।३।१५) परंतु असंग असूनही ह्या शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, पदार्थ, परिस्थिती, व्यक्ती इत्यादींशी संबंध मानून सुखाच्या इच्छेने त्यांच्याशी बद्ध होतो. माझ्या मनाप्रमाणे होवो अर्थात् मला जे हवे आहे तेच व्हावे आणि जे नको आहे ते होऊ नये असा भाव जो-पर्यंत राहतो तोपर्यंत हा संग वाढतच जातो. वास्तविक जे होणारे असते तेच होत असते. जे होणारे असते, त्याची इच्छा करा अथवा न करा ते होणारच आणि जे होणारे नाही, त्याची इच्छा करा अथवा न करा ते होणारच नाही. म्हणून आपली मनमानी केल्याने मनुष्य व्यर्थ (विनाकारण) फसतो आणि दु:खाला प्राप्त होतो.

कर्मयोगी संसारापासून मिळालेल्या शरीरादी वस्तूंना आपली आणि आपल्यासाठी न मानता त्यांना संसाराचीच मानून संसाराच्या सेवेमध्ये अर्पण करतो. यामुळे वस्तू आणि क्रियांचा प्रवाह संसाराकडे होतो आणि आपले असंग स्वरूप जसेच्या तसे राहते.

कर्मयोग्याचा "अहम्" ही सेवेमध्ये लागतो. तात्पर्य त्याच्या अंत:करणात "मी सेवक आहे" हा भाव सुद्धा राहत नाही. हा भाव तर मनुष्याला सेवकपणाच्या अभिमानाने बांधतो. सेवकपणाचा अभिमान तेव्हाच होतो जेव्हा सेवा सामुग्रीशी आसक्ती असते. सेवेची वस्तू त्याचीच होती, त्याला दिली तर सेवा कुठे झाली? आपण तर उऋण झालो. म्हणून सेवक होऊ नये केवळ सेवा रहावी. हा भाव असावा की, सेवेच्या मोबदल्यात धन, मान, प्रतिष्ठा, पद, अधिकार इत्यादी काहीही घ्यावयाचे नाही कारण त्यांच्यावर आपला अधिकारच नसतो. त्याचा स्वीकार करणे तर अनधिकार क्रिया आहे. लोकानी मला सेवक म्हणावे असा भावही असू नये आणि ते जर असे म्हणाले तर त्यात खूशी होऊ देऊ नये. अशा प्रकारे संसाराच्या वस्तूंना संसाराच्या सेवेमध्ये संपूर्णपणे लावल्याने अंत:करणात एक प्रकारची प्रसन्नता निर्माण होते. त्या प्रसन्नतेचाही भोग केला नाही तर स्वत:-सिद्ध असंगतेचा अनुभव होतो.

**मुक्तस्य**—जे आपल्या स्वरूपापासून संपूर्णपणे वेगळे आहे त्या क्रिया आणि पदार्थांशी आपला संबंध नसतानाही कामना, ममता आणि आसक्तीने त्यांच्याशी आपला संबंध मानल्याने मनुष्य बांधला जातो. अर्थात् पराधीन होतो. कर्मयोगाचे अनुष्ठान केल्याने जेव्हा मानलेला (अवास्तविक) संबंध समाप्त होतो तेव्हा कर्मयोगी संपूर्णपणे असंग होतो. असंग होताच तो संपूर्णपणे मुक्त होतो अर्थात् स्वाधीन होतो.

**ज्ञानावस्थितचेतसः**—ज्याच्या बुद्धीत स्वरूपाचे ज्ञान नित्य निरंतर जागृत असते तो "**ज्ञानावस्थितचेतसः**" आहे. स्वरूपाचे ज्ञान होताच त्याची स्वरूपात स्थिती होते जी वास्तविक पूर्वीपासूनच होती.

वास्तविक ज्ञान संसाराचेच होत असते. स्वरूपाचे ज्ञान होत नाही. कारण स्वरूप स्वत: ज्ञानस्वरूप आहे. क्रिया आणि पदार्थच संसार आहेत. क्रिया आणि पदार्थांचा विभाग वेगळा आहे. तसेच स्वरूपाचा विभाग वेगळा आहे. अर्थात् क्रिया, पदार्थांचा स्वरूपाशी किंचित्मात्रसुद्धा संबंध नाही. क्रिया आणि पदार्थ जड आहेत तर स्वरूप चेतन आहे. क्रिया आणि पदार्थ प्रकाश्य आहेत तर स्वरूप प्रकाशक आहे. अशा

प्रकारे क्रिया आणि पदार्थाच्या स्वरूपापासून असलेल्या भिन्नतेचे योग्य रीतीने ज्ञान झाल्यास क्रिया आणि पदार्थरूपी संसाराशी संबंध-विच्छेद होऊन स्वत: सिद्ध असंग स्वरूपामध्ये स्थितीचा अनुभव होतो.

**यज्ञायाचरत: कर्म समग्रं प्रविलीयते**—''कर्मामध्ये अकर्म'' पाहण्याचाच एक प्रकार ''यज्ञार्थ कर्म'' अर्थात् यज्ञासाठी कर्म करणे, हा आहे. नि:स्वार्थभावनेने केवळ दुसऱ्याच्या हितासाठीच कर्म करणे ''यज्ञ'' आहे. जो यज्ञासाठीच संपूर्ण कर्म करतो तो कर्म बंधनातून मुक्त होतो, आणि जो यज्ञासाठी कर्म करीत नाही अर्थात् आपल्यासाठी कर्म करतो, तो कर्मांने बांधला जातो. ''**यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धन:**'' (३।९)

प्रकृतीचे कार्य क्रिया आणि पदार्थ आहेत. या दोन्हीत क्रियेचाही आदि आणि अंत होत असतो तसेच पदार्थाचाही आदि आणि अंत होत असतो. क्रिया आरंभ होण्यापूर्वी नव्हती आणि समाप्त झाल्यानंतर राहणार नाही म्हणून ती मध्यंतरीही नाही असे सिद्ध झाले. त्याचप्रमाणे पदार्थ उत्पन्न होण्याच्या पूर्वीही नव्हता आणि नष्ट झाल्यानंतरही राहणार नाही म्हणून मध्यंतरीही नाही असे सिद्ध झाले. कारण असा सिद्धांत आहे की, जी वस्तू आदि आणि अंती नसते ती मध्यात (वर्तमान) ही नसते* परंतु चेतन स्वरूपाचा आदि आणि अंत नसतो. तो सदा अक्रियरूपाने जसाच्या तसा राहतो. ते चेतन तत्त्व क्रिया आणि पदार्थ दोन्हीचे प्रकाशक आहे. अशा प्रकारे क्रिया आणि पदार्थाशी किंचित्मात्र संबंध नसताना-सुद्धा जेव्हा तो यांच्याशी आपला संबंध मानतो तेव्हा तो बांधला जातो. या बंधनातून सुटण्याचा उपाय, फलेच्छेचा त्याग करून केवळ दुसऱ्यासाठीच कर्म करणे, हा आहे.

संसारामध्ये अनेक प्रकारच्या क्रिया होत असतात आणि अनेक प्रकारचे पदार्थ विद्यमान आहेत. परंतु मनुष्य ज्या क्रिया आणि पदार्थाशी, आसक्ती, ममता आणि कामनेने आपला संबंध मानतो, त्याच क्रिया आणि पदार्थाने तो बांधला जातो. जेव्हा मनुष्य कामना, ममता आणि आसक्तीचा त्याग करून केवळ दुसऱ्याच्या हितासाठीच संपूर्ण कर्म करतो आणि मिळालेल्या पदार्थांना दुसऱ्यांचेच मानून त्यांच्या सेवेमध्ये लावतो, तेव्हा कर्मयोग्याची संपूर्ण (क्रियमाण, संचित आणि प्रारब्ध) कर्म विलीन होतात अर्थात् त्याला कर्माशी आपल्या स्वत: सिद्ध असंगतेचा अनुभव होतो.

## विशेष गोष्ट

(१) कर्ता, करण आणि कर्म—या तिन्हींच्या एकत्रीकरणाने कर्माचा संचय होतो (१८।१८) जर कर्तेपणा राहिला नाही तर कर्मांचा संग्रह होत नाही. कारण करण आणि कर्म दोन्ही कर्त्याचे अधीन आहेत. म्हणून कर्म संचयाचे मुख्य कारण कर्तेपणाच आहे.

विचारपूर्वक पाहिले असता काही ना काही मिळविण्याच्या इच्छेनेच करण्याची इच्छा उत्पन्न होते ज्यामुळे कर्तेपणा निर्माण होतो. कर्तेपणाने बंधन होते. जेव्हा मनुष्य मिळविण्याच्या इच्छेने आपल्यासाठी कर्म करतो तेव्हा त्याचा कर्तेपणा दृढ होतो. जेव्हा कर्मयोगी मिळविण्याच्या इच्छेचा त्याग करून केवळ यज्ञासाठी अर्थात् दुसऱ्याच्या हितासाठी कर्म करतो तेव्हा त्याचा कर्तेपणा दुसऱ्यासाठी होतो, यामुळे त्याला आपल्या असंगतेचा अनुभव होतो. म्हणून त्याच्याकडून होणाऱ्या कर्माचा संचय होत नाही. कारण जेव्हा आधारच (कर्तेपणा) राहिला नाही तर कर्म कशावर टिकतील?

कर्मयोगात ''ममते'' (माझेपणा) चा त्याग आणि ज्ञानयोगात ''अहंता'' (मीपणा) चा त्याग मुख्य आहे. ममतेचा त्याग झाल्याने अहंतेचा आणि अहंतेचा त्याग झाल्याने ममतेचा त्याग आपोआप होतो. म्हणून कर्मयोगात प्रथम ''ममता'' समाप्त होते, मग ''अहंता'' आपोआप नाहीशी होते† आणि ज्ञानयोगात प्रथम ''अहंता'' समाप्त होते, नंतर ममता आपोआप नष्ट होते. अहंता आणि ''ममता'' समाप्त झाल्यावर कर्तेपणा आणि भोक्तेपणा समाप्त होतो.

कर्मयोगी आपल्यासाठी कोणतेही कर्म करीतच नाही आणि कशाची इच्छाही ठेवीत नाही. म्हणून तो कर्माच्या फलाचा भोक्ता होत नाही. जसे एखाद्या व्यक्तीला येथे काही शिक्षा भोगावयाच्या आहेत परंतु तो जर मेला तर त्याच्या सर्व शिक्षा समाप्त होतात. कारण जर भोगणारी व्यक्तीच राहिली नाही तर शिक्षा कोण भोगणार? तसेच जर कर्मयोग्याचे भोक्तेपण समाप्त झाले तर त्याची सर्व कर्म समाप्त होतात. कारण जर भोक्ताच राहिला नाही तर कर्माचे फल कोण भोगील?

(२) याच अध्यायाच्या नवव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, माझे जन्म आणि कर्म दिव्य आहेत—अशा

* अदावन्ते च यन्नास्ति वर्तमानेऽपि तत्तथा। (माण्डूक्य कारिका ४। ३१)

† अहंतेबरोबर ममता देखील राहते. जसे माझा अहंकार. म्हणून कर्मयोगात ममतेचा सर्वथा त्याग झाल्यावर अहंतेबरोबर ममता देखील राहत नाही. मग अहंता (नाममात्र) केवळ संसाराच्या सेवेसाठी राहते.

प्रकारे जो मनुष्य तत्त्वाने जाणून घेतो तो मला प्राप्त होतो. जन्म तर केवळ भगवंताचेच दिव्य होतात परंतु कर्म सर्व मनुष्याची (जर तो करू इच्छिल तर) दिव्य होऊ शकतात. म्हणून याच अध्यायाच्या चौदाव्या श्लोकात भगवान् आपल्या कर्माच्या दिव्यतेचे कारण सांगतात की, कर्मांच्या फलात माझी स्पृहा नाही म्हणून मला कर्म लिप्त करत नाहीत. अर्थात् माझी कर्म अकर्म होतात. अशाप्रकारे कर्माचे तत्त्व जाणून जो कर्म करतो त्याचीसुद्धा कर्म अकर्म होतात. मग पंधराव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले की, मुमुक्षूंनीही याच प्रकारे जाणून कर्म केली आहेत. यानंतर सोळाव्या श्लोकात भगवान् कर्माचे तत्त्व सांगण्याची प्रतिज्ञा करतात आणि सतराव्या श्लोकात म्हणतात की, कर्म, अकर्म आणि विकर्म तिन्हीचे तत्त्व जाणून घेतले पाहिजे. पुढे अठराव्या श्लोकात भगवंतांनी मुख्यरूपाने कर्माचे तत्त्व (अकर्म अथवा निर्लिप्तता) सांगितले.

कामनेने "कर्म" होतात. कामना वाढल्यास "विकर्म" होतात आणि कामनेचा अत्यंत अभाव झाल्यास "अकर्म" होतात. मूळात या (सोळव्यापासून बत्तीसाव्या श्लोकापर्यंत) प्रकरणाचे तात्पर्य "अकर्मा" चे वर्णन करणेच आहे. म्हणूनच भगवंतांनी कर्म आणि विकर्म दोन्हीचे मूळ कारण "कामने" च्या त्यागाचे, तसेच "अकर्माचे " वर्णन एकोणीसाव्या पासून ते तेवीसाव्या श्लोकापर्यंत प्रत्येक श्लोकात केले आहे* आणि शेवटीं बत्तीसाव्या श्लोकात या प्रकरणाचा उपसंहार केला आहे.

***संबंध***—*पूर्व श्लोकात भगवंतांनी सांगितले की, यज्ञासाठी कर्म केल्याने संपूर्ण कर्म विलीन होतात. साधकांच्या रुची, विश्वास आणि योग्यतेच्या भिन्नतेमुळे साधनसुद्धा भिन्न भिन्न प्रकारचे होतात. म्हणून आता पुढील सात श्लोकांत (चोवीसाव्या-पासून तीसाव्या श्लोकापर्यंत) भगवान् भिन्न भिन्न प्रकारच्या साधनांचे "यज्ञ" रूपाने वर्णन करीत आहेत.*

**ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम्।**
**ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना॥ २४॥**

ज्या यज्ञात—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अर्पणम्** | = अर्पण अर्थात् ज्याच्याने अर्पण केले जाते, ते स्रुक्, स्रुवा इत्यादी पात्र (ही) | **ब्रह्म** | = ब्रह्म आहे (आणि) | | ज्या मनुष्याची ब्रह्मातच कर्म-समाधी झाली आहे, |
| **ब्रह्म** | = ब्रह्म आहे, | **ब्रह्मणा** | = ब्रह्मरूप कर्ताद्वारा | **तेन** | = त्याच्याद्वारा |
| **हविः** | = हव्य पदार्थ (तिळ, यव, तूप इत्यादीही) | **ब्रह्माग्नौ** | = ब्रह्मरूप अग्नीत | **गन्तव्यम्** | = प्राप्त करण्यायोग्य (फलही) |
| | | **हुतम्** | = आहुती देणेरूपी क्रिया (ही ब्रह्म आहे), | **ब्रह्म, एव** | = ब्रह्मच आहे. |
| | | **ब्रह्मकर्मसमाधिना** | = (असा यज्ञ करणाऱ्या) | | |

***व्याख्या***— [यज्ञात आहुती मुख्य असते. ती आहुती तेव्हाच पूर्ण होते जेव्हा ती अग्निमय होईल अर्थात् हव्य पदार्थाची अग्नीपासून वेगळी सत्ताच राहणार नाही. त्याच प्रमाणे जेवढी साधने आहेत ती सर्व साध्यरूप होऊन जातात तेव्हाच "यज्ञ" होतो.

जेवढे म्हणून यज्ञ आहेत त्यात परमात्मतत्त्वाचा अनुभव करणे ही भावना नाही तर वास्तविकता आहे. भावना तर पदार्थांची असते.

या चोवीसाव्या श्लोकापासून तीसाव्या श्लोकापर्यंत ज्या यज्ञांचे वर्णन केले गेले आहे. ते सर्व कर्मयोगाच्या अंतर्गत आहेत. कारण भगवंतांनी या प्रकरणाच्या उपक्रमातसुद्धा "**तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्**" (४। १६) असे म्हटले आहे आणि उपसंहारातही "**कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे**" (४। ३२) असे म्हटले आहे. तसेच मध्यातही म्हटले आहे—"**यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते**" (४। २३) मुख्य गोष्ट ही आहे की, यज्ञकर्त्याचे सर्व कर्म "अकर्म" व्हावेत. यज्ञ केवळ यज्ञपरंपरेच्या रक्षणासाठी केले गेले तर सर्वची सर्व कर्म अकर्म होतात. म्हणून या सर्व यज्ञात "कर्मात अकर्मा" चेच वर्णन आहे.]

**ब्रह्मार्पणं ब्रह्म हविः**—ज्या पात्राने अग्नीमध्ये आहुती

* उदाहरणार्थ—कामनेच्या त्यागाविषयी गोष्ट या पदामध्ये आली आहे "कामसङ्कल्पवर्जिताः" (४। १९), "त्यक्त्वा कर्मफलासङ्गम्" (४। २०) "निराशीः" (४। २१) "यदृच्छालाभसन्तुष्टः" (४। २२) आणि "गतसङ्गस्य" (४। २३)
अकर्माची गोष्ट या पदामध्ये आली आहे "ज्ञानाग्निदग्धकर्माणम्" (४।१९), "नैव किञ्चित्करोति सः" (४।२०), "कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्" (४। २१), "कृत्वापि न निबध्यते" (४। २२) आणि "कर्म समग्रं प्रविलीयते" (४। २३)

दिली जाते त्या स्रुक, स्रुवा इत्यादींना याठिकाणी "**अर्पणम्**" पदाने म्हटले आहे. "**अर्प्यते अनेन इति अर्पणम्**" या अर्पणाला ब्रह्मच समजावे.

तीळ, जव, तूप इत्यादी ज्या पदार्थांचे हवन केले जाते त्या हव्य पदार्थांनाही ब्रह्मच मानावे.

**ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम्**—आहुती देणारासुद्धा ब्रह्मच आहे (१३।२) ज्यात आहुती दिली जात आहे तो अग्नीही ब्रह्मच आहे आणि आहुती देण्याची क्रियाही ब्रह्मच आहे असे मानावे.

**ब्रह्मकर्मसमाधिना**—जसे हवन करणारा पुरुष स्रुवा, हवि, अग्नी इत्यादी सर्वांना ब्रह्माचेच स्वरूप मानतो तसेच जो प्रत्येक कर्मात कर्ता, करण, कर्म आणि पदार्थ सर्वांना ब्रह्मरूपच अनुभव करतो त्या पुरुषाची ब्रह्मामध्येच कर्मसमाधी होते अर्थात् त्याची संपूर्ण कर्मामध्ये ब्रह्मबुद्धी होते. त्याच्यासाठी सर्व कर्म ब्रह्मरूपच होतात. ब्रह्माशिवाय कर्माचे आपले कोणते वेगळे स्वरूप राहतच नाही.

**ब्रह्मैव तेन गन्तव्यम्**—ब्रह्मातच कर्मसमाधी झाल्याने, ज्याचे संपूर्ण कर्म ब्रह्मरूपच झाले आहेत त्याला फलरूपाने नि:संदेह ब्रह्माचीच प्राप्ती होते. कारण त्याच्या दृष्टीत ब्रह्माशिवाय आणखी कोणाची स्वतंत्र सत्ता राहतच नाही.

या (चोवीसाव्या) श्लोकाला जाणकार लोक भोजनाचे वेळी म्हणतात, ज्यामुळे भोजनरूपी कर्मसुद्धा यज्ञ होऊन जावे. भोजनरूपी कर्मात ब्रह्मबुद्धी या प्रकारे केली जाते—

(१) ज्याने अर्पण केले जाते तो हातही ब्रह्मरूप आहे "**सर्वतः पाणिपादं तत्**" (१३।१३)

(२) भोजनाचे पदार्थसुद्धा ब्रह्मरूप आहेत "**अहमेवाज्यम्**" (९।१६)

(३) भोजन करणाराही ब्रह्मरूपच आहे "**ममैवांशो जीवलोके**" (१५।७)

(४) जठराग्नीही ब्रह्मरूप आहे "**अहम् वैश्वानरः**" (१५।१४)

(५) भोजन करणेरूपी क्रिया अर्थात् जठराग्नीमध्ये आहुती देणेरूपी क्रियाही ब्रह्म आहे "**अहं हुतम्**" (९।१६)

(६) अशा प्रकारे भोजन करणाऱ्या मनुष्याला प्राप्त होण्यायोग्य फलही ब्रह्मच आहे—"**यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम्**" (४।३१)

**मार्मिक गोष्ट**

प्रकृतीचे कार्य संसार त्याचे स्वरूप क्रिया आणि पदार्थ आहे. वास्तविक दृष्टीने पाहिले तर प्रकृती अथवा संसार क्रियारूपच आहे* कारण पदार्थ एक क्षणभरसुद्धा स्थिर राहत नाही. त्यामध्ये निरंतर परिवर्तन होत राहते. म्हणून वास्तविक पदार्थ परिवर्तनरूपी क्रियेचा पुंजका आहे. केवळ आसक्तीमुळेच पदार्थाची मुख्यता दिसते. संपूर्ण क्रिया अभावात जात आहेत म्हणून संसार अभावरूपच आहे. भावरूप केवळ एक अक्रिय तत्त्व ब्रह्मच आहे, ज्याच्या सत्तेने अभावरूपी संसारसुद्धा सत्तावान् प्रतीत होत आहे. संसाराच्या अभावरूपतेला याप्रमाणे समजू शकतो—

संसाराच्या तीन अवस्था दिसतात—उत्पत्ती, स्थिती आणि प्रलय. जसे वस्तू उत्पन्न होते, मग राहते आणि शेवटी नष्ट होते. अथवा मनुष्य जन्म घेतो मग राहतो आणि शेवटी मरतो. यापुढे जाऊन विचार केला तर केवळ उत्पत्ती आणि प्रलय याचाच क्रम आहे, स्थिती वस्तुतः नाहीच. जसे जर एखाद्या मनुष्याचे पूर्ण आयुष्य पन्नास वर्षाचे असेल तर वीस वर्ष झाल्यावर त्याचें आयुष्य तीस वर्षच राहते. यापुढे जाऊन विचार केला तर केवळ प्रलयच प्रलय (नाशच नाश) आहे. उत्पत्ती नाहीच. जसे आयुष्याची जितकी वर्ष झाली तितकी वर्ष मनुष्य मेलाच. अशा प्रकारे मनुष्य प्रतिक्षण मरतच आहे. त्याचे जीवन क्षणाक्षणाला मृत्यूकडेच जात आहे. सर्व दृश्य क्षणाक्षणाला अदृश्यात जात आहे. प्रलय अभावाचेच नाव आहे. म्हणून अभावच शिल्लक राहिला. अभावाची सत्ता भावरूप ब्रह्मावरच टिकून राहिलेली आहे. म्हणून भावरूपाने एक ब्रह्मच शिल्लक राहिले—"**सर्वं खल्विदं ब्रह्म**" (छांदोग्य॰ ३।१४।१) "**वासुदेवः सर्वम्**" (७।१९)

**दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते।**
**ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति॥ २५॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अपरे** | = अन्य | **पर्युपासते** | = अनुष्ठान करतात (आणि) | **यज्ञेन एव** | = (विचाररूपी) यज्ञाद्वाराच |
| **योगिनः** | = योगीलोक | **अपरे** | = दुसरे (योगीलोक) | **यज्ञम्** | = (जीवात्मारूपी) यज्ञाचे |
| **दैवम्** | = दैव (भगवदर्पणरूपी) | **ब्रह्माग्नौ** | = ब्रह्मरूपी अग्नीत | **उपजुह्वति** | = हवन करतात |
| **यज्ञम्, एव** | = यज्ञाचेच | | | | |

* प्रकर्षेण करणं (भावे ल्युट्) इति प्रकृतिः। सम्यग्रीत्या सरतीति संसारः।

*व्याख्या*— **दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते**— पूर्व श्लोकात भगवंतांनी सर्वत्र ब्रह्मदर्शनरूपी यज्ञ करणाऱ्या साधकाचे वर्णन केले. याठिकाणी भगवान् "**अपरे**" पदाने त्यापेक्षा वेगळ्या प्रकारचे यज्ञ करणाऱ्या साधकांचे वर्णन करीत आहेत.

याठिकाणी "**योगिनः**" पद यज्ञार्थ कर्म करणाऱ्या निष्काम साधकासाठी आलेले आहे.

संपूर्ण क्रिया तसेच पदार्थांना आपले आणि आपल्यासाठी न मानता त्यांना केवळ भगवंताचे आणि भगवंतासाठीच मानणे हा "दैवयज्ञ" अर्थात् भगवदर्पणरूपी यज्ञ आहे. भगवान् देवांचेही देव आहेत. म्हणून सर्व काही त्यांना अर्पण करण्यालाच याठिकाणी "दैवयज्ञ" म्हटले गेले आहे.

कोणत्याही क्रिया आणि पदार्थामध्ये किंचित्मात्रही आसक्ती, ममता आणि कामना न ठेवता त्यांना संपूर्णपणे भगवंताचे मानणे हेच दैवयज्ञाचे योग्य रीतीने अनुष्ठान करणे आहे.

**ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति**—या श्लोकाच्या पूर्वार्धात् सांगितल्या गेलेल्या दैवयज्ञाहून भिन्न दुसऱ्या यज्ञाचे वर्णन करण्यासाठी याठिकाणी "**अपरे**" पद आले आहे.

चेतनाचे जडाशी तादात्म्य झाल्यामुळेच त्याला जीवात्मा म्हणतात. विवेक विचाराने जडाशी सर्वथा विमुख होऊन परमात्म्यात लीन होण्याला याठिकाणी यज्ञ म्हटले गेले आहे. लीन होण्याचे तात्पर्य, परमात्मतत्त्वापासून भिन्न आपली स्वतंत्र सत्ता किंचित्मात्रही न मानणे, हे आहे.

**परिशिष्ट भाव—'ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति'** चा असा अर्थही घेऊ शकतो—दुसरे योगीलोक संसाररूप ब्रह्माच्या सेवेसाठी, केवळ लोक संग्रहरूपी यज्ञासाठी कर्तव्य कर्मरूप यज्ञ करतात अर्थात् यज्ञार्थ कर्म करतात. (गीता—तीसऱ्या अध्यायाचा नववा आणि चौथ्या अध्यायाचा तेवीसावा श्लोक)

## श्रोत्रादीनीन्द्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति।
## शब्दादीन्विषयानन्य इन्द्रियाग्निषु जुह्वति॥ २६॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अन्ये** | = अन्य (योगीलोक) | | अग्नीत | **विषयान्** | = विषयांचे |
| **श्रोत्रादीनि** | = श्रोत्रादी | **जुह्वति** | = हवन करीत असतात. आणि | **इन्द्रियाग्निषु** | = इंद्रियरूपी अग्नीमध्ये |
| **इन्द्रियाणि** | = समस्त इंद्रियांचे | **अन्ये** | = दुसरे (योगीलोक) | **जुह्वति** | = हवन करीत असतात. |
| **संगमाग्निषु** | = संयमरूपी | **शब्दादीन्** | = शब्दादी | | |

*व्याख्या*— **श्रोत्रादीनीन्द्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति**— या ठिकाणी संयमरूपी अग्नीत इंद्रियांची आहुती देण्याला यज्ञ म्हटले गेले आहे. तात्पर्य एकांतवासात असताना श्रोत्र, त्वचा, नेत्र, रसना आणि घ्राण ही पाचही इंद्रिये आपापल्या विषया- (क्रमाने शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध) मध्ये मुळीच प्रवृत्त होऊ नयेत. इंद्रिये संयमरूपीच होऊन जावीत.

पूर्ण संयम तेव्हाच समजावा की, जेव्हा इंद्रिये मन, बुद्धी तसेच अहम्—या सर्वांमधून राग-आसक्तीचा संपूर्णपणे अभाव होईल (२। ५८-५९, ६८)

**शब्दादीन्विषयानन्य इन्द्रियाग्निषु जुह्वति**—शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध—हे पाच विषय आहेत. विषयांचे इंद्रियेरूपी अग्नीमध्ये हवन केल्याने तो यज्ञ होतो. तात्पर्य व्यवहारात विषयाशी इंद्रियांचा संयोग होत असतानासुद्धा इंद्रियांत कोणताही विकार उत्पन्न होऊ नये. (२। ६४-६५). इंद्रिये राग-द्वेषरहित होऊन जावीत. इंद्रियांमध्ये विषयांचे ठिकाणी राग-द्वेष उत्पन्न करण्याची शक्ती राहूच नये.

या श्लोकात म्हटले गेलेल्या दोन्ही प्रकारच्या यज्ञात राग (आसक्ती) चा सर्वथा अभाव झाला तरच सिद्धी (परमात्मप्राप्ती) होते. राग (आसक्ती) ला नष्ट करण्यासाठीच दोन प्रकारच्या प्रक्रियेचे यज्ञरूपाने वर्णन केले गेले आहे.

पहिल्या प्रक्रियेत साधक एकांतवासात इंद्रियांचा संयम करतो. विवेक-विचार, जप-ध्यान इत्यादीने इंद्रियांचा संयम होऊ लागतो. पूर्ण संयम झाल्यावर जेव्हा आसक्तीचा अभाव होतो तेव्हा एकांतवास आणि व्यवहार दोन्हीत त्याची समान स्थिती राहते.

दुसऱ्या प्रक्रियेमध्ये साधक व्यवहारामध्ये राग-द्वेष रहित झालेल्या इंद्रियांनी व्यवहार करीत असताना मन, बुद्धी आणि अहम् यामधूनसुद्धा राग-द्वेषाचा अभाव करून टाकतो. आसक्तीचा अभाव झाल्याने व्यवहार आणि एकांतवास दोन्हीमध्ये त्याची स्थिती समान राहते.

## सर्वाणीन्द्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे।
## आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते॥ २७॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अपरे** | = अन्य (योगीलोक) | | क्रियांना | **आत्मसंयम-** | = आत्म-संयमयोग |
| | | **च** | = आणि | **योगाग्नौ** | (समाधियोग) |
| **सर्वाणि** | = संपूर्ण | **प्राणकर्माणि** | = प्राणांच्या क्रियांना | | रूपी अग्नीत |
| **इन्द्रियकर्माणि** | = इंद्रियांच्या | **ज्ञानदीपिने** | = ज्ञानाने प्रकाशित | **जुह्वति** | = हवन करीत असतात. |

*व्याख्या*— **सर्वाणीन्द्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे**—या श्लोकात समाधीला यज्ञाचे रूप दिले गेले आहे. काही योगीलोक दहाही इंद्रियांच्या क्रियांना समाधीमध्ये हवन करत असतात. तात्पर्य समाधी अवस्थेत मन-बुद्धी-सहित संपूर्ण इंद्रियांच्या (ज्ञानेंद्रिय आणि कर्मेंद्रिय) च्या क्रिया थांबतात. इंद्रिये संपूर्णपणे निश्चल आणि शांत होतात.

समाधिरूपी यज्ञामध्ये प्राणांच्या क्रियांचेही हवन होते अर्थात् समाधिकाळात प्राणांची क्रियासुद्धा थांबते. समाधीमध्ये प्राणांची गती रोखण्याचे दोन प्रकार आहेत.

एक तर हठयोगी समाधी असते ज्यात प्राणांना रोखण्यासाठी कुम्भक केले जाते. कुम्भकाचा अभ्यास वाढत-वाढत प्राणाची गती थांबते. ही प्राणाची गती काही तासापासून ते कित्येक दिवसासाठी थांबू शकते. या प्राणायामाने आयुष्य वाढते. जसे पाऊस पडला म्हणजे पाणी वाहू लागते तर पाण्याबरोबर वाळूही वाहत येते. या वाळूमध्ये बेडूक दबून जातो. पाऊस संपला म्हणजे जेव्हा वाळू कोरडी होते तेव्हा बेडूक त्या वाळूमध्येच गुपचुप सुकल्यासारखा पडून राहतो. त्याचे प्राण थांबतात. पुन: जेव्हा पाऊस पडतो तेव्हा पावसाचे पाणी त्या बेडकावर पडल्याने बेडकात पुन: प्राणांचा संचार होतो आणि तो डराव डराव म्हणून ओरडू लागतो.

दुसऱ्या प्रकारात मनाला एकाग्र केले जाते. मन संपूर्णपणे एकाग्र झाल्यावर प्राणांची गती आपोआप थांबते.

**ज्ञानदीपिते**—समाधी आणि निद्रा—दोन्हीत कारण-शरीराशी संबंध असतो. म्हणून बाहेरुन दोघांची अवस्था सारखीच दिसते. याठिकाणी ''**ज्ञानदीपिते**'' पदाने समाधी आणि निद्रा यामध्ये परस्पर भिन्नता सिद्ध केली गेली आहे. तात्पर्य बाहेरुन समान दिसत असले तरीही समाधिकाळात ''एक सच्चिदानन्द परमात्माच सर्वत्र परिपूर्ण आहे'' असे ज्ञान प्रकाशित (जागृत) राहते आणि निद्राकाळात वृत्ती अविद्येत लीन होतात. समाधिकाळामध्ये प्राणांची गती थांबते आणि निद्राकाळात प्राणांची गती चालू असते. म्हणून निद्रा आल्याने समाधी लागत नाही.

**आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति**—चित्तवृत्तिनिरोधरूपी अर्थात् समाधिरूपी यज्ञ करणारे योगीलोक इंद्रिये आणि प्राणांच्या क्रियांचे समाधियोगरूपी अग्नीमध्ये हवन करत असतात अर्थात् मन-बुद्धीसहित संपूर्ण इंद्रिये आणि प्राणांच्या क्रियांना रोखून समाधीमध्ये स्थित होतात. समाधिकाळात संपूर्ण इंद्रिये आणि प्राण आपली चंचलता सोडून देतात. एक सच्चिदानन्दघन परमात्म्याचे ज्ञानच जागृत राहते.

## द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे।
## स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः॥ २८॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अपरे** | = दुसरे (कित्येक) | **तपोयज्ञाः** | = (आणि कित्येक) | **योगयज्ञाः** | = योगयज्ञ |
| **संशितव्रताः** | = तीक्ष्ण व्रत करणारे | | तपोयज्ञ करणारे | | करणारे आहेत. |
| **यतयः** | = प्रयत्नशील साधक | | आहेत | **च** | = तसेच (कित्येक) |
| **द्रव्ययज्ञाः** | = द्रव्यमय यज्ञ | **तथा** | = आणि (दुसरे | **स्वाध्यायज्ञानयज्ञाः** | = स्वाध्यायरूपी ज्ञानयज्ञ |
| | करणारे आहेत | | कित्येक) | | करणारे आहेत. |

*व्याख्या*— **यतयः संशितव्रताः**—अहिंसा, सत्य, अस्तेय (चोरी न करणे), ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह (भोग बुद्धीने संग्रह न करणे) हे पाच ''यम'' आहेत* ज्यांना ''महाव्रत'' नावाने म्हटले गेले आहे. शास्त्रामध्ये या महाव्रतांची फारच प्रशंसा, माहात्म्य वर्णन केले आहे. या व्रतांचा सार हा आहे की, मनुष्य संसारापासून विमुख व्हावा. या व्रतांचे पालन करणाऱ्या साधकासाठी येथे ''**संशितव्रताः**'' पद आले आहे. याशिवाय या श्लोकात आलेल्या चार यज्ञामध्ये जे जे पालनीय व्रत अर्थात् नियम आहेत त्यावर दृढ राहून त्याचे पालन करणारे सर्वच ''**संशितव्रताः**'' आहेत. आपापल्या यज्ञाच्या अनुष्ठानात प्रयत्नशील असल्यामुळे त्यांना ''**यतयः**'' म्हटले गेले आहे.

* अहिंसासत्यास्तेयब्रह्मचर्यापरिग्रहा यमाः (योगदर्शन २।३०)

"**संशितव्रताः**" पदाबरोबर (**द्रव्ययज्ञाः, तपोयज्ञाः, योगयज्ञाः** आणि **ज्ञानयज्ञाः** प्रमाणे) "**यज्ञाः**" पद दिले गेले नसल्यामुळे यांना वेगळे यज्ञ मानले गेले नाही.

**द्रव्ययज्ञाः**—सर्व संसाराच्या हिताच्या उद्देशाने विहीर, तलाव, मंदिर, धर्मशाळा इत्यादी बांधणे, अभावग्रस्त लोकांना अन्न, जल, वस्त्र, औषध, ग्रंथ इत्यादी देणे, दान करणे इत्यादी सर्व "द्रव्ययज्ञ" आहेत. द्रव्या (तिन्ही शरीरासहित संपूर्ण पदार्थ) ला आपले आणि आपल्यासाठी न मानता नि:स्वार्थभावाने त्यांचेच मानून त्यांच्या सेवेमध्ये लावल्याने द्रव्ययज्ञ सिद्ध होतो.

शरीरादी जेवढ्या वस्तू आपल्याजवळ आहेत त्यानेच यज्ञ होऊ शकतो; अधिकाची आवश्यकता नाही. मनुष्य बालकाकडून तेवढीच आशा ठेवतो जेवढे तो करू शकतो. तर मग सर्वज्ञ भगवान् तसेच संसार आपल्याकडून आपल्या क्षमतेपेक्षा अधिकाची आशा कशी करतील?

**तपोयज्ञाः**—आपल्या कर्तव्या (स्वधर्म) च्या पालनात ज्या ज्या प्रतिकूलता, अडचणी येतील त्यांना प्रसन्नतापूर्वक सहन करणे "तपोयज्ञ" आहे. लोकहितार्थ एकादशी इत्यादी व्रत करणे, मौन धारण करणे इत्यादी ही "तपोयज्ञ" अर्थात् तपश्चर्यारूपी यज्ञ आहेत. परंतु प्रतिकूलाती प्रतिकूल परिस्थिती, वस्तू, व्यक्ती, घटना प्राप्त झाली तरीही साधकाने प्रसन्नतापूर्वक आपल्या कर्तव्याचे पालन करत रहावे. आपल्या कर्तव्यापासून थोडेही विचलित होऊ नये. ही फार मोठी तपश्चर्या आहे, जी शीघ्र सिद्धी देणारी असते.

गावातील घाण, काडी, कचरा गावाबाहेर एका ठिकाणी जमा केल्यास तो वाईट दिसतो. परंतु तीच घाण, काडी, कचरा जर शेतामध्ये टाकला तर शेतीसाठी त्याचे उत्तम खत होते. त्याचप्रमाणे प्रतिकूलता वाईट वाटते आणि तिला आपण काडी-कचऱ्याप्रमाणे फेकून देतो अर्थात् त्याला महत्त्व देत नाही. परंतु तीच प्रतिकूलता आपले कर्तव्य पालन करण्यासाठी उत्तम सामुग्री असते. म्हणून प्रतिकूलाती-प्रतिकूल परिस्थितीला सहर्ष सहन करणे यासारखे दूसरे कोणते तप नाही. भोगामध्ये आसक्ती राहिल्याने अनुकूलता चांगली आणि प्रतिकूलता वाईट वाटते. याच कारणाने प्रतिकूलतेचे महत्त्व लक्षात येत नाही.

**योगयज्ञास्तथापरे**—याठिकाणी योग अंत: करणाच्या समतेला म्हटले आहे. समतेचा अर्थ असा आहे—कार्याची पूर्ती आणि अपूर्तीत, फलाच्या प्राप्तीत आणि अप्राप्तीत, अनुकूल आणि प्रतिकूल परिस्थितीत, निंदा आणि स्तुतीत, आदर आणि अनादर ह्यात सम राहणे अर्थात् अंत: करणात चलबिचल, राग-द्वेष, हर्ष-शोक, सुख-दु:ख ह्यांचे न होणे. याप्रमाणे सम राहणेच "योगयज्ञ" आहे.

**स्वाध्यायज्ञानयज्ञाः**—केवळ लोकहितासाठी गीता, रामायण, भागवत इत्यादींचे तसेच वेद उपनिषद् इत्यादीचे यथाधिकार मनन-विचारपूर्वक पठन-पाठन करणे, आपल्या चित्तवृत्तीचे तसेच जीवनाचे अध्ययन करणे इत्यादी सर्व स्वाध्यायरूपी "ज्ञानयज्ञ" आहे.

गीतेच्या शेवटी भगवंतांनी म्हटले आहे की, जो या गीताशास्त्राचे अध्ययन करील त्याच्याकडून मी ज्ञानयज्ञाने पूजित होईन—असे माझे मत आहे. (१८।७०) तात्पर्य गीतेचा स्वाध्याय "ज्ञानयज्ञ" आहे. गीतेच्या भावात खोलवर जाऊन विचार करणे, गीतेच्या भावांना समजून घेण्याचा प्रयत्न करणे इत्यादी सर्व स्वाध्यायरूपी ज्ञानयज्ञ आहे.

**अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथापरे।**
**प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः॥२९॥**
**अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति।**
**सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः॥३०॥**

**अपरे** = दुसरे (कित्येक)
**प्राणायामपरायणाः** = प्राणायामपरायण असलेले (योगीलोक)
**अपाने** = अपानात
**प्राणम्** = प्राणाचा (पूरक करून)
**प्राणापानगती** = प्राण आणि अपानाच्या गतीला
**रुद्ध्वा** = रोखून (कुंभक करून)
**प्राणे** = (मग) प्राणात
**अपानम्** = अपानाचे
**जुह्वति** = हवन (रेचक) करतात;
**तथा** = तसेच
**अपरे** = अन्य (कित्येक)
**नियताहाराः** = नियमित आहार करणारे
**प्राणान्** = प्राणांचे
**प्राणेषु** = प्राणांत

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **जुह्वति** | = हवन करीत असतात; | **एते** | = हे | | करणारे (आणि) |
| **तथा** | = तसेच | **सर्वे, अपि** | = सर्वच (साधक) | **यज्ञविदः** | = यज्ञाला जाणणारे आहेत. |
| | | **यज्ञक्षपितकल्मषाः** | = यज्ञांद्वारा पापाचा नाश | | |

***व्याख्या*— अपाने जुह्वति....प्राणायामपरायणाः * —** प्राणाचे स्थान हृदय (वर) तसेच अपानाचे स्थान गुदा (खाली) आहे† श्वासाला बाहेर टाकते वेळी वायूची गती वरच्या दिशेने तसेच श्वास आत घेतेवेळी वायूची गती खालच्या दिशेने राहते. म्हणून श्वास बाहेर काढण्याचे कार्य "प्राणा" चे आहे. आणि श्वास आत घेण्याचे कार्य "अपाना" चे आहे. योगीलोक प्रथम बाहेरच्या वायूला डाव्या नाकपुडीच्या द्वाराने (चंद्रनाडी) आतमध्ये घेतात. तो वायू हृदयामध्ये स्थित असलेल्या प्राणवायूला बरोबर घेऊन नाभीमार्गे स्वाभाविकच अपान वायूमध्ये विलीन होतो. याला "पूरक" म्हणतात. मग ते प्राणवायू आणि अपानवायू या दोन्हींची गती रोखतात. श्वास बाहेरही जात नाही आणि आत-ही येत नाही. याला "कुंभक" म्हणतात. यानंतर ते आतल्या वायूला उजव्या नाकपुडीद्वारा (सूर्यनाडी) बाहेर काढतात. तो वायू स्वाभाविकच प्राणवायू तसेच त्याच्या पाठोपाठ अपानवायूला बरोबर घेऊन बाहेर येतो. हेच प्राणवायूचे अपानवायूमध्ये हवन करणे आहे. याला "रेचक" म्हणतात. चार भगवन्नामाने पूरक, सोळा भगवन्नामाने "कुंभक" आणि आठ भगवन्नामाने "रेचक" केले जाते.

या प्रकारे योगीलोक प्रथम चद्रंनाडीने पूरक, नंतर कुंभक आणि त्यानंतर सूर्यनाडीने रेचक करतात. त्यानंतर सूर्यनाडीने पूरक, नंतर कुंभक व चंद्रनाडीने रेचक करतात. याप्रमाणे वारंवार पूरक-कुंभग-रेचक करणे प्राणायामरूपी यज्ञ आहे. परमात्मप्राप्तीच्या उद्देशाने निष्कामभावनेने प्राणायामपरायण झाल्याने सर्व पाप नष्ट होतात.‡

**अपरे नियताहाराः प्राणान् प्राणेषु जुह्वति**—नियमित आहार-विहार करणारा साधकच प्राणांचा प्राणात हवन करू शकतो. अधिक अथवा फारच कमी जेवण करणारा अथवा बिल्कुल जेवण न करणारा हा प्राणायाम करू शकत नाही (६।१६-१७)

प्राणांचा प्राणामध्ये हवन करण्याचे तात्पर्य प्राणाचे प्राणामध्ये आणि अपानाचे अपानामध्ये हवन करणे अर्थात् प्राण आणि अपानाला आपआपल्या स्थानावर रोखणे हे आहे. श्वास बाहेर येऊ द्यावयाचा नाही आणि आतही जाऊ द्यावयाचा नाही. याला "स्तम्भवृत्ति प्राणायाम" सुद्धा म्हणतात. या प्राणायामाने स्वाभाविकच वृत्ती शांत होतात आणि पापांचा नाश होतो. केवळ परमात्मप्राप्तीचा उद्देश ठेवून हा प्राणायाम केल्याने अंत:कारण शुद्ध होते आणि परमात्मप्राप्ती होते.

**सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः**—चोवीसाव्या श्लोकापासून तीसाव्या श्लोकाच्या पूर्वार्धापर्यंत ज्या यज्ञांचे वर्णन झाले आहे. त्याचे अनुष्ठान करणाऱ्या साधकासाठी येथे "**सर्वेऽप्येते**" पद आले आहे. या यज्ञाचे अनुष्ठान केल्याने त्यांची सर्व पापे नष्ट होतात आणि अविनाशी परमात्म्याची प्राप्ती होते.

वास्तविक संपूर्ण यज्ञ केवळ कर्माशी संबंध-विच्छेद करण्यासाठीच आहेत—असे जाणणारेच "**यज्ञवित्**" अर्थात् यज्ञाच्या तत्त्वाला जाणणारे आहेत. कर्माशी सर्वथा संबंध-विच्छेद झाल्यावर पमात्म्याचा अनुभव होतो. जे लोक अविनाशी परमात्म्याचा अनुभव करण्यासाठी यज्ञ करीत नाहीत तर या लोकाच्या आणि परलोका (स्वर्गादी) च्या विनाशी भोगांच्या प्राप्तीसाठीच यज्ञ करतात, ते यज्ञाच्या तत्त्वाला जाणत नाहीत. कारण विनाशी पदार्थाची कामनाच बंधनाचे कारण आहे, "**गतागतं कामकामा लभन्ते**" (९।२१) म्हणून मनामध्ये कामना-वासना ठेवून परिश्रम करून मोठमोठे यज्ञ करूनसुद्धा जन्ममरणाचे बंधन कायम राहते.

**मिटी न मनकी वासना, नौ तत भये न नास।**
**तुलसी केते पच मुये, दे दे तन को त्रास॥**

## विशेष गोष्ट

यज्ञ करतेवेळी अग्नीत आहुती दिली जाते. आहुती दिल्या जाणाऱ्या वस्तूंचे रूप पूर्वी वेगवेगळे होते. परंतु अग्नीत आहुती दिल्यावर त्यांचे रूप वेगवेगळे राहत नाही तर सर्व वस्तू अग्नीरूप होतात. त्याचप्रमाणे परमात्म- प्राप्तीसाठी ज्या साधनांचे यज्ञरूपाने वर्णन केले गेले आहे, त्यात आहुती देण्याचे तात्पर्य हेच आहे की, आहुती दिल्या जाणाऱ्या वस्तूंची वेगळी सत्ता रहावयालाच नको, सर्व स्वाहा व्हावे. जोपर्यंत त्यांची वेगळी सत्ता कायम आहे तोपर्यंत त्यांची आहुती दिली गेलीच नाही अर्थात् यज्ञाचे अनुष्ठान झाले नाही.

* या (एकोणतीसाव्या) श्लोकात "अपरे" कर्ता आणि "जुह्वति" क्रिया एकच आली आहे. म्हणून येथे पूरक, कुम्भक आणि रेचकपूर्वक केला जाणारा एकच प्राणायामरूपी यज्ञ घेतला गेला आहे.

† हृदि प्राण: स्थितो नित्यमपानो गुदमण्डले। (योगचूडामण्युपनिषद् २३)

‡ गीताध्ययनशीलस्य प्राणायामपरस्य च। नैव सन्ति हि पापानि पूर्वजन्मकृतानि च॥

याच अध्यायाच्या सोळाव्या श्लोकापासून भगवान् कर्माच्या तत्त्वाचे (कर्मामध्ये अकर्म) वर्णन करीत आहेत. कर्माचे तत्त्व आहे—कर्म करूनही त्याच्याशी लिप्त न राहणे. कर्माशी लिप्त न राहण्याचेच एक साधन ''यज्ञ'' आहे. जसे अग्नीत टाकल्यावर सर्व वस्तू स्वाहा होतात, तसेच केवळ लोकहितासाठी केली जाणारी सर्व कर्मं स्वाहा होतात. **''यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते''** (४।२३)

निष्कामभावनेने केवळ लोकहितार्थ केले गेलेले साधारणती साधारण कर्मसुद्धा परमात्म्याची प्राप्ती करून देणारे होते. परंतु सकामभावनेने केल्या गेलेल्या मोठमोठ्या कर्मानीसुद्धा परमात्म्याची प्राप्ती होत नाही. कारण उत्पत्ति-विनाशशील पदार्थांची कामनाच बांधणारी आहे. पदार्थ आणि क्रियारूपी संसाराशी आपला संबंध मानल्यामुळे मनुष्य-मात्रामध्ये पदार्थ मिळविण्याची आणि कर्म करण्याची आसक्ती राहते की, मला काही ना काही मिळत रहावे आणि मी काही ना काही तरी करीत रहावे. ह्यानांच ''मिळविण्याची कामना'' तसेच ''करण्याचा वेग'' म्हणतात.

मनुष्यामध्ये मिळविण्याची जी कामना राहते ती वास्तविक आपल्या अंशी परमात्म्यालाच प्राप्त करण्याची भूक असते, परंतु परमात्म्याशी विमुख आणि संसाराशी सम्मुख झाल्याने मनुष्य या भूकेची तृप्ती सांसारिक पदार्थापासून करू इच्छितो. सांसारिक पदार्थ विनाशी आहेत आणि जीव अविनाशी आहे. अविनाशीची भूक विनाशी पदार्थांने कशी नाहीशी होऊ शकते? परंतु जोपर्यंत संसाराशी सम्मुखता राहते तोपर्यंत मिळविण्याची कामना कायम राहते. जोपर्यंत मनुष्याचे ठिकाणी मिळविण्याची कामना राहते तोपर्यंत त्याच्यामध्ये करण्याचा वेग कायम राहतो. याप्रमाणे जोपर्यंत मिळविण्याची कामना आणि करण्याचा वेग कायम असतो अर्थात् पदार्थ आणि क्रियेशी संबंध कायम आहे तोपर्यंत जन्म-मरण सुटत नाही. यापासून सुटका होण्याचा उपाय आहे—काहीही मिळविण्याची कामना न ठेवता केवळ दुसऱ्याच्या हितासाठीच कर्म करणे. यालाच लोकसंग्रह, यज्ञार्थ कर्म, लोकहितार्थ कर्म इत्यादी नावाने म्हटले गेले आहे.

केवळ दुसऱ्याच्या हितासाठीच कर्म केल्याने संसाराशी संबंध राहत नाही आणि असंगता प्राप्त होते. जर केवळ भगवंतासाठीच कर्म केले तर संसाराशी संबंध सुटून असंगता तर प्राप्त होतेच. याबरोबर आणखी एक विलक्षण गोष्ट ही होते की, भगवंताचे ''प्रेम'' प्राप्त होते.

**परिशिष्ट भाव**—निःस्वार्थभावाने केवळ दुसऱ्याच्या हितासाठी कर्तव्यकर्म करण्याचे नाव 'यज्ञ' आहे. यज्ञाने सर्वच कर्म अकर्म होतात अर्थात् बंधनकारक होत नाहीत. चोवीसाव्यापासून तीसाव्या श्लोकापर्यंत एकूण बारा प्रकारचे यज्ञ सांगितले आहेत. ते खालीलप्रमाणे आहेत—

(१) **ब्रह्मयज्ञ**—प्रत्येक कर्मात कर्ता, करण, क्रिया, पदार्थ इत्यादी सर्वांना ब्रह्मरूपाने अनुभव करणे.

(२) **भगवदर्पणरूपी यज्ञ**—संपूर्ण क्रिया आणि पदार्थ यांना केवळ भगवंताचे आणि भगवंतासाठीच मानणे.

(३) **अभिन्नतारूपी यज्ञ**—असत्‌पासून संपूर्णपणे विमुख होऊन परमात्म्यात लीन होणे अर्थात् परमात्म्याव्यतिरिक्त भिन्न आपली स्वतंत्र सत्ता न ठेवणे.

[**कर्तव्य-कर्मरूपी यज्ञ**—केवळ दुसऱ्यांच्या हितासाठी संपूर्ण कर्तव्यकर्म करणे.]

(४) **संयमरूपी यज्ञ**—एकान्तकालात आपल्या इंद्रियांना विषयांत प्रवृत्त होऊन देणे.

(५) **विषय-हवनरूपी यज्ञ**—व्यवहारकाळात इंद्रियांचा विषयांशी संयोग झाल्यावरही त्यात राग-द्वेष उत्पन्न होऊ न देणे (गीता—दुसऱ्या अध्यायाचा चौसष्टावा-पासष्टावा श्लोक).

(६) **समाधिरूपी यज्ञ**—मन-बुद्धीसहित संपूर्ण इंद्रिये आणि प्राण यांच्या क्रियांना रोखून ज्ञानाने प्रकाशित झालेल्या समाधीत स्थित होणे.

(७) **द्रव्ययज्ञ**—संपूर्ण पदार्थांना निःस्वार्थभावाने दुसऱ्यांच्या सेवेत लावणे.

(८) **तपोयज्ञ**—आपल्या कर्तव्यपालनात येणाऱ्या अडचणींना प्रसन्नतेने सहन करणे.

(९) **योगयज्ञ**—कार्याच्या सिद्धी-असिद्धीत तसेच फलाच्या प्राप्ती-अप्राप्तीत सम राहणे.

(१०) **स्वाध्यायरूपी ज्ञानयज्ञ**—दुसऱ्यांच्या हितासाठी सत्-शास्त्रांचे पठन-पाठन, नामजप इत्यादी करणे.

(११) **प्राणायामरूपी यज्ञ**—पूरक, कुंभक आणि रेचकपूर्वक प्राणायाम करणे.

(१२) **स्तम्भवृत्ति (चतुर्थ) प्राणायामरूपी यज्ञ**—नियमित आहार घेत प्राण आणि अपानाला आपापल्या स्थानावर रोखणे.

या सर्वांचे तात्पर्य हे आहे की, आपल्या संपूर्ण क्रिया यज्ञरूपच व्हाव्यात, तेव्हाच जीव सफल होईल. तात्पर्य, आपणाला आपल्यासाठी काही करायचे नाही. क्रिया आणि पदार्थाशी आपला कोणताही संबंध नाही. आपला संबंध परमात्म्याशी आहे,

जो क्रिया आणि पदार्थरहित आहे.

***संबंध—*** *चोवीसाव्या श्लोकापासून तीसाव्या श्लोकाच्या पूर्वार्धापर्यंत, भगवंतांनी एकूण बारा प्रकारच्या यज्ञांचे वर्णन केले आणि तीसाव्या श्लोकाच्या उत्तरार्धामध्ये यज्ञ करणाऱ्या साधकांची प्रशंसा केली आहे. आता भगवान् पुढील श्लोकात यज्ञ केल्यापासून होणारा लाभ आणि न केल्यापासून होणाऱ्या हानीचे वर्णन करीत आहेत.*

**यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम्।**
**नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम॥ ३१॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कुरुसत्तम** | = हे कुरुवंशियांत श्रेष्ठ अर्जुन! | **सनातनम्** | = सनातन | **अयम्** | = हा |
| **यज्ञशिष्टामृतभुजः** | = यज्ञातून शेष राहिलेल्या अमृताचा अनुभव करणारे | **ब्रह्म** | = परब्रह्म परमात्म्याला | **लोकः** | = मनुष्यलोक (ही) |
| | | **यान्ति** | = प्राप्त होतात. | **न, अस्ति** | = (सुखदायक) नाही, |
| | | **अयज्ञस्य** | = यज्ञ न करणाऱ्या मनुष्यासाठी | **अन्यः** | = (मग) परलोक |
| | | | | **कुतः** | = कसा (सुखदायक राहील)? |

*व्याख्या—* **यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम्—** यज्ञ करण्याने अर्थात् निष्कामभावपूर्वक दुसऱ्यांना सुख पोहोचविल्याने समतेचा अनुभव होणे हेच "यज्ञशिष्ट अमृत" याचा अनुभव करणे आहे. अमृत अर्थात् अमरतेचा अनुभव करणारे सनातन परब्रह्म परमात्म्याला प्राप्त होतात (३।१३)

स्वरूपाने मनुष्य अमर आहे. मरणाऱ्या वस्तूंच्या संगतीनेच मनुष्याला मृत्यूचा अनुभव होतो. या वस्तूंना संसाराच्या हितासाठी उपयोगात आणल्याने जेव्हा मनुष्य असंग होतो तेव्हा त्याला स्वतःसिद्ध अमरतेचा अनुभव होतो.

कर्तव्यमात्र केवळ कर्तव्य समजून केले जातील तर तो यज्ञ होतो. केवळ दुसऱ्याच्या हितासाठीच केले जाणारे कर्मच कर्तव्य असते. जे कर्म आपल्यासाठी केले जाते ते कर्तव्य होत नाही तर केवळ कर्म होते, ज्यामुळे मनुष्य बांधला जातो. म्हणून यज्ञात देणेच देणे असते, घेणे केवळ निर्वाहासाठी असते (४।२१). शरीर यज्ञ करण्यासाठी समर्थ रहावे या दृष्टीने केवळ शरीरनिर्वाहासाठी वस्तूंचा उपयोग करणे सुद्धा यज्ञाचे अंतर्गत येते. मनुष्यशरीर यज्ञासाठीच आहे. त्याला मान-प्रतिष्ठा, सुख-आराम इत्यादीमध्ये लावणे बंधनकारक आहे. केवळ यज्ञासाठी कर्म केल्याने मनुष्य बंधनरहित (मुक्त) होतो आणि त्याला सनातन ब्रह्माची प्राप्ती होते.

**नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम—** जसे तीसऱ्या अध्यायाच्या आठव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, कर्म न केल्यास तुझा शरीरनिर्वाहसुद्धा सिद्ध होणार नाही. त्याचप्रमाणे येथे म्हणतात की, यज्ञ न केल्यास तुझ्यासाठी हा लोकही लाभदायक राहणार नाही तर मग परलोकाबद्दल काय बोलावे? केवळ स्वार्थभावनेने (आपल्यासाठी) कर्म केल्याने या लोकी संघर्ष उत्पन्न होईल आणि सुख-शांती भंग होईल तसेच परलोकीही कल्याण होणार नाही.

आपल्या कर्तव्याचे पालन न केल्याने घरामध्ये भेदभाव आणि संघर्ष निर्माण होतो, कलह माजतो. घरामध्ये एखादी व्यक्ती स्वार्थी आणि अप्पल पोटी असेल तर घरातील मंडळींना ती व्यक्ती घरामध्ये नकोशी होते. स्वार्थाचा संपूर्ण-पणे त्याग करून आपल्या कर्तव्याने सर्वांना सुख पोहचविणे ही घरामध्ये अथवा संसारामध्ये राहण्याची विद्या आहे. आपल्या कर्तव्याचे पालन केल्याने दुसऱ्यांनाही कर्तव्य-पालनाची प्रेरणा मिळते. यामुळे घरामध्ये ऐक्य आणि शांती स्वाभाविक खेळते. परंतु आपल्या कर्तव्याचे पालन न केल्यास या लोकी सुखपूर्वक जगणेसुद्धा कठीण होते मग इतर लोकाविषयी काय म्हणावयाचे? या विपरीत आपल्या कर्तव्याचे योग्य रीतीने पालन केल्यास हा लोकही सुखदायक होतो आणि परलेकही सुखदायक होतो.

***संबंध—*** *याच अध्यायाच्या सोळाव्या श्लोकात भगवंतांनी कर्माचे तत्त्व सांगण्याची प्रतिज्ञा केली होती. त्याचे विस्ताराने वर्णन करून आता भगवान् त्याचा उपसंहार करीत आहेत.*

**एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे।**
**कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे॥ ३२॥**

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **एवम्** | = | अशाप्रकारे (अजूनही) | **वितताः** | = | विस्ताराने सांगितले गेले आहेत. | **विद्धि** | = | जाण. |
| **बहुविधाः** | = | पुष्कळ प्रकारचे | **तान्** | = | त्या | **एवम्** | = | अशाप्रकारे |
| **यज्ञाः** | = | यज्ञ | **सर्वान्** | = | सर्व यज्ञांना (तू) | **ज्ञात्वा** | = | जाणून (यज्ञ केल्यास) |
| **ब्रह्मणः** | = | वेदाच्या | | | | **विमोक्ष्यसे** | = | (तू कर्मबंधनातून) मुक्त होशील. |
| **मुखे** | = | वाणीत | **कर्मजान्** | = | कर्मजन्य | | | |

*व्याख्या*— **एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे**— चोवीसाव्यापासून तीसाव्या श्लोकापर्यंत ज्या बारा यज्ञांचे वर्णन केले गेले आहे, त्याशिवाय आणखी अनेक प्रकारच्या यज्ञाचे वर्णन वेदाच्या वाणीत विस्ताराने केले गेले आहे. कारण साधकांच्या प्रकृतीनुसार त्यांच्या निष्ठासुद्धा वेग-वेगळ्या असतात आणि त्याप्रमाणे त्यांची साधनेही वेग-वेगळी असतात.

वेदांत सकाम अनुष्ठानांचेसुद्धा विस्ताराने वर्णन केले गेले आहे. परंतु त्यापासून नाशवान् फलाचीच प्राप्ती होते, अविनाशीची नव्हे. म्हणून वेदांत वर्णन केलेली सकाम अनुष्ठाने करणारे मनुष्य स्वर्गाला प्राप्त होतात आणि पुण्य संपल्यानंतर पुनः मृत्युलोकात जन्म घेतात. याप्रमाणे ते जन्ममरणाच्या बंधनात पडून राहतात (९।२१) परंतु त्या सकाम अनुष्ठानासंबंधी विषय या ठिकाणी सांगितला नाही. या ठिकाणी निष्कामकर्मरूपी अशा यज्ञाविषयी सांगितले आहे की, ज्याच्या अनुष्ठानाने परमात्म्याची प्राप्ती होते **''यान्ति ब्रह्म सनातनम्''** (४।३१)

वेदांमध्ये केवळ स्वर्गप्राप्तीसाठी सकाम अनुष्ठानांच्या साधनांचेच वर्णन आहे असे नाही. त्यामध्ये परमात्मप्राप्तीसाठी साधनरूपी श्रवण, मनन, निदिध्यासन, प्राणायाम, समाधी इत्यादी अनुष्ठानांचेही वर्णन आलेले आहे. उपर्युक्त पदांतून त्याच अनुष्ठानाकडे लक्ष वेधण्याचा प्रयत्न केला आहे.

तीसऱ्या अध्यायाच्या चौदाव्या-पंधराव्या श्लोकात म्हटले गेले आहे की, यज्ञ वेदापासून उत्पन्न झाले आहेत आणि सर्वव्यापी परमात्मा त्या यज्ञामध्ये नित्य विराजमान असतात. यज्ञामध्ये परमात्मा नित्य विराजमान असल्याने त्या यज्ञाचे अनुष्ठान केवळ परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीसाठीच केले पाहिजे.

**कर्मजान्विद्धि तान्सर्वान्**—चौवीसाव्यापासून तीसाव्या श्लोकापर्यंत ज्या बारा यज्ञांचे वर्णन झाले आहे आणि त्याचप्रमाणे वेदांमध्ये ज्या यज्ञांचे वर्णन झाले आहे त्या सर्व यज्ञांसाठी येथे **''तान्सर्वान्''** पद आले आहे. **''कर्मजान् विद्धि''** पदाचे तात्पर्य ते सर्वचे सर्व यज्ञ कर्मजन्य आहेत अर्थात् कर्मापासून उत्पन्न होणारे आहेत. शरीराने ज्या क्रिया होतात वाणीने जे कथन होते आणि मनाने जे संकल्प होतात ते सर्व कर्म म्हटले जातात. **''शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः''** (१८।१५)

अर्जुन आपले कल्याण तर इच्छित आहेत परंतु युद्धरूपी कर्तव्यकर्माला पाप समजून त्याचा त्याग करू इच्छित आहेत. म्हणून **''कर्मजान् विद्धि''** पदाने भगवान् अर्जुनापुढे असा भाव प्रगट करीत आहेत की, युद्धरूपी कर्तव्यकर्माचा त्याग करून आपल्या कल्याणासाठी तू जे साधन करशील तर तेसुद्धा कर्मच होईल. वास्तविक कल्याण कर्माने होत नाही तर कर्माशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद झाल्यावरच होते. म्हणून जर तू युद्धरूपी कर्तव्यकर्मालाही निर्लिप्त राहून करशील तर त्यापासूनही तुझे कल्याण होईल. कारण मनुष्याला कर्म बंधनकारक नसतात तर (कर्माची आणि त्याच्या फलाची) आसक्तीच बंधन-कारक असते. (६।४) युद्ध तर तुझे स्वाभाविक (स्वधर्म) कर्म आहे म्हणून ते करणे तुझ्यासाठी सुगमसुद्धा आहे.

**एवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे**— भगवंतांनी याच अध्यायाच्या चौदाव्या श्लोकात म्हटले आहे की, कर्मफलात माझी स्पृहा नाही म्हणून मला कर्म बंधनकारक होत नाहीत. अशा प्रकारे जो मला जाणतो तोसुद्धा कर्माने बांधला जात नाही. तात्पर्य ज्याने कर्म करूनसुद्धा त्यापासून निर्लिप्त राहण्याची विद्या (कर्मफलात स्पृहा न ठेवणे) शिकून त्याचा अनुभव घेतला आहे तो कर्मबंधनापासून मुक्त होतो. नंतर पंधराव्या श्लोकात भगवंतांनी याच गोष्टीला **''एवं ज्ञात्वा''** या पदाने म्हटले आहे. त्याठिकाणीही हाच भाव आहे की, मुमुक्षू पुरुषसुद्धा याचप्रमाणे जाणून कर्म करीत आले आहेत. सोळाव्या श्लोकात कर्मापासून निर्लिप्त राहण्याच्या याच तत्त्वाला विस्ताराने सांगण्यासाठी भगवंतांनी प्रतिज्ञा केली आणि **''यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्''** पदांनी त्याला जाणण्याचे फल मुक्त होणे सांगितले. आता या श्लोकात **''एवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे''** पदांनीही त्या विषयाचा उपसंहार करतात. तात्पर्य फलाच्या इच्छेचा त्याग करून केवळ लोकहितार्थ कर्म केल्याने मनुष्य कर्मबंधनातून मुक्त होतो.

संसारामध्ये असंख्य क्रिया होत राहतात. परंतु ज्या क्रियेशी मनुष्य आपला संबंध जोडतो त्यानेच तो बांधला जातो. संसारामध्ये कुठेही कोणतीही क्रिया झाली असेल (घटना), जर मनुष्याने त्याच्याशी आपला संबंध जोडला, त्यामुळे राजी किंवा नाराज झाला, तर तो त्या क्रियेने बांधला जातो. जर शरीर अथवा संसारात होणाऱ्या कोणत्याही क्रियेशी मनुष्याचा संबंध राहिला नाही तर तो मनुष्य कर्मबंधनातून मुक्त होतो.

***संबंध**— यज्ञांचे वर्णन ऐकून अशी जिज्ञासा होते की, त्या यज्ञांपैकी कोणता यज्ञ श्रेष्ठ आहे? याचे समाधान भगवान् पुढील श्लोकात करीत आहेत.*

**श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परन्तप।**
**सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते॥ ३३॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **परन्तप, पार्थ** | = हे परंतप अर्जुन! | **श्रेयान्** | = श्रेष्ठ आहे. | **ज्ञाने** | = ज्ञानात (तत्त्वज्ञानात) |
| **द्रव्यमयात्** | = द्रव्यमय | **सर्वम्** | = संपूर्ण | | |
| **यज्ञात्** | = यज्ञापेक्षा | **कर्म** | = कर्म (आणि) | **परिसमाप्यते** | = समाप्त (लीन) होतात. |
| **ज्ञानयज्ञः** | = ज्ञानयज्ञ | **अखिलम्** | = पदार्थ | | |

*व्याख्या*— **श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परन्तप**— ज्या यज्ञात द्रव्य (पदार्थ) तसेच कर्माची आवश्यकता असते ते सर्व यज्ञ ''द्रव्यमय'' असतात. ''द्रव्य'' शब्दाबरोबर ''मय'' प्रत्यय विपुलता अर्थाने योजला आहे. जसे मातीचे प्रमाण अधिक असलेले भांडे ''मृन्मय'' म्हटले जाते तसेच द्रव्याची विपुलता असलेला यज्ञ ''द्रव्यमय'' म्हटला जातो. अशा द्रव्यमय यज्ञापेक्षा ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे कारण ज्ञानयज्ञात द्रव्य आणि कर्माची आवश्यकता नसते.

सर्व यज्ञांना भगवंतांनी कर्मजन्य म्हटले आहे (४।३२) येथे भगवान् म्हणतात की, संपूर्ण कर्म ज्ञानयज्ञात समाप्त होतात अर्थात् ज्ञानयज्ञ कर्मजन्य नाही तर विवेक-विचार-जन्य आहे. म्हणून येथे ज्या ज्ञानयज्ञाची गोष्ट आली आहे ती पूर्व वर्णित बारा यज्ञाच्या अंतर्गत आलेल्या ज्ञानयज्ञाचे (४।२८) वाचक नाही तर पुढील (चौतीसाव्या) श्लोकात वर्णन केलेल्या ज्ञान प्राप्त करण्याच्या प्रचलित प्रक्रियेचे वाचक आहे. पूर्वी वर्णन केलेल्या बारा यज्ञांचे वाचक येथे ''द्रव्यमय'' यज्ञ आहे. द्रव्यमय यज्ञ समाप्त करूनच ज्ञानयज्ञ केला जातो.

जर सूक्ष्म दृष्टीने पाहिले तर ज्ञानयज्ञसुद्धा क्रियाजन्यच आहे परंतु यात विवेक-विचाराची प्रधानता राहते.

**सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते**—''**सर्वम्**'' आणि ''**अखिलम्**'' दोन्ही शब्द पर्यायवाचक आहेत आणि त्यांचा अर्थ ''संपूर्ण'' असा होतो. म्हणून येथे ''**सर्वम् कर्म**'' चा अर्थ संपूर्ण कर्म (एकूण कर्म) आणि ''**अखिलम्**'' चा अर्थ संपूर्ण द्रव्य (एकूण पदार्थ) घेणेच योग्य वाटते.

जोपर्यंत मनुष्य आपल्यासाठी कर्म करतो तोपर्यंत त्याचा संबंध क्रिया आणि पदार्थांशी कायम असतो. जोपर्यंत क्रिया आणि पदार्थांशी संबंध राहतो तोपर्यंत अंत:करणात अशुद्धी असते. म्हणून आपल्यासाठी कर्म केले नाही तरच अंत:करण शुद्ध होते.

अंत:करणात तीन दोष राहतात—मल (संचित पाप), विक्षेप (चित्ताची चंचलता) आणि आवरण (अज्ञान). आपल्यासाठी कोणतेही कर्म केले नाही अर्थात् केवळ संसाराच्या सेवेसाठीच कर्म केल्याने जेव्हा साधकाच्या अंत:करणामध्ये असलेले मल आणि विक्षेप दोष दोन्ही समाप्त होतात तेव्हा तो ज्ञानप्राप्तीद्वारा आवरण दोषाला समाप्त करण्यासाठी कर्मांचा स्वरूपाने त्याग करून गुरूंजवळ जातो. त्यावेळी तो कर्म आणि पदार्थाहून पलीकडे जातो अर्थात् कर्म आणि पदार्थ हे त्याचे ध्येय राहत नाही तर एक चिन्मय तत्त्वच त्याचे ध्येय राहते. हेच संपूर्ण कर्म आणि पदार्थांचे तत्त्वज्ञानामध्ये समाप्त होणे आहे.

### ज्ञानप्राप्तीची प्रचलित क्रिया

शास्त्रामध्ये ज्ञानप्राप्तीची आठ अंतरंग साधने सांगितली गेली आहेत (१) विवेक, (२) वैराग्य (३) शमादी षट्-सम्पत्ती (शम, दम, श्रद्धा, उपरती, तितिक्षा आणि समाधान) (४) मुमुक्षुता (५) श्रवण (६) मनन , (७) निदिध्यासन आणि (८) तत्त्वपदार्थसंशोधन. यात प्रथम साधन विवेक आहे. सत् आणि असत्‌ला वेगवेगळे जाणणे ''विवेक'' आहे. सत्-असत्‌ला वेगवेगळे जाणून असत्‌चा त्याग करणे अथवा संसारापासून विमुख होणे ''वैराग्य'' होय. यानंतर शमादी षट्सम्पत्ती येते. मनाला इंद्रियांच्या विषयापासून परावृत्त करणे याला ''शम'' म्हणतात. इंद्रियांना विषयापासून

परावृत्त करणे याला "दम" म्हणतात. ईश्वर, शास्त्र इत्यादी-च्या ठिकाणी पूज्य भावनेने प्रत्यक्षापेक्षाही जास्त विश्वास ठेवणे "श्रद्धा" होय. वृत्तींचे संसारापासून परावृत्त होणे याला "उपरती" म्हणतात. थंडी-उष्णता इत्यादी द्वंद्वांना सहन करणे, त्यांची उपेक्षा करणे "तितिक्षा" होय. अंत:करणात कोणतीही शंका न राहणे "समाधान" होय. यानंतर चौथे साधन आहे मुमुक्षुता. संसारापासून सुटका होण्याची इच्छा निर्माण होणे याला "मुमुक्षुता" म्हणतात.

मुमुक्षुता जागृत झाल्यावर साधक पदार्थांचा आणि कर्मांचा स्वरूपाने त्याग करून श्रोत्रिय आणि ब्रह्मनिष्ठ गुरूंजवळ जातो. गुरूंच्या जवळ राहून, शास्त्रश्रवण करून तात्पर्याचा निर्णय करणे तसेच त्याला धारण करणे "श्रवण" आहे. श्रवणाने प्रमाणगत संशय नष्ट होतो. परमात्मतत्त्वाचे युक्ती-प्रयुक्तीने चिंतन करणे "मनन" होय. मननाने प्रमेयगत संशय नष्ट होतो. संसाराच्या सत्तेला मान्य करणे आणि परमात्मतत्त्वाच्या सत्तेला न मानणे ह्याला "विपरीत भावना " म्हटले जाते. विपरीत भावनेला नष्ट करणे याला "निदिध्यासन" म्हणतात. संपूर्ण प्राकृत पदार्थांशी संबंध-विच्छेद होणे आणि केवळ एक चिन्मय तत्त्व शेष राहणे याला "तत्त्वपदार्थसंशोधन" म्हणतात. यालाच तत्त्वसाक्षात्कार म्हणतात.*

विचारपूर्वक पाहिले तर या सर्व साधनांचे तात्पर्य— असाधन अर्थात् असत्‌च्या संबंधाचा त्याग आहे. त्याज्य वस्तू आपल्यासाठी नसते परंतु त्यागाचा परिणाम (तत्त्वसाक्षात्कार) आपल्यासाठी असतो.

**परिशिष्ट भाव**—द्रव्यमय यज्ञात क्रिया आणि पदार्थाची मुख्यता असते, म्हणून तो करणसापेक्ष आहे. ज्ञानयज्ञात विवेक-विचाराची मुख्यता असते, म्हणून तो करणनिरपेक्ष आहे. म्हणून द्रव्यमय यज्ञापेक्षा ज्ञानमय यज्ञ श्रेष्ठ आहे. ज्ञानयज्ञात संपूर्ण क्रिया आणि पदार्थ यांच्याशी संबंध-विच्छेद होतो, अर्थात् तत्त्वज्ञान झाल्यास काहीही करणे, जाणणे आणि प्राप्त करणे शिल्लक राहत नाही. कारण एका परमात्मतत्त्वाशिवाय अन्य सत्ताच राहत नाही.

***संबंध**—अर्जुन आपले कल्याण इच्छितात म्हणून कल्याणप्राप्तीच्या अनेक साधनांचे, यज्ञरूपाने वर्णन करून आता भगवान् ज्ञानयज्ञाद्वारा तत्त्वज्ञान प्राप्त करण्याच्या प्रचलित प्रणालीचे वर्णन करीत आहेत.*

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः॥ ३४॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तत्** | = त्याला (तत्त्वज्ञानाला) | | केल्याने | **तत्त्वदर्शिनः** | = तत्त्वदर्शी (अनुभवी) |
| **विद्धि** | = (तत्त्वदर्शी ज्ञानी महा-पुरुषांजवळ जाऊन) समजून घे. | **सेवया** | = (त्यांची) सेवा केल्याने (आणि) | **ज्ञानिनः** | = ज्ञानी (शास्त्रज्ञ) महापुरुष |
| **प्रणिपातेन** | = (त्यांना) साष्टांग दंडवत् प्रणाम | **परिप्रश्नेन** | = सरळतेने प्रश्न केल्यास | **ज्ञानम्** | = (तुला त्या) तत्त्वज्ञानाचा |
| | | **ते** | = ते | **उपदेक्ष्यन्ति** | = उपदेश करतील. |

***व्याख्या***— **तद्विद्धि**—अर्जुनाने पूर्वी म्हटले होते की, युद्धामध्ये स्वजनांना मारून मला कल्याण दिसत नाही (१। ३१) या आततायींना मारल्याने तर पापच लागेल (१। ३६) युद्ध करण्यापेक्षा मी भिक्षा मागून जीवननिर्वाह करणे श्रेष्ठ समजतो (२।५) याप्रमाणे अर्जुन युद्धरूपी कर्तव्यकर्माचा त्याग करणे श्रेष्ठ समजत आहेत. परंतु भगवंताच्या मतानुसार ज्ञानप्राप्तीसाठी कर्मांचा त्याग करणे आवश्यक नाही (३। २०, ४। १५) म्हणून येथे भगवान् अर्जुनाला जणु हे म्हणत आहेत की, जर तू कर्मांचा स्वरूपाने त्याग करून ज्ञान प्राप्त करण्याला श्रेष्ठ समजत आहेस तर तू एखाद्या तत्त्वदर्शी ज्ञानी महापुरुषाजवळच जाऊन विधी-पूर्वक ज्ञान प्राप्त कर, मी तुला असा उपदेश देणार नाही.

वास्तविक येथे भगवंताचा अभिप्राय अर्जुनाला ज्ञानी महापुरुषाजवळ पाठविण्याचा नाही, तर त्याला चेतविण्याचा आहे. जसे एखादा महापुरुष एखाद्याला त्याच्या कल्याणाची गोष्ट सांगत आहे. परंतु श्रद्धेच्या उणीवेमुळे ऐकणाराला ती गोष्ट पटत नाही. तेव्हा तो महापुरुष त्याला म्हणतो की, तू दुसऱ्या एखाद्या महापुरुषाकडे जाऊन आपल्या कल्याणाचा उपाय विचार. त्याचप्रमाणे भगवान् जणू हे म्हणत आहेत की, जर तुला माझी गोष्ट पटत नसेल तर तू एखाद्या दुसऱ्या ज्ञानी

* जे सांसारिक भोग आणि संग्रहामध्ये लागलेले आहेत अशा माणसांकडून शास्त्रांचे "श्रवण" होते, विषयांचे "मनन" होते, रुपयांचे "निदिध्यासन" होते आणि "साक्षात्कार" दु:खाचा होतो.

पुरुषाजवळ जाऊन प्रचलित प्रणालीचा स्वीकार करून ज्ञान प्राप्त कर. ज्ञान प्राप्त करण्याची प्रचलित प्रणाली कर्मांचा स्वरूपाने त्याग करून जिज्ञासापूर्वक श्रोत्रिय आणि ब्रह्मनिष्ठ पुरुषाजवळ जाऊन विधीपूर्वक ज्ञान प्राप्त करणे* अशी आहे.

यानंतर भगवंतांनी अडतीसाव्या श्लोकात म्हटले आहे की, हेच तत्त्वज्ञान तुला आपले कर्तव्यकर्म करत असताना (कर्मयोग सिद्ध होताच) दुसऱ्या कोणत्याही साधनाशिवाय स्वत: आपोआप प्राप्त होईल. त्याच्यासाठी दुसऱ्या कोणाजवळ जाण्याची जरूरी नाही.

**प्रणिपातेन**—ज्ञानप्राप्तीसाठी गुरूंजवळ जाऊन त्यांना साष्टांग दंडवत् प्रणाम करावा. तात्पर्य गुरूंजवळ नीच पुरुषासारखे रहावे **"नीचवत् सेवेत सद्गुरुम्"** ज्यामुळे आपल्या शरीराकडून गुरूंचा कधीही निरादर-तिरस्कार होऊ नये. नम्रता, सरळता आणि जिज्ञासूभावाने त्यांचेजवळ रहावे आणि त्यांची सेवा करावी. आपण-आपल्याला त्यांना समर्पित व्हावे, त्यांचे स्वाधीन व्हावे. शरीर आणि वस्तू दोन्हीही त्यांना अर्पण करावे. साष्टांग दंडवत् प्रणाम करून आपले शरीर आणि सेवेने आपल्या वस्तू त्यांना अर्पण कराव्यात.

**सेवया**—शरीर आणि वस्तूंने गुरूंची सेवा करावी. ज्यामुळे ते प्रसन्न होतील असे काम करत जावे. त्यांची प्रसन्नता प्राप्त करून घ्यावयाची असेल तर आपण आपल्याला त्यांच्या संपूर्ण अधीन करावे. त्यांच्या मनाप्रमाणे, संकेताप्रमाणे, आज्ञेप्रमाणे काम करावे. हीच वास्तविक सेवा आहे.

संत महापुरुषाची सर्वात मोठी सेवा आहे—त्यांच्या सिद्धांतानुसार आपले जीवन घडविणे. कारण त्यांना सिद्धांत जितके प्रिय असतात तितके त्यांचे शरीरही त्यांना प्रिय नसते. सिद्धांताच्या रक्षणासाठी ते आपल्या शरीराचाही सहर्ष त्याग करतात. म्हणून खरा सेवक त्यांच्या सिद्धांताचे दृढतेने पालन करतो.

**परिप्रश्नेन**—केवळ परमात्मतत्त्व जाणण्यासाठी जिज्ञासू भावाने, सरळतेने आणि विनम्रतेने गुरूला प्रश्न करावा. आपली विद्वत्ता दाखविण्यासाठी अथवा त्यांची परीक्षा करण्याच्या उद्देशाने प्रश्न करू नये.

मी कोण आहे? संसार कशाला म्हणावे? बंधन कशाला म्हणावे? मोक्ष कशाला म्हणतात? परमात्मतत्त्वाचा अनुभव कशाने होऊ शकतो? माझ्या साधनेत कोण कोणत्या बाधा आहेत? त्या बाधांना कसे नष्ट करता येईल? तत्त्व का समजत नाही इत्यादी इत्यादी प्रश्न केवळ आपल्या बोधासाठी (जसजशी जिज्ञासा होईल तसतसे) करावेत.

**ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः**—"तत्त्वदर्शिन:" पदाचे तात्पर्य त्या महापुरुषाला परमात्मतत्त्वाचा अनुभव झाला असेल आणि **"ज्ञानिन:"** पदाचे तात्पर्य त्यांना वेद आणि शास्त्र यांचे चांगल्या प्रकारे ज्ञान असेल अशा तत्त्वदर्शी आणि ज्ञानी पुरुषाजवळ जाऊनच ज्ञान प्राप्त करून घेतले पाहिजे.

अंत:करणाच्या शुद्धीनुसार ज्ञानाचे अधिकारी तीन प्रकारचे असतात—उत्तम मध्यम आणि कनिष्ठ. उत्तम अधिकाऱ्याला केवळ श्रवणाने तत्त्वज्ञान प्राप्त होते.† मध्यम अधिकाऱ्याला श्रवण, मनन, निदिध्यासन केल्याने तत्त्वज्ञान होते. कनिष्ठ अधिकारी तत्त्वाला समजून घेण्यासाठी भिन्न-भिन्न प्रकारच्या शंका करत असतो. त्या शंकांचे समाधान करण्यासाठी वेद आणि शास्त्रांचे योग्य प्रकारे ज्ञान असणे आवश्यक आहे. कारण त्यावेळी केवळ युक्तींनी तत्त्व समजून देणे शक्य नसते. म्हणून जर गुरू तत्त्वदर्शी असतील परंतु ज्ञानी नसतील तर ते शिष्याच्या अनेक प्रकारच्या शंकांचे समाधान करू शकणार नाहीत. जर गुरू शास्त्राचे ज्ञाते असतील परंतु तत्त्वदर्शी नसतील तर त्यांचे विवेचन एवढे ठोस असणार नाही ज्यामुळे श्रोत्याला ज्ञान होईल. तो विवेचन करू शकतो, शास्त्र शिकवू शकतो परंतु शिष्याला बोध करून देऊ शकत नाही. म्हणून गुरूंचे तत्त्वदर्शी आणि ज्ञानी—दोन्ही असणे फारच आवश्यक आहे.

**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानम्**—महापूरुषांना दंडवत् प्रणाम केल्याने, त्यांची सेवा केल्याने आणि त्यांना सरळतेने प्रश्न करण्याने ते तुला तत्त्वज्ञानाचा उपदेश करतील. याचे तात्पर्य असे नाही की, महापुरुषांना या सर्वांची अपेक्षा राहते.

---

* आदौ स्ववर्णाश्रमवर्णिताः क्रियाः कृत्वा समासादितशुद्धमानसः।
समाप्य तत्पूर्वमुपात्तसाधनः समाश्रयेत् सद्गुरुमात्मलब्धये॥

(अध्यात्मरामायण उत्तर० ५।७)

"सर्वात प्रथम आपापल्या वर्ण आणि आश्रमासाठी शास्त्रात वर्णन केलेल्या क्रियांचे यथावत् पालन करून चित्त शुद्ध झाल्यावर त्या क्रियांचा त्याग करावा. मग शम, दम इत्यादी साधनाने संपन्न होऊन आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठी सद्गुरूला शरण जावे."

तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम्। (मुण्डक-१।२।१२)

"त्या ज्ञानाला प्राप्त करण्यासाठी जिज्ञासू साधकाने हातात समिधा घेऊन विनयाने वेद शास्त्रांचे ज्ञाता आणि तत्त्वज्ञानी गुरूंजवळ जावे."

† उत्तम अधिकारी तोच आहे ज्याचे ठिकाणी तत्त्वप्राप्तीविषयी लगन असते, ज्याला तत्त्वप्राप्तीसाठी भविष्यकाळ जड होतो अर्थात् जो वर्तमान-काळातच तात्काळ तत्त्वप्राप्ती करू इच्छितो.

वास्तविक त्यांना प्रणाम, सेवा इत्यादींची किंचित्मात्रसुद्धा आवश्यकता नसते. हे सर्व म्हणण्याचा भाव असा आहे की, जेव्हा साधक या प्रकारची जिज्ञासा करतो आणि सरळतेने महापुरुषाजवळ जाऊन राहतो. तेव्हा त्या महापुरुषाच्या अंत:करणात त्याच्याविषयी विशेष भाव उत्पन्न होतात, ज्यामुळे साधकाला खूप लाभ होतो. जर साधक याप्रमाणे त्यांच्याजवळ राहिला नाही तर ज्ञान मिळूनही तो त्याला ग्रहण करू शकणार नाही.

''**ज्ञानम्**'' पद येथे तत्त्वज्ञान अथवा स्वरूप-बोधाचे वाचक आहे. वास्तविक ज्ञान स्वरूपाचे होत नाही तर संसाराचे होते. संसाराचे ज्ञान होताच संसाराशी संबंध-विच्छेद होतो आणि स्वत:सिद्ध स्वरूपाचा अनुभव होतो.

''**उपदेक्ष्यन्ति**'' पदाचे हे तात्पर्य आहे की, महापुरुष ज्ञानाचा उपदेश तर करतात परंतु त्याने साधकाला बोध होईलच असे काही निश्चित नाही. पुढे एकोणचाळीसाव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, श्रद्धावान पुरुष ज्ञान प्राप्त करतो ''**श्रद्धावाँल्लभते ज्ञानम्**'' कारण श्रद्धा अंत:करणाची वस्तू आहे. परंतु प्रणाम, सेवा, प्रश्न इत्यादी कपटपूर्वक देखील केले जाऊ शकतात. म्हणून याठिकाणी महापुरुषाकडून केवळ ज्ञानाचा उपदेश करण्याविषयीच म्हटले आहे आणि एकोणचाळीसाव्या श्लोकात श्रद्धावान साधकाला ज्ञान प्राप्त होण्याविषयीचे विवेचन केले गेले आहे.

***संबंध*—*तत्त्वज्ञान प्राप्त करण्याच्या प्रचलित प्रणालीचे वर्णन करून आता भगवान् पुढील तीन (पस्तीस, छत्तीस आणि सदतीसाव्या) श्लोकांत तत्त्वज्ञानाचे वास्तविक माहात्म्य सांगतात.***

## यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पाण्डव।
## येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि॥ ३५॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यत्** | = ज्याचा (तत्त्वज्ञानाचा) | **यास्यसि** | = प्राप्त होणार | **अशेषेण** | = नि:संशयभावाने (प्रथम) |
| **ज्ञात्वा** | = अनुभव केल्यानंतर (तू) | **न** | = नाहीस (आणि) | **आत्मनि** | = आपल्यात (आणि) |
| **पुन:** | = पुन्हा | **पाण्डव** | = हे अर्जुन! | **अथो** | = त्यानंतर |
| **एवम्** | = अशाप्रकारे | **येन** | = ज्यामुळे (तत्त्वज्ञानामुळे) | **मयि** | = मज सच्चिदानन्दघन परमात्म्यात |
| **मोहम्** | = मोहाला | **भूतानि** | = (तू) संपूर्ण प्राण्यांना | **द्रक्ष्यसि** | = पाहशील. |

*व्याख्या*— **यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पाण्डव**—पूर्व श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, ते महापुरुष तुला तत्त्वज्ञानाचा उपदेश करतील परंतु उपदेश केवळ ऐकून वास्तविक बोध अर्थात् स्वरूपाचा यथार्थ अनुभव होत नाही ''**श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित्**'' (२।२९) आणि वास्तविक बोधाचे वर्णनही कोणी करू शकत नाही. कारण वास्तविक बोध करणनिरपेक्ष आहे अर्थात् मन, वाणी इत्यादीहून पर आहे. म्हणून वास्तविक बोध स्वद्वाराच स्वला होत असतो आणि हे तेव्हा होते जेव्हा मनुष्य आपल्या विवेका (जड-चेतनाच्या भेदाचे ज्ञान) ला महत्त्व देतो. विवेकाला महत्त्व दिल्याने जेव्हा अविवेक नष्ट होतो तेव्हा हा विवेकच वास्तविक बोधात परिणत होतो आणि जडतेशी संबंध-विच्छेद करवितो. वास्तविक बोध झाल्यास मग कधी मोह होत नाही.

गीतेच्या पहिल्या अध्यायात अर्जुनाचा मोह प्रगट होतो की, युद्धामध्ये सर्व कुटुंबीय, सगे सोयरे, लोक मरतील तर त्यांना पिंड आणि पाणी देणारा कोण राहील? पिंड आणि पाणी न दिल्याने ते नरकात जातील. जे जिवंत राहतील त्या स्त्रीया आणि मुलांचा निर्वाह आणि पालन कोण करील? इत्यादी इत्यादी. तत्त्वज्ञान झाल्यानंतर असा मोह राहत नाही. बोध झाल्यावर जेव्हा संसाराशी मी माझेपणाचा संबंध राहत नाही तेव्हा पुन: मोह होण्याचा प्रश्नच उद्भवत नाही.

**येन भूतान्यशेषेण द्रक्षस्यात्मनि**—तत्त्वज्ञान होताच असा अनुभव होतो की, माझी सत्ता सर्वत्र परिपूर्ण आहे आणि त्या सत्तेच्या अंतर्गतच अनंत ब्रह्मांड आहेत. जसे स्वप्नातून जागा झालेला मनुष्य स्वप्न सृष्टीला आपल्यातच पाहतो, तसेच तत्त्वज्ञान झाल्यावर मनुष्य संपूर्ण प्राणी (जगत्) मात्राना आपल्यातच पाहतो. सहाव्या अध्यायाच्या एकोणतीसाव्या श्लोकात आलेल्या ''**सर्वभूतानि चात्मनि**'' पदानेही याच स्थितीचे वर्णन केले गेले आहे.

**अथो मयि**—तत्त्वज्ञान प्राप्त करण्याची जी प्रचलित प्रक्रिया आहे, त्यानुसार भगवान् म्हणत आहेत की, गुरूकडून विधीपूर्वक (श्रवण, मनन, निदिध्यासनपूर्वक) तत्त्वज्ञान प्राप्त झाल्यावर साधक प्रथम आपल्या स्वरूपामध्ये संपूर्ण प्राण्यांना

पाहतो. हा ''**त्वम्**'' पदाचा अनुभव झाला. मग स्वरूपाला तसेच संपूर्ण प्राण्यांना एका सच्चिदानंदघन परमात्म्यामध्ये पाहतो. हा ''**तत्**'' पदाचा अनुभव झाला. याप्रमाणे त्याला प्रथम ''**त्वम्**'' (स्वरूप) चा आणि नंतर ''**तत्**'' (परमात्मतत्व) शी ''**त्वम्**'' च्या ऐक्याचा अनुभव होतो. एक ब्रह्मच ब्रह्म शेष राहते. अशा अवस्थेत द्रष्टा, दर्शन आणि दृश्य हे तिन्हीही राहत नाहीत. परंतु लोकांच्या दृष्टीने त्याचे आपले म्हणविले जाणारे अंत:करण यात जो भाव दिसतो त्याला गृहीत धरूनच भगवान् म्हणतात की, तो सर्वांना माझ्यात पाहतो.

स्थूल दृष्टीने समुद्र आणि लाटेत वेगळेपणा दिसतो. लाटा समुद्रातच निर्माण होतात आणि त्यातच विलीन होत राहतात. परंतु सूक्ष्म दृष्टीने पाहिले तर समुद्र आणि लाटांना स्वतंत्र सत्ता नाही. सत्ता केवळ एक जल-तत्त्वाचीच आहे. जल-तत्त्वात समुद्रही नाही आणि लाट-ही नाही. पृथ्वीशी संबंध असल्याने समुद्रही सीमित आहे आणि लाटासुद्धा सीमित आहेत. परंतु जलतत्त्व सीमित नाही. म्हणून समुद्र आणि लाटांना न पाहता एका जल-तत्त्वाला पाहणेच यथार्थ दृष्टी आहे. त्याचप्रमाणे संसाररूपी समुद्र आणि शरीररूपी लाटा ह्यामध्ये वेगळेपणा दिसतो. शरीर संसारामध्येच उत्पन्न आणि नष्ट होतात. परंतु वास्तविक संसार आणि शरीरसमुदायाची स्वतंत्र सत्ता नाही. सत्ता केवळ परमात्मतत्त्वाचीच आहे. परमात्म-तत्त्वात संसारही नाही आणि शरीरही नाही. प्रकृतीशी संबंध असल्याकारणाने संसारसुद्धा सीमित आहे आणि शरीरसुद्धा सीमित आहे. परंतु परमात्मतत्त्व सीमित नाही. म्हणून संसार आणि शरीरांना न पाहता एका परमात्मतत्त्वाला पाहणेच यथार्थ दृष्टी आहे (१३। २७)

**परिशिष्ट भाव**—तत्त्वज्ञान अथवा अज्ञानाचा नाश एकाच वेळी होतो आणि नेहमीसाठी होतो. तात्पर्य हे आहे की, तत्त्वज्ञानाची आवृत्ती होत नाही. त्याचा एक वेळ अनुभव आला की, नेहमीसाठी आला! कारण जर अज्ञानाची स्वतंत्र सत्ताच नाही तर मग पुन्हा अज्ञान कसे होईल? म्हणून नित्य निवृत्त अज्ञानाचीच निवृत्ती होते आणि नित्यप्राप्त तत्त्वाचीच प्राप्ती होते.

स्वयं सत्तामात्र आणि बोधस्वरूप आहे. बोधाचा अनादर केल्याने आपण असत्‌चा स्वीकार केला आणि असत्‌चा स्वीकार केल्याने अविवेक झाला. तात्पर्य असे आहे की, बोधाला विमुख होऊन आपण असत्‌ला सत्ता दिली आणि असत्‌ला सत्ता दिल्यामुळे विवेकाचा अनादर झाला. वास्तविक बोधाचा अनादर केला नाही, तर अनादिकाळापासून अनादर आहे. जर असे मानाल की, आपण बोधाचा अनादर केला तर यावरुन सिद्ध होईल की, पूर्वी बोधाचा आदर होता. म्हणून आता आदर करू तर पुन्हा अनादर होईल. परंतु बोध एक वेळच होतो आणि नेहमीसाठी होतो.

तत्त्वज्ञान झाल्यावर पुन्हा मोह होत नाही, कारण वास्तविक मोह नाहीच. समाप्त तेच होते जे नसते आणि प्राप्त तेच होते जे असते.

जगत् जीवाच्या अंतर्गत आहे आणि जीव परमात्म्याच्या अंतर्गत आहे. म्हणून साधक प्रथम जगताला आपल्यात पाहतो—'**द्रक्ष्यस्यात्मनि**', मग आपणाला परमात्म्यात पाहतो—'**अथोमयि**'। '**द्रक्ष्यस्यात्मनि**' यात आत्मज्ञान (ज्ञान) आहे आणि '**अथोमयि**' यात परमात्मज्ञान (विज्ञान) आहे. आत्मज्ञानात निजानंद आहे आणि परमात्मज्ञानात परमानंद आहे. लौकिक निष्ठा (कर्मयोग आणि ज्ञानयोग) याने आत्मज्ञानाचा अनुभव होतो आणि अलौकिक निष्ठा (भक्तियोग) याने परमात्मज्ञानाचा अनुभव होतो.

सर्व काही भगवंतच आहेत—अशाप्रकारे समग्राचे ज्ञान 'परमात्मज्ञान' आहे. आत्मज्ञानाने मुक्ती तर होते, परंतु सूक्ष्म अहम्‌चा गंध राहतो, ज्यामुळे दार्शनिकांत आणि त्यांच्या दर्शनांत मतभेद राहतो. जर सूक्ष्म अहम्‌चा गंध नसेल तरमग मतभेद कशाला होईल? परंतु परमात्मज्ञानाने सूक्ष्म अहम्‌चा गंधही राहत नाही आणि त्यापासून उत्पन्न होणारे संपूर्ण दार्शनिक मतभेद समाप्त होतात. तात्पर्य हे झाले की, जोपर्यंत '**आत्मनि**' आहे, तोपर्यंत दार्शनिक मतभेद आहेत. जेव्हा '**वासुदेवः सर्वम्**' चा अनुभव झाल्यावर सर्व मतभेद समाप्त होतात, तेव्हा '**अथोमयि**' होते. '**अथोमयि**' यात एका परमात्म्याशिवाय दुसरी कोणती सत्ता राहत नाही.

## अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः।
## सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं सन्तरिष्यसि॥ ३६॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **चेत्** | = जरी (तू) | **असि** | = असशील, (तरीही तू) | **सर्वम्** | = संपूर्ण |
| **सर्वेभ्यः** | = सर्व | | | **वृजिनम्** | = पाप-समुद्रातून |
| **पापेभ्यः, अपि** | = पाप्यांतही | **ज्ञानप्लवेन** | = ज्ञानरूपी नौकाद्वारा | **सन्तरिष्यसि** | = उत्तम प्रकारे तरून जाशील. |
| **पापकृत्तमः** | = अधिक पापी | **एव** | = नि:संदेह | | |

*व्याख्या*—**अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः**—पाप करणाऱ्यांच्या तीन श्रेण्या असतात—(१) "पापकृत" अर्थात् पाप करणारा (२) "पापकृत्तर" अर्थात् दोन पाप्यात एकापेक्षा अधिक पाप करणारा आणि (३) "पापकृत्तम" अर्थात् संपूर्ण पाप्यात सर्वात अधिक पाप करणारा. या ठिकाणी "**पापकृत्तमः**" पदाचा प्रयोग करून भगवान् म्हणतात की, जर तू संपूर्ण पाप्यांमध्येही अत्यंत पाप करणारा असशील तरीही तू तत्त्वज्ञानाने संपूर्ण पापापासून तरून जाऊ शकतोस. भगवंताचे असे म्हणणे फारच आश्वासन देणारे आहे. तात्पर्य जो पापांचा त्याग करून साधनेमध्ये तत्पर झाला आहे तर त्याचेविषयी काही प्रश्नच नाही. परंतु ज्याने पूर्वी पुष्कळ पाप केले असेल, त्यालाही जिज्ञासा जागृत झाल्यावर त्याने आपल्या उद्धाराविषयी कधीही निराश होऊ नये. कारण पाप्यातला-पापी मनुष्य सुद्धा जर इच्छिल तर याच जन्मात आत्ता आपले कल्याण करून घेऊ शकतो. पूर्वीची पापे इतकी बाधक नसतात जितकी वर्तमानातली पापे बाधक असतात. जर मनुष्य वर्तमानकाळात पाप करण्याचा त्याग करेल आणि निश्चय करेल की, आता मी कधीही पाप करणार नाही आणि केवळ तत्त्वज्ञान प्राप्त करून घेईल तर त्याच्या पापाचा नाश होण्याला मुळीच वेळ लगणार नाही.

जर एखाद्या ठिकाणी शंभर वर्षापासून काळाकुट्ट असा अंधार पडलेला असेल आणि तेथे दिवा लावला तर त्या अंधाराला नाहीसे करून प्रकाश करण्यात दिव्याला शंभर वर्ष लागत नाहीत तर दिवा लावला की तात्काळ अंधार नष्ट होतो.

त्याचप्रमाणे तत्त्वज्ञान होताच पूर्वी केली गेलेली संपूर्ण पापे तात्काळ नाश होतात.

**चेत्**—(जर) पद देण्याचे तात्पर्य बहुतांशी अशी पापी माणसे परमात्म्यामध्ये लागत नाहीत. परंतु ते परमात्म्यात लागू शकत नाहीत अशी गोष्ट नाही. एखाद्या महापुरुषाच्या संगतीने अथवा एखादी घटना, परिस्थिती, वातावरण इत्यादीच्या प्रभावाने जर त्यांचा असा दृढ निश्चय झाला की, आता परमात्मतत्त्वाचे ज्ञान प्राप्त करून घ्यावयाचेच आहे तर तेही संपूर्ण पाप-समुद्रातून चांगल्याप्रकारे तरून जातात.

नवव्या अध्यायाच्या तीस-एकतीसाव्या श्लोकातही भगवंतांनी अशीच गोष्ट अनन्यभावाने आपले भजन करणाऱ्या विषयी सांगितली आहे की, महान् दुराचारी मनुष्यसुद्धा जर हा निश्चय करेल की, आता मी भगवंताचे भजनच करीन, तर त्याचेही फार लवकर कल्याण होते.

**सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं सन्तरिष्यसि**—प्रकृतीचे कार्य शरीर आणि संसाराच्या संबंधानेच संपूर्ण पापे होतात. तत्त्वज्ञान झाल्यावर जेव्हा यांच्याशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद होतो तेव्हा पाप कसे राहू शकतील? "**मूलाभावे कुतः शाखा**"?

परमात्म्याच्या स्वत:सिद्ध ज्ञानाशी एक होणेच "**ज्ञानप्लव**" अर्थात् ज्ञानरूप नौकेचे प्राप्त होणे आहे. मनुष्य कितीही पापी का असेना ज्ञानरूप नौकेने तो संपूर्ण पाप-समुद्रातून चांगल्या प्रकारे तरून जातो. ही ज्ञानरूपी नौका कधी तुटत-फुटत नाही. यात कधी छिद्र पडत नाही आणि ही कधी बुडत नाही. ही मनुष्याला पाप-समुद्रातून पैलतीरी नेते.

"ज्ञानयज्ञा" (४।३३) नेच ही ज्ञानरूपी नौका प्राप्त होते. हा "ज्ञानयज्ञ" आरंभापासून विवेकाच्या तत्त्वावर चालतो आणि "तत्त्वज्ञानात" याची पूर्णता होते. पूर्णता झाल्यावर लेशभरसुद्धा पाप राहत नाही.

**परिशिष्ट भाव**—येथे भगवंताने '**पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः**' पदांनी पाप्याची शेवटची हद्द दाखविली आहे! जरी '**पापेभ्यः**' पद बहुवचन असल्याने संपूर्ण पाप्यांचा वाचक आहे, तरीही भगवंताने याच्याबरोबर '**सर्वेभ्यः**' पद दिले. '**सर्वेभ्यः**' पदही संपूर्णाचा वाचक आहे. हे दोन पद देऊनही भगवंताने '**पापकृत्तमः**' पद याशिवाय दिले आहे, जे अतिशयतेचे बोधक आहे. प्रथम 'पापकृत' असतो मग 'पापकृत्तर' होतो आणि त्यानंतर 'पापकृत्तम' होतो. तात्पर्य हे निघाले की, संपूर्ण संसारात जितके काही पापी होऊ शकतात, त्या संपूर्ण पाप्यांपेक्षाही जो अत्यधिक पापी आहे, त्यालाही ज्ञान प्राप्त होऊ शकते. कारण पापे कितीही का असेनात, ते असतात असत्च. परंतु ज्ञान सत् आहे. सत्च्या पुढे असत् कसे टिकाव धरू शकते? पाप अपवित्र आहे, परंतु ज्ञान परमपवित्र आहे (गीता—याच अध्यायाचा अडतीसावा श्लोक). अपवित्र वस्तू पवित्र वस्तूला अटकाव कशी करू शकते! म्हणून पापांत ज्ञानाला अटकाव करण्याची ताकत नाही. ज्ञान प्राप्तीत खास बाधा आहे—नाशवान् सुखांची आसक्ती (गीता—तीसऱ्या अध्यायाच्या सदतीसाव्यापासून एकेचाळीसाव्या श्लोकापर्यंत). भोगासक्तीमुळेच मनुष्याची पारमार्थिक विषयात आवड होत नाही आणि आवड नसल्यानेच ज्ञानाची प्राप्ती फार कठीण प्रतीत होते.

**यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन।**
**ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा॥ ३७॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अर्जुन** | = हे अर्जुन! | **एधांसि** | = ईंधनांना | **ज्ञानाग्निः** | = ज्ञानरूपी अग्नी |
| **यथा** | = जसे | **भस्मसात्** | = संपूर्णपणे भस्म | **सर्वकर्माणि** | = संपूर्ण कर्मांना |
| **समिद्धः** | = प्रज्वलित | **कुरुते** | = करतो | **भस्मसात्** | = संपूर्णपणे भस्म |
| **अग्निः** | = अग्नी | **तथा** | = तसेच | **कुरुते** | = करतो. |

*व्याख्या*— **यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात् कुरुतेऽर्जुन**—मागील श्लोकात भगवंतांनी ज्ञानरूपी नौकेच्या द्वारा पाप-समुद्रातून तरून जाण्याविषयी म्हटले. त्यातून हा एक प्रश्न निर्माण होतो की, पाप-समुद्र तर शिल्लक राहतो. तर मग त्याचे काय होते? म्हणून पुनः भगवान् दुसरा दृष्टांत देऊन म्हणतात की, जसे प्रज्वलित अग्नी काष्टादी संपूर्ण इंधनाला अशा प्रकारे भस्म करतो की, त्याचा किंचित्मात्र-सुद्धा अंश शिल्लक राहत नाही. तसेच ज्ञानरूपी अग्नी संपूर्ण पापांना अशा प्रकारे भस्म करतो की, त्याचा किंचित्मात्र अंशही शिल्लक राहत नाही.

**ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा**—जसे अग्नी काष्ठाला भस्म करून टाकतो तसेच तत्त्वज्ञानरूपी अग्नी संचित, प्रारब्ध आणि क्रियमाण तिन्ही कर्मांना भस्म करून टाकतो. जसे अग्नीत काष्ठाचा अत्यंत अभाव होतो तसेच तत्त्वज्ञानामध्ये संपूर्ण कर्मांचा अत्यंत अभाव होतो. तात्पर्य ज्ञान झाल्यावर कर्माशी अथवा संसाराशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद होतो. संबंध-विच्छेद झाल्याने संसाराच्या स्वतंत्र सत्तेचा अनुभव येत नाही तर एक परमात्मतत्त्वच शिल्लक राहते.

वास्तविक एकूण क्रिया प्रकृतीद्वाराच होतात (१३।२९) त्या क्रियेशी आपला संबंध मानल्याने कर्म होतात. नाडीमध्ये रक्त प्रवाह होणे, शरीराचे अवस्थांतर (बाल्यावस्थेतून तरुण होणे). श्वासोच्छ्वास, अन्नपचन इत्यादी क्रिया ज्या समष्टी प्रकृतीकडून होतात. त्याच प्रकृतीकडून खाणे-पिणे, चालणे, बसणे, पाहणे, बोलणे इत्यादी क्रियाही होतात. परंतु अज्ञानाने मनुष्य त्या क्रियाशी आपला संबंध मानतो अर्थात् आपल्याला त्या क्रियांचा कर्ता मानतो. त्यामुळे त्या क्रिया "कर्म" होऊन मनुष्याला बंधनात टाकतात. अशाप्रकारे मानलेल्या संबंधानेच कर्म होतात नाहीतर क्रियाच होतात.

तत्त्वज्ञान झाल्यावर अनेक जन्मांचे संचित कर्म संपूर्णपणे नष्ट होतात. कारण सर्व संचित कर्म अज्ञानाच्या आश्रयाने राहतात. म्हणून ज्ञान होताच (आश्रय, आधाररूपी अज्ञान न राहिल्याने) ते नष्ट होतात. तत्त्वज्ञान झाल्यावर कर्तृत्वाभिमान राहत नाही. म्हणून सर्व क्रियमाण कर्म अकर्म होतात अर्थात् फलजनक होत नाहीत. प्रारब्ध कर्माचा घटना-अंश (अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती) तर जोपर्यंत शरीर असते तोपर्यंत राहतो. परंतु ज्ञान्यावर त्याचा काहीही परिणाम होत नाही. कारण तत्त्वज्ञान झाल्यावर भोक्तृत्व राहत नाही. म्हणून अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती प्राप्त झाली असता तो सुखी-दु:खी होत नाही. अशा प्रकारे तत्त्वज्ञान झाल्यावर संचित, प्रारब्ध आणि क्रियमाण तिन्ही कर्माशी किंचित्मात्रही संबंध राहत नाही. कर्माशी आपला संबंध न राहिल्याने कर्म राहत नाहीत, भस्म होते अर्थात् सर्व कर्म अकर्म होतात.

*संबंध— आता भगवान् पुढील श्लोकाच्या पूर्वार्धात तत्त्वज्ञानाचा महिमा वर्णन करून उत्तरार्धात कर्मयोगाचे विशेष महत्त्व प्रगट करतात.*

## न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।
## तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दति॥ ३८॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **इह** | = या मनुष्यलोकी | **न विद्यते** | = नाही | **तत्** | = त्या तत्त्वज्ञानाला |
| **ज्ञानेन, सदृशम्** | = ज्ञानासमान | **योगसंसिद्धः** | = ज्याचा योग उत्तम प्रकारे सिद्ध झाला आहे (तो कर्मयोगी) | **कालेन** | = आवश्यच |
| **पवित्रम्** | = पवित्र करणारे | | | **स्वयं** | = स्वत: |
| **हि** | = नि:संदेह (दुसरे कोणते साधन) | | | **आत्मनि** | = आपण-आपल्यात |
| | | | | **विन्दति** | = प्राप्त करून घेतो. |

*व्याख्या*— **न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते**— याठिकाणी "**इह**" पद मनुष्यलोकाचा वाचक आहे. कारण संपूर्ण पवित्रता या मनुष्यलोकातच प्राप्त केली जाते. पवित्रता प्राप्त करण्याचा अधिकार आणि अवसर मनुष्य-शरीरामध्येच आहे. असा अधिकार कोण्या दुसऱ्या शरीरात नाही. वेगवेगळ्या लोकांचे अधिकारही मनुष्य लोकातूनच मिळतात.

संसाराच्या स्वतंत्र सत्तेला मानल्याने तसेच त्याच्या-

पासून सुख घेण्याच्या इच्छेनेच संपूर्ण दोष, पाप उत्पन्न होतात. (३।३७) तत्त्वज्ञान झाल्यावर जेव्हा संसाराची स्वतंत्र सत्ताच राहत नाही तेव्हा सर्व पापांचा संपूर्णपणे नाश होतो आणि महान् पवित्रता येते. म्हणून संसारात ज्ञानासारखे पवित्र करणारे दुसरे कोणतेही साधन नाहीच.

संसारामध्ये यज्ञ, दान, तप, पूजा, व्रत, उपवास, जप, ध्यान, प्राणायाम इत्यादी जितकी म्हणून साधने आहेत, तसेच गंगा, यमुना, गोदावरी इत्यादी जितकी तीर्थ आहेत ती सर्वच मनुष्याच्या पापाचा नाश करून त्याला पवित्र करणारी आहेत. परंतु त्या सर्वातही तत्वज्ञानासारखे पवित्र करणारे कोणतेही साधन, तीर्थ नाही कारण ती सर्व तत्त्वज्ञानाची साधने आहेत आणि तत्त्वज्ञान त्या सर्वांचे साध्य आहे.

परमात्मा पवित्राती पवित्र आहेत "**पवित्राणां पवित्रम्**" (विष्णूसहस्त्र॰ १०) त्याच परम पवित्र परमात्म्याचा अनुभव करविणारा असल्याने तत्त्वज्ञानसुद्धा अत्यंत पवित्र आहे.

**योगसंसिद्धः**—ज्याचा कर्मयोग सिद्ध झाला आहे अर्थात् कर्मयोगाचे अनुष्ठान सांगोपांग पूर्ण झाले आहे. त्या महापुरुषाला येथे "**योगसंसिद्धः**" म्हटले आहे. सहाव्या अध्यायाच्या चौथ्या श्लोकात त्यालाच "**योगारूढः**" म्हटले आहे. योगारूढ होणे कर्मयोगाची अंतिम अवस्था आहे. योगारूढ होताच तत्त्वबोध होतो, तत्त्वबोध झाल्यावर संसाराशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद होतो.

कर्मयोगाचे मुख्य तत्त्व, आपले काहीही न समजता संपूर्ण कर्म संसाराच्या हितासाठीच करणे, आपल्यासाठी काहीही न करणे, हे आहे. असे केल्याने सामुग्री आणि क्रियाशक्ती—दोन्हींचा प्रवाह संसाराच्या सेवेमध्ये होतो. संसाराच्या सेवेत प्रवाह झाल्यावर "मी सेवक आहे" असा (अहम्चा) भावसुद्धा राहत नाही अर्थात् सेवक राहत नाही केवळ सेवा राहते. अशा प्रकारे सेवक सेवा होऊन सेव्यामध्ये लीन होतो. तेव्हा प्रकृतीचे कार्य शरीर तसेच संसाराशी संपूर्णपणे वियोग (संबंध-विच्छेद) होतो. वियोग झाल्यावर संसाराची स्वतंत्र सत्ता राहत नाही, केवळ क्रिया राहते. यालाच योगाची संसिद्धी अर्थात् सम्यक् सिद्धी म्हणतात.

कर्म आणि फलाच्या आसक्तीनेच "योगा" चा अनुभव येत नाही. वास्तविक कर्म आणि पदार्थांशी संबंध-विच्छेद स्वत:सिद्ध आहे. कारण कर्म आणि पदार्थ तर अनित्य (आदि-अन्त असणारे) आहेत आणि आपले स्वरूप नित्य आहे. अनित्य कर्मांने नित्य स्वरूपाला काय मिळू शकते? म्हणून स्वरूपाला कर्माद्वारा काही मिळवायचे नाही. हे "कर्मविज्ञान" आहे. कर्मविज्ञानाचा अनुभव झाल्यावर कर्मफलाशीसुद्धा संबंध-विच्छेद होतो अर्थात् कर्मजन्य सुख घेण्याची आसक्ती संपूर्णपणे समाप्त होते, जी समाप्त होताच परमात्म्याशी असलेला आपल्या स्वाभाविक नित्य संबंधाचा अनुभव येतो, जे "योगविज्ञान" आहे. योगविज्ञानाचा अनुभव होणेच योगाची संसिद्धी आहे.

**तत्स्वयं कालेनात्मनि विन्दति**—ज्या तत्त्वज्ञानाने संपूर्ण कर्म भस्म होतात आणि ज्याच्यासारखे पवित्र करणारे संसारामध्ये दुसरे कोणतेच साधन नाही, त्याच तत्त्वज्ञानाला कर्मयोगी योगसंसिद्ध झाल्यावर दुसऱ्या कोण्या साधना-शिवाय स्वतः आपले आपणातच तात्काळ प्राप्त करून घेतो.

चौतीसाव्या श्लोकात भगवंतांनी सांगितले होते की, प्रचलित प्रणालीनुसार कर्माचा त्याग करून गुरूंजवळ गेल्यावर ते तत्त्वज्ञानाचा उपदेश करतील—"**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानम्**". गुरू तर उपदेश देतील परंतु त्यामुळे तत्त्वज्ञान होईलच असे काही निश्चित सांगता येत नाही. तरीही भगवंत याठिकाणी सांगत आहेत की, कर्मयोगाच्या प्रणालीने कर्म करणाऱ्या मनुष्याला योगसंसिद्धी मिळाल्यावर तत्त्वज्ञान होतेच.

उपर्युक्त पदांत आलेले "**कालेन**" पद विशेष ध्यान देण्यासारखे आहे. भगवंतांनी व्याकरणाच्या दृष्टीने "**कालेन**" पद तृतियेमध्ये प्रयुक्त करून हे दाखविले आहे की, कर्मयोगाने अवश्यच तत्त्वज्ञान अथवा परमात्मतत्त्वाचा अनुभव होतो.*

"**स्वयम्**" पद देण्याचे तात्पर्य तत्त्वज्ञानाला प्राप्त करण्यासाठी कर्मयोग्याला एखाद्या गुरूंची, ग्रंथाची अथवा दुसऱ्या कोणत्याहि साधनाची अपेक्षा नाही. कर्मयोगाच्या विधीने कर्तव्यकर्म करीत असतानाच त्याला आपोआप तत्त्वज्ञान प्राप्त होईल.

**आत्मनि विन्दति**—या पदाचे तात्पर्य तत्त्वज्ञानाला

---

* "कालेन" या शब्दात "कालाध्वनोरत्यन्तसंयोगे" (पाणिनिसूत्र २।३।५) यापासून प्राप्त द्वितीया विभक्तीचा निषेध करून "अपवर्गे तृतिया" (तेच २।३।६). यापासून तृतीया विभक्ती झाली आहे. तृतीयाविभक्ती तेथेच होते जेथे अवश्य फल प्राप्तीचे अर्थात् अवश्य कार्य होण्याचे द्योतन होते. परंतु जेथे द्वितीया विभक्ति होते तेथे अवश्य फलप्राप्तीचे द्योतन होत नाही. जसे "मासम् अधीते" पद द्वितीयामध्ये प्रयुक्त होते तर याचा अर्थ असा आहे की, एक महिन्यातही पूर्ण शिकू शकलो नाही परंतु हेच पद जर "मासेन अधीते" अशा प्रकारे तृतीयामध्ये प्रयुक्त होते तेव्हा याचा अर्थ एका महिन्यात पूर्ण शिकलो. त्याचप्रमाणे भगवंतांनी येथे द्वितीयामध्ये "कालम्" पद न देता तृतीयामध्ये "कालेन" पद दिले आहे. ज्यामुळे असा अर्थ निघतो की, कर्मयोगाने अवश्य फलप्राप्ती (सिद्धी) होते.

प्राप्त करण्यासाठी कर्मयोग्याला कोण्या दुसऱ्या ठिकाणी जाण्याची जरूरी नाही. कर्मयोग सिद्ध झाल्यावर त्याला आपोआपच स्वत: सिद्ध तत्त्वज्ञानाचा अनुभव होतो.

परमात्मा सर्व ठिकाणी परिपूर्ण असल्याने आपल्यात-ही आहेत. जेव्हा साधक "मी आहे" रूपाने आपण-आपल्याला मानतो तेथेच परमात्मा विराजमान आहेत. परंतु परमात्म्याशी विमुख होऊन संसाराशी आपला संबंध मानल्याने आपले-आपणात स्थित असलेल्या परमात्म्याचा अनुभव येत नाही. कर्मयोगाचे योग्य रीतीने अनुष्ठान केल्याने जेव्हा संसाराशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद होतो अर्थात् संसाराशी तादात्म्य, ममता आणि कामना समाप्त होतात तेव्हा त्याला आपले-आपणातच तत्त्वाचा सुखपूर्वक अनुभव होतो— "**निर्द्वन्द्वो हि महाबाहो सुखं बन्धात्प्रमुच्यते**" (५ । ३)

परमात्मतत्त्वाचे ज्ञान करणनिरपेक्ष आहे. म्हणून त्याचा अनुभव आपले-आपणातच होऊ शकतो, इंद्रिय, मन, बुद्धी इत्यादी करणांनी नव्हे. साधक कोणत्याही उपायाने तत्त्वाला जाणण्याचा प्रयत्न करेना का परंतु शेवटी तो आपले-आपणातच तत्त्वाला जाणेल. श्रवण, मनन इत्यादी साधने तत्त्वज्ञान प्राप्तीच्या मार्गातील असंभावना, विपरीत भावना इत्यादी ज्ञानमार्गात येणाऱ्या बाधांना दूर करणारी परंपरागत साधने मानली जाऊ शकतात. परंतु बोध वास्तविक आपले-आपणातच होत असतो. कारण मन, बुद्धी इत्यादी सर्व जड आहेत. जडाद्वारा त्या चिन्मय तत्त्वाला कसे जाणता येणे शक्य आहे ? जे जडाहून पूर्णपणे अतीत आहे. वास्तविक तत्त्वाचा अनुभव जडाशी संबंध-विच्छेद झाल्याने होत असतो जडाद्वारा नव्हे. जसे डोळ्यांनी संसाराला तर पाहता येणे शक्य आहे परंतु डोळ्यांनी डोळ्यांना पाहता येणे शक्य नाही. परंतु हे म्हणता येणे शक्य आहे की, ज्याने पाहतो तेच डोळे आहेत. त्याचप्रमाणे जो सर्वांना जाणतो त्याला कशाने जाणले जाऊ शकते ?"**विज्ञातारमरे केन विजानीयात्**" (बृहदारण्यक २ । ४ । १४) ? परंतु ज्याच्यामुळे संपूर्ण वस्तूंचे ज्ञान होते तेच परमात्मतत्त्व आहे.

## विशेष गोष्ट

या अध्यायाच्या तेहतीसाव्यापासून सदतीसाव्या श्लोकापर्यंत भगवंतांनी ज्ञानाची जी प्रशंसा केली आहे त्यावरुन ज्ञानयोगाचे विशेष माहात्म्य लक्षात येते. परंतु वास्तविक पाहता त्याला ज्ञानयोगाचाच महिमा समजणे उचित वाटत नाही. सखोल विचार केला तर यात अर्जुना-प्रति भगवंताचा एक गूढ अभिप्राय प्रतीत होत आहे की, जे तत्त्वज्ञान इतके महान् आणि पवित्र आहे तसेच ज्या ज्ञानाला प्राप्त करण्यासाठी मी तुला तत्त्वदर्शी महापुरुषाकडे जाण्याची आज्ञा देत आहे त्या ज्ञानाला तू स्वत: कर्मयोगाद्वारा अवश्य प्राप्त करू शकतोस. "**तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दति**" (४ । ३८) अशाप्रकारे ज्ञानयोगाच्या प्रशंसेचे हे श्लोक वास्तविक प्रकारान्तराने कर्मयोगाची विशेषता, माहात्म्य सांगण्यासाठी आहेत. भगवंताचा अभिप्राय हा नव्हता की, अर्जुनाने ज्ञानी महात्म्याकडे जाऊन ज्ञान प्राप्त करावे. भगवंताचा अभिप्राय असा होता की, जे ज्ञान इतक्या दुर्लभतेने ज्ञान्यांच्याजवळ राहून त्यांची सेवा करून आणि विनयपूर्वक प्रश्नोत्तर करून तसेच त्यानुसार श्रवण, मनन, आणि निदिध्यासन करून प्राप्त होईल तेच ज्ञान तुला कर्मयोगाच्या विधीने, प्राप्त कर्तव्यकर्मा (युद्ध) चे पालन केल्यानेच प्राप्त होईल. ज्या तत्त्वज्ञानासाठी मी तुला तत्त्वदर्शी महापुरुषाकडे जाण्याची प्रेरणा केली आहे त्यांच्याकडे ते तत्त्वज्ञान तुला प्राप्त होईलच हे काही निश्चित नाही. कारण ज्या पुरुषाकडे जाशील, तो तत्त्वदर्शी असेलच हे कशावरुन ? आणि त्या महापुरुषाविषयी श्रद्धेची उणीवही राहू शकते. दुसरी गोष्ट या प्रक्रियेत प्रथम संपूर्ण प्राण्यांना आपल्यामध्ये तू पाहशील आणि त्यानतंर संपूर्ण प्राण्यांना एका परमात्मतत्त्वात पाहशील (४ । ३५). अशा प्रकारे ज्ञान प्राप्त करण्याच्या प्रक्रियेमध्ये संशय तसेच विलंबाची शक्यता आहे. परंतु कर्मयोगद्वारा इतर पुरुषाच्या अपेक्षेशिवाय अवश्यमेव आणि तात्काळ त्या तत्त्वज्ञानाचा अनुभव होतो. म्हणून मी तुझ्यासाठी कर्मयोगच योग्य समजतो. म्हणून तुला प्रचलित प्रणालीनुसार ज्ञानाचा उपदेश मी करणार नाही.

भगवान् तर महापुरुषाचे ही महापुरुष आहेत. म्हणून ते अर्जुनाला कोण्या दुसऱ्या महापुरुषाजवळ जाऊन ज्ञान शिकण्यासाठी कसे म्हणू शकतील ? पुढे याच अध्यायाच्या एक्केचाळीसाव्या श्लोकात भगवंतांनी कर्मयोगाची प्रशंसा करून बेचाळीसाव्या श्लोकात भगवान् अर्जुनाला समतेमध्ये स्थित होऊन युद्ध करण्याची स्पष्ट रीतीने आज्ञा करतात.

**परिशिष्ट भाव—'पवित्रमिह'**—अपवित्रता संसाराच्या संबधाने येते. तत्त्वज्ञान झाल्यावर जेव्हा संसाराचा अत्यंत अभाव होतो, तेव्हा अपवित्रता राहण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. म्हणून ज्ञानात किंचिन्मात्रही अपवित्रता, जडता विकार नसतात.

'**इह**' पद 'लोक' याचा वाचक आहे. तात्पर्य हे आहे की, तत्त्वज्ञान लौकिक आहे, परंतु परमात्मज्ञान अलौकिक आहे.

***संबंध***—*आता भगवान् पुढील श्लोकात ज्ञानप्राप्तीच्या पात्राचे निरूपण करतात.*

## श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः।
## ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति॥ ३९॥

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **संयतेन्द्रियः** | = | (जो) जितेंद्रिय (तसेच) | **ज्ञानम्** | = | ज्ञानाला | **अचिरेण** | = | तात्काळ |
| **तत्परः** | = | साधन-परायण आहे (असा) | **लभते** | = | प्राप्त होतो (आणि) | **पराम्** | = | परम |
| | | | **ज्ञानम्** | = | ज्ञानाला | **शान्तिम्** | = | शांतीला |
| **श्रद्धावान्** | = | श्रद्धावान् मनुष्य | **लब्ध्वा** | = | प्राप्त होऊन (जो) | **अधिगच्छति** | = | प्राप्त होतो |

***व्याख्या*— तत्परः संयतेन्द्रियः**—या श्लोकात श्रद्धावान् पुरुषाला ज्ञान प्राप्त होण्याविषयी गोष्ट आली आहे. आपल्यात श्रद्धा कमी असतानाही मनुष्य भ्रमाने आपल्याला अधिक श्रद्धावान् मानू शकतो. म्हणून भगवंताने श्रद्धा ओळखण्यासाठी दोन विशेषणे दिली आहेत—"**संयतेन्द्रियः**" आणि "**तत्परः**"

ज्याची इंद्रिये संपूर्णपणे वश आहेत तो "**संयतेन्द्रियः**" आहे आणि जो आपल्या साधनामध्ये तत्परतेने लागला आहे तो "**तत्परः**" आहे. साधनेत तत्परतेची कसोटी आहे—इंद्रियांचे संयत होणे. जर इंद्रिये संयत नसतील आणि विषय-भोगाकडे जात असतील तर साधनपरायणतेमध्ये उणीव समजली पाहिजे.

**श्रद्धावाँल्लभते ज्ञानम्**—परमात्म्यामध्ये, महापुरुषामध्ये, धर्मामध्ये आणि शास्त्रामध्ये प्रत्यक्षाप्रमाणे आदरपूर्वक विश्वास असणे ह्याला श्रद्धा म्हणतात. जोपर्यंत परमात्म-तत्त्वाचा अनुभव नाही तोपर्यंत परमात्म्यात प्रत्यक्षाहूनही अधिक विश्वास असला पाहिजे. वास्तविक परमात्म्यापासून देश, काल इत्यादीचे अंतर नाही. केवळ मानलेले अंतर आहे. अंतर समजल्यामुळेच परमात्मा सर्वत्र विद्यमान असूनही अनुभवामध्ये येत नाहीत. म्हणून "परमात्मा आपल्यामध्ये आहेत" असे समजण्याचेच नाव "श्रद्धा" आहे. व्यक्ती कशीही का असेना जर तो केवळ परमात्म्यालाच प्राप्त करू इच्छित असेल आणि "परमात्मा आपल्यामध्ये आहेत" अशी श्रद्धा असणारी असेल तर तिला अवश्य परमात्मतत्त्वाचे ज्ञान होते.

संसार प्रत्येक क्षणाला जात आहे. एक क्षणही टिकत नाही. त्याची स्वतंत्र सत्ता नाहीच. केवळ परमात्म्याच्या सत्तेनेच तो सत्तावान् दिसतो. अशाप्रकारे संसाराच्या स्वतंत्र सत्तेला न मानता एक परमात्म्याचीच सत्ता मानणे ही श्रद्धा आहे. अशी श्रद्धा झाल्यावर तात्काळ ज्ञान होते.

जोपर्यंत इंद्रिये संयत नसतील आणि साधनात तत्परता नसेल तोपर्यंत श्रद्धेमध्ये उणीव समजली पाहिजे. जर इंद्रिये विषयाकडे जात असतील तर साधनेत तत्परता येत नाही. साधनेत तत्परता नसल्याने, दुसऱ्याची परायणता, दुसऱ्याचा आदर होतो. जोपर्यंत साधनपरायणता नसते तोपर्यंत श्रद्धाही पूर्ण नसते. श्रद्धा पूर्ण नसल्यामुळेच तत्त्वाच्या अनुभवात वेळ लागतो. नाहीतर नित्यप्राप्त तत्त्वाच्या अनुभवामध्ये उशीर लागण्याचे कारणच नाही.

याच अध्यायाच्या चौतीसाव्या श्लोकात भगवंतांनी गुरूंजवळ जाऊन विधीपूर्वक ज्ञान प्राप्त करण्याच्या प्रणालीचे वर्णन करताना तीन साधने सांगितली. प्रणिपात, परिपश्न आणि सेवा. याठिकाणी भगवंतांनी ज्ञान प्राप्त करण्याचे एक साधन सांगितले श्रद्धा. चौतीसाव्या श्लोकात "**उपदेक्ष्यन्ति**" पदाने गुरूंद्वारा केवळ ज्ञानाचा उपदेश करण्याची गोष्ट आली आहे, उपदेशाने ज्ञान प्राप्त होईलच असे त्याठिकाणी म्हटले नाही. परंतु या श्लोकात "**लभते**" पदाने ज्ञान प्राप्त करण्याची गोष्ट आली आहे. तात्पर्य चौतीसाव्या श्लोकात सांगितलेल्या साधनांनी ज्ञान प्राप्त होईल असे निश्चित नाही. परंतु या श्लोकात म्हटलेल्या साधनाने निश्चितरूपाने ज्ञान प्राप्त होते. कारण चौतीसाव्या श्लोकात सांगितलेली साधने बहिरंग असल्यामुळे कपटभावनेने तसेच साधारणभावनेनेही केली जाऊ शकतात. परंतु या श्लोकात सांगितलेले साधन अंतरंग असल्याने कपटभावनेने तसेच साधारणभावनेने केले जाऊ शकत नाही. (१७।३) म्हणून ज्ञानाच्या प्राप्तीत श्रद्धा मुख्य आहे.

असे एक तत्त्व अथवा बोध आहे, ज्याचा अनुभव मला होऊ शकतो आणि आत्ता होऊ शकतो—हीच वास्तविक श्रद्धा आहे. तत्त्वही विद्यमान आहे, मीही विद्यमान आहे आणि तत्त्वाचा अनुभवही करू इच्छितो मग उशीर कसला?

### विशेष गोष्ट

फार मोठ्या आश्चर्याची गोष्ट आहे की, जो नित्य निरंतर विद्यमान राहतो, तो तर प्रिय वाटत नाही आणि जो निरंतरच बदलत आहे, जात आहे, तो संसार प्रिय वाटतो. याचे कारण हेच आहे की, ज्या संसाराची एका क्षणासाठी सुद्धा स्थिती नाही, जो निरंतरच अभावामध्ये जात आहे. त्याला आपण स्थायी मानतो. स्थायी मानल्यामुळेच त्यापासून

स्थायी सुख घेऊ इच्छितो. जे सर्वथा अशक्य आहे.

सुख घेण्यासाठी आपण संसाराशी आपलेपणा करतो, जो कोणत्याही काळात आपला नाही. आपली वस्तू तीच आहे जी आपल्यापासून कधी वेगळी होत नाही आणि जीच्यापासून आम्ही कधी वेगळे होऊ शकत नाही. जर संसार आपला असता तर प्रत्येक परिस्थिती आपल्याबरोबर राहिली असती. परंतु परिस्थितीही आपल्याबरोबर राहत नाही आणि आपणही परिस्थितीबरोबर राहत नाही. म्हणून तो संसार आपला नाहीच. ज्या अंत:करण आणि इंद्रियांनी आपण संसाराला पाहतो. त्यांनाही आपण भ्रमाने आपली मानतो. परंतु यांच्यावरही आपला काहीही अधिकार चालत नाही. अंत:करण आणि इंद्रियासह संपूर्ण संसार प्रलयाकडे जात आहे. त्याची स्थिती नाहीच.

संसाराची केवळ प्रतीती असते म्हणून त्याची प्राप्ती कधी होऊच शकत नाही. संसार आपल्या स्वरूपापर्यंत पोहचूच शकत नाही. परंतु स्वरूप सर्व ठिकाणी सत्तारूपाने विद्यमान आहे. संसाराचे स्वतंत्र अस्तित्व नाही. परंतु आपले अस्तित्व नित्य निरंतर राहते. स्वरूपाचा अर्थात् आपल्या अस्तित्वाचा प्रत्यक्ष अनुभव येतो. स्वरूप अपरिवर्तनशील आहे. जर ते परिवर्तनशील असते तर संसाराच्या परिवर्तनाला कोणी पाहिले असते? आपल्याला जसा संसाराच्या निरंतर परिवर्तनचा आणि अभावाचा अनुभव होतो. तसे आपल्या परिवर्तनाचा आणि अभावाचा अनुभव कधीही येत नाही. असे असतानासुद्धा परिवर्तनशील शरीराशी आपले तादात्म्य करून त्याच्या परिवर्तनाला अज्ञानाने आपले परिवर्तन मानतो. शरीराशी संबंध मानून शरीराच्या अवस्थेला आपली अवस्था मानतो. विचार करा की, जर शरीराच्या अवस्थेशी आपण एक असतो तर अवस्था निघून गेल्यावर आपणही गेलो असतो. यावरुन सिद्ध होते की, जाणारी अवस्था दुसरी आहे आणि आपण दुसरे आहोत. अशा प्रकारच्या आपल्या नित्यसिद्ध स्वरूपाचा अनुभव होणे ''ज्ञान'' आहे.

दुसरी गोष्ट या एकोणचाळीसाव्या श्लोकात ''**लभते**'' पद आले आहे. त्याचे तात्पर्य जी वस्तू निर्माण होत नाही अशा नित्य सिद्ध वस्तूची प्राप्ती! जी वस्तू निर्माण होते अर्थात् जी वस्तू पूर्वी नव्हती तर उत्पन्न केली जाते त्या वस्तूच्या प्राप्तीला ''**लभते**'' म्हणू शकत नाही. कारण जी वस्तू पूर्वी नव्हती आणि नंतरही राहणार नाही अशा वस्तूची प्रतीती होते परंतु प्राप्ती होत नाही. प्रतीत होणाऱ्या वस्तूला प्राप्त समजणे आपल्या विवेकाचा सर्वथा अनादर आहे.

जे संसाराच्या उत्पत्तीपूर्वीही राहते, संसाराच्या (उत्पन्न होऊन असणाऱ्या) स्थितीमध्येही राहते आणि संसार नष्ट झाल्यावरही राहते. ते तत्त्व ''आहे'' नावाने म्हटले जाते आणि ''आहे'' च्या प्राप्तीलाच ''**लभते**'' म्हणतात. परंतु जी वस्तू उत्पन्न होण्याच्या पूर्वीही नव्हती आणि नष्ट झाल्यानंतरही राहणार नाही तसेच मध्यंतरीही नाशाकडेच निरंतर वाटचाल करीत आहे ती वस्तू ''नाही'' नावाने म्हटली जाते. ''नाही'' ची प्रतीती होत असते प्राप्ती नव्हे. जे ''आहे'' ते तर आहेच आणि जे ''नाही'' ते नाहीच. ''नाही'' ला ''नाही'' रूपाने समजणे आणि ''आहे'' ला ''आहे'' रूपाने मानणे श्रद्धा आहे, ज्यामुळे नित्यसिद्ध ज्ञानाची प्राप्ती होते— ''**श्रद्धावाँल्लभते ज्ञानम्**''.

**ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति**—नवव्या अध्यायाच्या तिसऱ्या श्लोकात भगवंतांनी निषेध-मुखाने म्हटले आहे की, श्रद्धारहित पुरुष मला प्राप्त न होता जन्म-मरणरूप चक्रामध्ये फिरत राहतो. त्याच गोष्टीला येथे विधीमुखाने म्हणत आहेत की, श्रद्धावान पुरुष परम शांतीला प्राप्त होतो अर्थात् मला प्राप्त होऊन जन्म-मरणरूपी चक्रातून पार पडतो.

परमशांतीचा ताबडतोब अनुभव न होण्याचे कारण, जी वस्तू आपल्या स्वत:जवळ आहे, तिला आपल्या स्वत:जवळ न शोधता इतरत्र बाहेर दुसऱ्या ठिकाणी शोधणे, हे आहे. परमशांती सर्व जीवाचे ठिकाणी स्वत:सिद्ध आहे. परंतु मनुष्य परमशांती-स्वरूप परमात्म्याशी तर विमुख होतो आणि सांसारिक वस्तूमध्ये शांतीचा शोध करतो. म्हणून अनेक जन्मापर्यंत शांतीच्या शोधात भटकत राहूनसुद्धा त्याला शांती मिळत नाही. उत्पत्ति-विनाशशील वस्तूमध्ये शांती कशी मिळू शकते? तत्त्वज्ञानाचा अनुभव झाल्यावर जेव्हा दु:खरूप संसाराशी सर्वथा संबंध-विच्छेद होतो तेव्हा स्वत:सिद्ध परमशांतीचा तात्काळ अनुभव होतो.

**परिशिष्ट भाव—'श्रद्धावाँल्लभतेज्ञानम्'**—श्रद्धा-विश्वास आणि विवेकाची आवश्यकता सर्वच साधकांसाठी आहे. हां, कर्मयोगी आणि ज्ञानयोगात विवेकाची मुख्यता आहे आणि भक्तियोगात श्रद्धा-विश्वासची मुख्यता आहे. आरंभी 'तत्त्वज्ञान आहे'—अशी श्रद्धा असेल, तरच साधक त्याच्या प्राप्तीसाठी साधन करेल.

***संबंध**—जे ज्ञानप्राप्तीचे अपात्र आहेत अशा विवेकहीन संशयात्मा मनुष्याची निंदा भगवान् पुढील श्लोकात करतात.*

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति।**
**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥ ४० ॥**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **अज्ञः** | = विवेकहीन | **संशयात्मनः** | = संशयात्मा मनुष्याला (तर) | **परः** | = परलोकही (हितकारक) |
| **च** | = आणि | **अयम्** | = हा | **न** | = (होत) नाही |
| **अश्रद्दधानः** | = श्रद्धारहित | **लोकः** | = लोकही (हितकारक) | **च** | = आणि |
| **संशयात्मा** | = संशयात्मा मनुष्याचे | **न, अस्ति** | = (होत) नाही (किंवा) | **सुखम्** | = सुख (ही) |
| **विनश्यति** | = पतन होते (अशा) | | | **न** | = (होत) नाही. |

*व्याख्या*— **अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति**— ज्या पुरुषाचा विवेक अजून जागृत झाला नाही तसेच जितका विवेक जागृत झाला आहे त्याला महत्त्व देत नाही आणि त्याबरोबरच तो अश्रद्धाळू आहे. अशा संशययुक्त पुरुषाचे पारमार्थिक मार्गातून पतन होते. कारण संशययुक्त पुरुषाची स्वत:ची बुद्धी तर प्राकृत—शिक्षणरहित आहे आणि दुसऱ्याच्या म्हणण्याला आदर देत नाही, मग अशा पुरुषाचे संशय कसे नष्ट होऊ शकतील? आणि संशय नष्ट झाल्याशिवाय त्याची उन्नतीही कशी होऊ शकते?

वेगवेगळ्या गोष्टी ऐकल्याने "हे योग्य आहे की ते योग्य आहे?" अशा प्रकारे संदेहयुक्त पुरुषाचे नाव संशयात्मा आहे. पारमार्थिक मार्गाचे आक्रमण करणाऱ्या साधकात संशय उत्पन्न होणे स्वाभाविक आहे. कारण त्याने कोणत्याही विषयाचे वाचन केले तर त्याला काही समजेल आणि काही समजणार नाही. ज्या विषयाच्या बाबतीत काहीही समजले नाही त्या विषयात शंका निर्माण होत नाही आणि जो विषय पूर्ण समजला त्या विषयात शंका राहत नाही. म्हणून संशय नेहमी अर्धवट ज्ञानामुळेच उत्पन्न होतात, यालाच अज्ञान म्हणतात.* म्हणून संशयाचे उत्पन्न होणे हानिकारक नाही तर संशयाला कायम ठेवणे आणि त्याला नष्ट करण्याचा प्रयत्न न करणे हेच हानिकारक आहे. संशयाला नष्ट करण्याचा प्रयत्न न केल्यास तो संशयच "सिद्धांत" होतो. कारण संशय नष्ट न झाल्याने मनुष्य विचार करतो की, पारमार्थिक मार्गामध्ये सर्व काही कपोल-कल्पना आहेत आणि असे समजून त्याचा त्याग करतो आणि नास्तिक होतो, परिणामी त्याचे पतन होते. म्हणून आपल्या अंत:करणात संशयाचे राहणे साधकाला नकोसे वाटले पाहिजे. संशय वाईट आहे असे वाटल्यावर जिज्ञासा जागृत होते. ज्याची पूर्ती झाल्यावर संशय-विनाशक ज्ञानाची प्राप्ती होते.

साधकाचे लक्षण आहे—शोध घेणे. जर त्याने मन आणि इंद्रियांनी पाहिलेल्या गोष्टीलाच सत्य मानले तर तो त्याच ठिकाणी थांबतो, पुढे अग्रेसर होत नाही. साधकाने नेहमी पुढे जात राहिले पाहिजे. जसे रस्त्यावर चालताना मनुष्याने हे पाहू नये की, किती मैल चालत आलो तर पुढे किती मैल चालावयाचे राहिले आहे याकडे पहावे. तेव्हा तो ठीक आपल्या लक्ष्यापर्यंत पोहचतो. त्याचप्रमाणे साधकाने हे पाहू नये की, किती जाणले. अर्थात् आपल्या जाणल्याविषयी संतोष करू नये. तर जो विषय चांगल्या रीतीने समजला नसेल तर त्याला समजून घेण्याचा प्रयत्न करावा. म्हणून संशय असताना कधीही संतोष मानू नये. तर जिज्ञासा अग्नीप्रमाणे धगधगत राहिली पाहिजे. असे झाल्यास साधकाचा संशय संत महात्म्याकडून अथवा शास्त्रग्रंथाकडून कोणत्या ना कोणत्या प्रकाराने नष्ट होतोच. संशय नष्ट करणारा कुणी मिळाला नाही तर भगवत्कृपेने त्याचा संशय नष्ट होतो.

**विशेष गोष्ट**

जीवात्मा परमात्म्याचा अंश आहे—"**ममैवांशो जीवलोके**" (१५।७). म्हणून जेव्हा त्याचे ठिकाणी आपल्या अंशी परमात्म्याला प्राप्त करण्याची भूक जागृत होते आणि त्याची पूर्ती न होण्याविषयीचे दु:ख होते तेव्हा त्या दु:खाला भगवान् सहन करू शकत नाहीत. म्हणून त्याची पूर्ती भगवान् स्वत: करतात. त्याचप्रमाणे जेव्हा साधकाच्या आपल्या अंत:करणात स्थित असलेल्या संशयाविषयी व्याकूळता अथवा दु:ख होते तेव्हा ते दु:ख भगवंताला असह्य होते. संशय दूर

* अज्ञानाचा अर्थ ज्ञानाचा अभाव असा नाही. अपूर्ण ज्ञानाला पूर्ण ज्ञान मानणे हे अज्ञान आहे. कारण परमात्म्याचाच अंश असल्याने जीवात ज्ञानाचा सर्वथा अभाव होऊच शकत नाही. केवळ नाशवान् असत्च्या सत्तेला मानून त्याला महत्त्व देतो, असत्‌ला असत् मानूनही असत्पासून विमुख होत नाही—हेच अज्ञान आहे. म्हणून मनुष्याचे ठिकाणी जेवढे ज्ञान आहे जर त्या ज्ञानानुसार तो आपले जीवन बनवील तर अज्ञान सर्वथा नष्ट होईल आणि ज्ञान प्रगट होईल. कारण अज्ञानाची स्वतंत्र सत्ता नाहीच.

करण्यासाठी भगवंतांना प्रार्थना करावी लागत नाही तर ज्या संशयाच्या आधाराने साधकाला दु:ख होत आहे त्या संशयाला दूर करून भगवान् स्वत: त्याचे ते दु:ख नष्ट करतात. संशयात्मा पुरूषाची एक पुकार असते जी स्वत: भगवंतापर्यंत पोहचते.

संशयामुळे साधकाची वास्तविक उन्नती थांबते म्हणून संशय दूर करण्यातच त्याचे हित आहे. भगवान् प्राणीमात्राचे सुहृद आहेत "**सुहृदं सर्वभूतानाम्**" (५।२९). म्हणून ज्या संशयामुळे मनुष्य व्याकूळ होतो आणि ती व्याकूळता त्याला असह्य होते तेव्हा भगवान् त्या संशयाला कोणत्याही रीतीने दूर करून टाकतात. चूक हीच होते की, मनुष्य जितके जाणतो त्यालाच पूर्ण समजून अभिमान करतो की, मी योग्य जाणतो. हा अभिमान महान पतन करणारा होतो.

**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः**—या श्लोकात अशा संशयात्मा मनुष्याचे वर्णन आहे की, जो "अज्ञ" आणि "अश्रद्धाळू" आहे तात्पर्य अंत:करणात संशय राहत असताना त्या मनुष्याची बुद्धी विवेकवती नसते आणि तो दुसऱ्याची गोष्टही ऐकत नाही. म्हणून अशा संशयात्मा मनुष्याचे पतन होते. त्याच्यासाठी इहलोकही नसतो, परलोकही नसतो आणि सुखही मिळत नसते.*

संशयात्मा मनुष्याचा व्यवहार या लोकात बिघडतो. कारण तो प्रत्येक विषयात संशय करतो. जसे हा मनुष्य चांगला आहे कि वाईट? हे भोजन योग्य आहे की अयोग्य? यात माझे हित आहे का अहित आहे ? इत्यादी. त्या संशयात्मा मनुष्याला परलोकातही कल्याणाची प्राप्ती होत नाही. कारण कल्याणामध्ये निश्चयात्मिका बुद्धीची आवश्यकता असते आणि संशयात्मा मनुष्य द्विधा मनस्थितीत असल्यामुळे कोणताही एक निश्चय करू शकत नाही. जसे जप करू की स्वाध्याय करू? संसाराचे काम करू का परमात्मप्राप्ती करू? इत्यादी. अंत:करणात संशय भरलेला असल्याने त्याच्या मनातही सुख शांती राहत नाही. म्हणून विवेकवती बुद्धीद्वारा आणि श्रद्धाद्वारा संशयाला अवश्यच समाप्त केले पाहिजे.

दोन वेगवेगळ्या गोष्टी वाचल्या-ऐकल्यामुळे संशय उत्पन्न होतात. तो संशय एक तर विवेक विचाराने दूर होऊ शकतो अथवा शास्त्र तसेच संत-महात्मा पुरुषांच्या वचनांना श्रद्धापूर्वक मानल्याने दूर होऊ शकतो. म्हणून संशययुक्त पुरुषामध्ये जर अज्ञता असेल तर त्याने विवेक-विचाराला वाढवावे आणि जर अश्रद्धा असेल तर श्रद्धेला वाढवावे. कारण या दोन्हीपैकी एकाला विशेषत्वाने स्वीकारल्याशिवाय संशय दूर होत नाही.

**परिशिष्ट भाव**—ज्ञान असेल तर संशय समाप्त होतो—'**ज्ञानसंछिन्नसंशयम्**' (गीता ४।४१) आणि श्रद्धा असेल तरीही संशय समाप्त होतो—'**श्रद्धावाँल्लभते ज्ञानम्**' (गीता ४।४०). परंतु ज्ञान आणि श्रद्धा—हे दोन्हीही नसतील तर संशय समाप्त होऊ शकत नाही. म्हणून ज्या संशयात्मा मनुष्यात ज्ञानही (विवेकही) नाही आणि श्रद्धाही नाही अर्थात् जो स्वत: जाणतही नाही आणि दुसऱ्याने सांगितले तर मानत नाही, त्याचे पतन होते.

***संबंध***—*भगवंतांनी तेहतीसाव्या श्लोकापासून ज्ञानयोगाचे प्रकरण आरंभ करून ज्ञानप्राप्तीचा उपाय तसेच ज्ञानाचा महिमा वर्णन केला. जे ज्ञान गुरूंजवळ राहून त्यांची सेवा इत्यादी करण्याने होते, तेच ज्ञान कर्मयोगाने सिद्ध झालेल्या मनुष्याला आपोआप प्राप्त होते—असे सांगून, ज्ञानप्राप्तीसाठी पात्र-अपात्राचे वर्णन करून प्रकरणाचा उपसंहार केला. आता प्रश्न असा येतो की, सिद्ध होण्यासाठी कर्मयोग्याने काय केले पाहिजे? याचे उत्तर भगवान् पुढील श्लोकात देत आहेत.*

**योगसन्न्यस्तकर्माणं ज्ञानसञ्छिन्नसंशयम्।**
**आत्मवन्तं न कर्माणि निबध्नन्ति धनञ्जय॥ ४१॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **धनञ्जय** | = हे धनंजय! | | आहे (आणि) | **आत्मवन्तम्** | = स्वरूप-परायण मनुष्याला |
| **योगसन्न्यस्त-** | = योगाद्वारा | **ज्ञानसञ्छिन्न-** | = विवेकज्ञानाद्वारा ज्याच्या | **कर्माणि** | = कर्म |
| **कर्माणम्** | (समताद्वारा) ज्याचा संपूर्ण कर्मांशी संबध-विच्छेद झाला | **संशयम्** | संपूर्ण संशयांचा नाश झाला आहे (अशा) | **निबध्नन्ति** | = बंधनकारक |
| | | | | **न** | = होत नाहीत. |

***व्याख्या***—**योगसन्न्यस्तकर्माणम्**—शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादी ज्या वस्तू आपल्याला मिळाल्या आहेत आणि आपल्या वाटत आहेत. त्या सर्व दुसऱ्यांच्या सेवेसाठीच आहेत, आपला अधिकार चालविण्यासाठी नव्हे. या दृष्टिकोनातून

* कुछ श्रद्धा, कुछ दुष्टता, कुछ संशय, कुछ ज्ञान। घरका रहा न घाटका, ज्यों धोबी का श्वान॥

जेव्हा त्या वस्तूंना दुसऱ्यांच्या सेवेत (त्यांचेच मानून) उपयोगात आणले तर कर्म आणि वस्तूंचा प्रवाह संसाराकडे होतो आणि आपल्या ठिकाणी स्वतः सिद्ध समतेचा अनुभव होतो. अशा प्रकारे योगा (समता) द्वारे ज्याने कर्माशी संबंध विच्छेद केला आहे. तो पुरुष "**योगसन्न्यस्तकर्मा**" आहे.

जेव्हा कर्मयोगी कर्मामध्ये अकर्म तसेच अकर्मात कर्म पाहतो अर्थात् कर्म करताना अथवा न करताना दोन्ही अवस्थेत नित्य निरंतर असंग राहतो तेव्हा तोच वास्तविक "**योगसन्न्यस्तकर्मा**" होतो.

**ज्ञानसञ्छिन्नसंशयम्**—मनुष्याच्या अंतःकरणात बहुतेक असे संशय राहतात की, कर्म करत असताना कर्माशी आपला संबंध-विच्छेद कसा होईल? आपल्यासाठी काहीही केले नाही तर आपले कल्याण कसे होईल? इत्यादी. परंतु जेव्हा तो कर्माच्या तत्त्वाला चांगल्या रीतीने जाणून घेतो* तेव्हा त्याचे सर्व संशय समाप्त होतात. त्याला ह्या गोष्टीचे स्पष्ट ज्ञान होते की, कर्म आणि त्यांच्या फलाचा आदि आणि अंत होत असतो. परंतु स्वरूप सदा जसेच्या तसे राहते. म्हणून सर्व कर्माचा संबंध "पर" (संसार) शी आहे. "स्व" (स्वरूप) शी मुळीच नाही. या दृष्टीने आपल्यासाठी कर्म केल्याने कर्माशी संबंध जडला जातो आणि निष्कामभावनेने केवळ दुसऱ्यांसाठी कर्म केल्याने कर्माशी संबंध-विच्छेद होतो. यावरुन सिद्ध होते की, आपले कल्याण दुसऱ्यासाठी कर्म केल्यानेच होते, आपल्यासाठी कर्म केल्याने नव्हे.

**आत्मवन्तम्**—कर्मयोग्याचा उद्देश स्वरूप-बोधाला प्राप्त करण्याचा असतो. म्हणून तो सदा स्वरूपपरायण राहतो. त्याची संपूर्ण कर्म संसारासाठीच होतात. सेवा तर स्वरूपानेच दुसऱ्यासाठी होते, खाणे-पिणे, झोपणे-बसणे इत्यादी जीवननिर्वाहाच्या संपूर्ण क्रियासुद्धा दुसऱ्यासाठीच होतात. कारण सर्व क्रियांचा संबंध संसाराशी असतो स्वरूपाशी नव्हे.

**न कर्माणि निबध्नन्ति**—आपल्यासाठी कोणतेही कर्म केले नाही तर कर्मयोग्याचा संपूर्ण कर्माशी संबंध-विच्छेद होतो अर्थात् तो नेहमीसाठी संसारबंधनातून संपूर्णपणे मुक्त होतो (४।२३)

कर्म स्वरूपाने बंधनकारक नाहीच. कर्मात फलेच्छा, ममता, आसक्ती आणि कर्तृत्वाभिमानच बंधनकारक असतो.

*संबंध—पूर्व श्लोकात भगवंतांनी सांगितले की, ज्ञानद्वारा संशयाचा नाश होतो आणि समताद्वारा कर्माशी संबंध-विच्छेद होतो. आता पुढील श्लोकात भगवान् ज्ञानाद्वारा आपल्या संशयाचा नाश करून समतेत स्थित होण्यासाठी अर्जुनाला आज्ञा करतात.*

**तस्मादज्ञानसम्भूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः।**
**छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत॥४२॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तस्मात्** | = म्हणून | **एनम्** | = या | **ज्ञानासिना** | = ज्ञानरूपी तलवारीने |
| **भारत** | = हे भरतवंशी अर्जुन! | **अज्ञानसम्भूतम्** | = अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या | **छित्वा** | = छेदन करून |
| | | | | **योगम्** | = योगात (समतेत) |
| **हृत्स्थम्** | = हृदयात स्थित असलेल्या | **आत्मनः** | = आपल्या | **आतिष्ठ** | = स्थित हो (आणि) |
| | | **संशयम्** | = संशयाचे | **उत्तिष्ठ** | = युद्धासाठी उभा रहा. |

***व्याख्या*—तस्मादज्ञानसम्भूतं.......छित्त्वैनं संशयम्—** पूर्व श्लोकात भगवंतांनी हा सिद्धांत सांगितला की, ज्याने समताद्वारा संपूर्ण कर्माशी संबंध-विच्छेद केला आहे आणि ज्ञानाद्वारा समस्त संशयाला समाप्त केले आहे, त्या आत्मपरायण कर्मयोग्याला कर्म बांधत नाहीत अर्थात् तो जन्म-मरणातून मुक्त होतो. आता भगवान् "तस्मात्" पदाने अर्जुनालाही तसेच जाणून कर्तव्यकर्म करण्याची प्रेरणा करतात.

अर्जुनाच्या अंतःकरणात संशय होता की, युद्धरूप घोर कर्माने माझे कल्याण कसे होईल? आणि कल्याणासाठी मी कर्मयोगाचे अनुष्ठान करू अथवा ज्ञानयोगाचे अनुष्ठान करू? या श्लोकामध्ये भगवान् या संशयाला दूर करण्याची प्रेरणा करतात. कारण संशय असताना कर्तव्याचे पालन योग्य रीतीने केले जाऊ शकत नाही.

**अज्ञानसम्भूतम्**—या पदाचा भाव असा आहे की, सर्व संशय अज्ञानाने अर्थात् कर्माच्या आणि योगाच्या तत्त्वाला योग्य रीतीने समजून न घेतल्यानेच, उत्पन्न होतात. क्रिया आणि पदार्थांना आपले आणि आपल्यासाठी मानणेच अज्ञान आहे. हे अज्ञान जोपर्यंत राहते तोपर्यंत अंतःकरणात संशय राहत असतात. कारण क्रिया आणि पदार्थ विनाशी आहेत आणि स्वरूप अविनाशी आहे.

* कर्माच्या तत्त्वाचे वर्णन याच अध्यायाच्या सोळाव्यापासून ते बत्तीसाव्या श्लोकापर्यंतच्या प्रकरणामध्ये विशेषत्वाने झाले आहे. यातही अकरावा श्लोक मुख्य आहे.

तीसऱ्या अध्यायामध्ये कर्मयोगाचे आचरण करण्याची आणि या चौथ्या अध्यायामध्ये कर्मयोगाला तत्त्वाने जाणण्या-विषयीचे विवेचन विशेषरूपाने आले आहे. कारण कर्मा-बरोबर कर्माला जाणून घेण्याचीसुद्धा फार आवश्यकता आहे. योग्य रीतीने जाणल्याशिवाय कोणतेही कर्म उत्तम रीतीने केले जाऊ शकत नाही. याशिवाय जे कर्म बंधनकारक असतात, त्यांना चांगल्या रीतीने जाणून केल्याने तीच कर्म मुक्त करणारी होतात. (४।१६-३२) म्हणून या अध्यायात भगवंतांनी कर्मांना तत्त्वाने जाणण्यावर विशेष भर दिला आहे.

पूर्व श्लोकातही "**ज्ञानसंछिन्नसंशयम्**" हे पद याच अर्थाने आले आहे. जो मनुष्य कर्म करण्याच्या विद्येला जाणून घेतो त्याच्या समस्त संशयांचा नाश होतो. कर्म करण्याची विद्या, आपल्यासाठी काहीही करावयाचेच नाही, ही आहे.

**योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत**—अर्जुन आपल्या धनुष्य बाणाचा त्याग करून रथाच्या मध्यभागी बसले होते (१।४७) त्यांनी भगवंताला स्पष्ट सांगून टाकले होते की, "मी युद्ध करणार नाही" "**न योत्स्ये**" (२।९) याठिकाणी भगवान् अर्जुनाला योगामध्ये स्थित होऊन युद्धासाठी उभे राहण्याची आज्ञा करीत आहेत. हीच गोष्ट भगवंतांनी दुसऱ्या अध्यायाच्या अठ्ठेचाळीसाव्या श्लोकात "**योगस्थ:कुरु कर्माणि**" (योगामध्ये स्थित होऊन कर्तव्यकर्म कर) पदांनीही सांगितली होती. योगाचा अर्थ "समता" आहे. "**समत्वं योग उच्यते**" (२।४८)

अर्जुन युद्धाला पाप समजत होते (१।३६,४५) म्हणून भगवान् अर्जुनाला समतेमध्ये स्थित होऊन युद्ध करण्याची आज्ञा देतात. कारण समतेमध्ये स्थित होऊन युद्ध केल्याने पाप लागत नाही. (२।३८) म्हणून समतेमध्ये स्थित होऊन कर्तव्यकर्म करणेच कर्मबंधनातून सुटण्याचा उपाय आहे.

संसारात रात्रंदिवस अनेक कर्म होत राहतात. परंतु त्या कर्मांमध्ये राग-द्वेष नसल्याने आपण संसाराच्या त्या कर्मांशी बांधले जात नाही तर निर्लिप्त राहतो. ज्या कर्मांमध्ये आपला राग-द्वेष होतो त्याच कर्मांनी आपण बांधले जातो. कारण राग अथवा द्वेषाने कर्मांशी आपला संबंध जुटतो. जर राग-द्वेष राहिले नाहीत अर्थात् समता आली तर कर्मांशी आपला संबंध जुटत नाही. म्हणून मनुष्य कर्मबंधनातून मुक्त होतो.

आपल्या स्वरूपाला पाहिले असता त्यात समता स्वत:सिद्ध आहे हे लक्षात येते. विचार करा की, प्रत्येक कर्माचा आरंभ होतो आणि समाप्ती होते. त्या कर्माचे फलही आदि आणि अंत होणारे असते. परंतु स्वरूप निरंतर जसेच्या तसे राहते. कर्म आणि फल अनेक असतात परंतु स्वरूप एकच राहते. म्हणून कोणतेही कर्म आपल्यासाठी केले नाही आणि कोणत्याही पदार्थाला आपले आणि आपल्यासाठी न मानल्यास जेव्हा क्रिया-पदार्थरूपी संसाराशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद होतो तेव्हा स्वत:सिद्ध समतेचा आपोआप अनुभव होतो.

***ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानकर्मसन्न्यासयोगो नाम चतुर्थोऽध्याय: ॥ ४॥***

**अशा प्रकारे ॐ तत् सत् या भगवन्नामाच्या उच्चारणपूर्वक ब्रह्मविद्या आणि योगशास्त्रमय श्रीमद्भगवद्गीतोपनिषद्रूपी श्रीकृष्ण आणि अर्जुन यांच्या संवादातील "ज्ञानकर्मसन्न्यासयोग" या नावाचा चौथा अध्याय पूर्ण झाला॥ ४॥**

तत्त्वज्ञानाच्या प्राप्तीसाठी कर्मयोग आणि सांख्ययोगाचे वर्णन असल्याने या चौथ्या अध्यायाचे नाव "ज्ञानकर्म-सन्न्यासयोग" आहे.

## चौथ्या अध्यायाची पदे, अक्षरे आणि उवाच

(१) या अध्यायात "**अथ चतुर्थोऽध्याय:**" ची तीन, "**अर्जुन उवाच**" इत्यादी पदांची सहा, श्लोकांची पाचशे अकरा आणि पुष्पिकेची तेरा पदे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण पदांचा योग पाचशे तेहतीस आहे.

(२) या अध्यायात "**अथ चतुर्थोऽध्याय:**" ची सात, "**अर्जुन उवाच**" इत्यादी पदांची वीस, श्लोकांची एकहजार तीनशे चव्वेचाळीस आणि पुष्पिकेची पन्नास अक्षरे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण अक्षरांचा योग एकहजार चारशे एकवीस आहे. या अध्यायाचे सर्व श्लोक बत्तीस अक्षरांचे आहेत.

(३) या अध्यायात तीन उवाच आहेत. दोन "**श्रीभगवानुवाच**" आणि एक "**अर्जुन उवाच**".

## चौथ्या अध्यायामध्ये प्रयुक्त छन्द

या अध्यायाच्या बेचाळीस श्लोकांपैकी एकतीसाव्या आणि अडतीसाव्या श्लोकाच्या प्रथम चरणामध्ये तसेच दुसऱ्या, दहाव्या, तेराव्या आणि चाळीसाव्या श्लोकाच्या तृतीय चरणामध्ये "नगण" प्रयुक्त झाल्याने "**न-विपुला**", सहाव्या श्लोकाच्या प्रथम चरणामध्ये "र-गण" प्रयुक्त होण्याने "**र-विपुला**" आणि चोवीसाव्या श्लोकाच्या प्रथम-चरणामध्ये तसेच तीसाव्या श्लोकाच्या तृतीय चरणामध्ये "भ-गण" प्रयुक्त झाल्याने "**भ-विपुला**" संज्ञा असणारे छंद आहेत. शेष तेहतीस श्लोक ठीक "**पथ्यावक्त्र**" अनुष्टुप् छंदाच्या लक्षणांनी युक्त आहेत.